महाराष्ट्र

# इतिहासमंजरी

अथवा

## निवडक ऐतिहासिक उतारे

## पूर्वार्ध

लेखक—दत्तात्रय विष्णु आपटे

शके १८४५

किंमत २ रु.

# प्रस्तावना



गेल्या चाळीस वर्षांत महाराष्ट्रांत ऐतिहासिक साधनें प्रकाशित करण्याचा उद्योग बराच नेटानें झालेला आहे. कैलासवासी निळकंठराव कीर्तने आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं प्रथम अशा प्रयत्नाची अवश्यकता प्रतिपादन केल्यानंतर रा. साने, राजवाडे, खरे, व पारसनीस यांनी संशोधनाचें काम जें एक वेळ उचललें तें त्यानी अद्यापपर्यंत अव्याहतपणे चालविलें आहे. या खेरीज अशा सामुग्रीवरून इतिहास लिहिण्याच्या कामास कै. वासी म. गो. रानडे, रियासतकार रा. सरदेसाई व प्रो. यदुनाथ सरकार वगैरे अनेक विद्वानांनीं हात घातल्यापासून चरित्रें व ऐतिहासिक चर्चा याचेंहि प्रमाण वाढत आहे. खेरीज पुण्यांतील भारत–इतिहास—संशोधक—मंडळ, धुळे येथील रामदासी वाङ्मय प्रकाशक मंडळ, ठाण्याचें मराठीदप्तर आणि कलकत्ता, मद्रास व अलाहाबाद येथील विश्वविद्यालयें या सारख्या संस्थांनीं प्रकाशनाचा भार अलीकडे अंगावर घेतल्यामुळें यापुढें इतिहास–साधनांचे प्रकाशन पूर्वीपेक्षा मोठ्या प्रमाणावर होईल अशी चिन्हें दिसत आहेत. अशावेळीं आजवर प्रकाशित झालेल्या साधन सामुग्रीचा मासला सामान्य लहान थोर मराठी वाचक वर्गापुढें मांडून त्यांना ऐतिहासिक वाङ्मयाच्या आल्हादकारक व पूर्वजांच्या स्मृतिसुवासानें दरवळणाऱ्या उपवनाकडे वळविणें अवश्यक आहे. अशा रीतीनें ऐतिहासिक वाङ्मयोपवनांतील सुमनगुच्छ गुंफण्याचे काम उत्तम प्रकारें करूं शकणारे अनेक विद्वान् महाराष्ट्रांत विद्यमान आहेत व ते हें काम अंगावर घेतील असें वाटून गेलीं सात आठ वर्षे मी वाट पाहिली. मध्यंतरीं रा. गोविंदराव सरदेसाई यानीं अशा प्रकारचे निवडक उतारे पुस्तक रूपानें प्रथित करण्याची अवश्यकता जाहीर रीतीनें प्रतिपादन केली; पण कार्यव्यापृतत्वामुळें हें काम आपल्या हातून होणार नाहीं असें त्याच वेळीं सुचविलें. यामुळें वाट पहात राहण्यापेक्षा आपणच जमेल तसें हें काम पार पाडावें असें मनांत आणून मी गेल्या वर्षांत वेंच काढण्याचा हा उद्योग केला. याची सामान्य रूपरेषा प्रो. दत्तो वामन पोतदार व 'केसरीकार' रा. न. चिं. केळकर,

यांच्या सल्यानें ठरविली. तथापि हें काम जलदीनें पार पाडण्यास चित्रशाळेच्या व्यवस्थापकांचें प्रोत्साहन व तगादा हींच विशेष उपयोगी पडलीं.

वेचे करतांना कोणती दृष्टी ठेवावी हें ठरविणें कठीण असतें. आठ वर्षांपूर्वीं मी केलेली निवड नवीन ऐतिहासिक माहिती ज्या पत्रांतून मिळते ती पत्रें एकत्र करावी या हेतूने केली होती. परंतु सामान्य वाचकांना या विषयाची गोडी लावण्याचा हेतु दृष्टीपुढें ठेवल्यावर फारशी व अपरिचित शब्दांनीं गजबजलेल्या लांबलचक महजरांना व फर्मानांना बाजूस ठेवणें भाग पडले. यानंतर केवळ अस्सल पत्रें निवडण्याची आणि शुद्ध व जोरदार भाषेचे नमुने एकत्र करण्याची अशी द्विविध कल्पना स्नेह्यांनी मला सुचविली. तेव्हां केवळ एकच कल्पना न ठेवतां रुचिवैचित्र्य हेंच मुख्यत: मार्गदर्शक धरावें असें ठरवून मी निवड केली आहे. यामुळें कित्येक उतारे फारच लांबलचक आहेत तर कित्येक महत्वाचे उतारे यांत घेतलेलेच नाहींत वगैरे तक्रारी या व्यवसायांत गढलेल्या विद्वानांना करतां येण्याजोग्या आहेत. परंतु तीनशे पानांच्या पाहिल्या पंक्तीस मला जितके उतारे बसावितां आले तितके मी बसविले आहेत. यांत कैलासवासी रानडे, रा. केळुसकर, दळवी, चिंतामणराव वैद्य, ‘ महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग ’ लिहिणारे रा. गद्रे वगैरे अनेक नामांकित लेखकांच्या ग्रंथांतलि उतारे आले नाहींत हें खरें, तथापि याचें कारण ऐतिहासिक वाङ्मयाचा व्याप एवढा मोठा झाला आहे कीं, अनुल्लेखाचा आक्षेप वेचे काढणाऱ्यास टाळता येणें दुर्घट आहे. तथापि या दिशेनें कोणी 'कांहीं सुचाविल्यास मजवर फार उपकार होतील; व त्याचा उपयोगहि होईल. कारण या मंजरीचा उत्तरार्ध छापावयास घ्यावयाचा आहे; त्यांतील वेचे काढतांना मला सूचनांचा उपयोग होईल व कदाचित् या पूर्वार्धाची पुन: आवृत्ती निघाल्यास कोणते भाग गाळावे व कोणते नवीन घालावें हें ठरवितांना या भागासंबंधीच्या सर्व सूचनांचा मला साक्षात उपयोग करून घेतां येईल. सारांश या पूर्वार्धासंबंधानें इतिहास भक्तांनीं आक्षेप, टीका व योग्यायोग्यतेची चर्चा वेळांत वेळ काढून करावी, अशी माझी आग्रहाची विनंति आहे. महाराष्ट्राचा इतिहास चांगल्या प्रकारें लिहिला जाण्यास आजपर्यंत झालेल्या कामापेक्षा व्हावयाचें काम शेकडोपटीनें मोठें आहे ही गोष्ट सर्व संमत आहे. तेव्हां तें काम पार पाडण्यास सामान्य वाचक वर्ग व नवीन पिढी यांना ऐतिहासिक वाचनाची अभिरुची उत्पन्न करण्या-

वाचून गत्यंतर नाहीं असें वाटल्यावरून मी हा प्रयत्न केला आहे. तेव्हां विद्वानांनीं परीक्षण करून वाट दाखविल्यास पुढील काम अधिक व्यवस्थितपणें करण्यास मला अवसर सापडेल.

उताऱ्यासंबंधीं एक गोष्ट सांगणें अवश्यक आहे; ती ही कीं कित्येक उताऱ्यांच्या प्रारंभीं प्रस्तावनेदाखल मजकूर जोडलेला आहे व उतारा अक्षरशः घेतलेला नाहीं. प्रास्ताविक मजकूर निराळ्या टाइपांत घातला असता तर तो प्रत्यक्ष उताऱ्यांतील मजकुरापासून वेगळा दिसला असता. परंतु छापण्यास प्रारंभ झाला तेव्हां ही गोष्ट लक्षांत न आल्यामुळें अशी व्यवस्था होऊं शकली नाहीं. खुद्द उताऱ्यांतील मजकुराची छाटाछाट मात्र कांहीं ठिकाणीं मुद्दाम केलेली आहे. प्रस्तुत पुस्तक सामान्य वाचकांच्या हातीं जावयाचें आहे. तेव्हां उताऱ्यांतील महत्वाचा भाग आणून संक्षेपाकडे लक्ष ठेवण्यास हरकत नाहीं, असें समजून विराम चिन्हें ठिकठिकाणीं घातली व मधून मधून टिंबें न देतां शब्द व वाक्येंहि गाळली आहेत. सारांश हे उतारे अस्सल भागाचा गोषवारा समजण्यास उपयोगी पडतील. पण ज्याला बारकाईनें अध्ययन करावयाचें असेल त्यानें अस्सल ग्रंथातूनच तो उतारा वाचणें अगत्याचें आहे. हे वेंचे वाचकांपुढे मांडण्यांत मूळ ऐतिहासिक ग्रंथाकडे धांव घेण्याची इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न व्हावी, हाच हेतु आहे; तेव्हां संक्षेप हा एका अर्थी इष्ट कार्यच घडवून आणील अशी आशा वाटते.

महाराष्ट्राच्या बहुतेक ऐतिहासिक पुस्तकांतून इसवी सन दिलेले असतात. पण येथें शक व मराठी महिने आणि तिथी यांची योजना केलेली आहे. याचें कारण जीं पत्रें येथें दिलीं आहेत व ज्या काळचा इतिहास त्यांत आलेला आहे त्या काळीं हिंदुस्थानांत इसवी सन प्रचारांत नव्हता आणि सर्व सामाजिक व्यवहार हिंदी पद्धतीनें म्हणजे चैत्र वैशाखादि महिन्या प्रमाणें होत असत. यामुळें त्यांतील विषयाचा विचार करतांना मराठी महिन्याच्या उल्लेखानें जसें मजकुराचें रहस्य लक्षांत भरतें तसें इंग्रजी तारीख व महिना सांगण्यानें भरत नाहीं. उदाहरणार्थ सदाशिवराव रंगपंचमी झाल्यावर पाणिपतच्या मोहिमेवर निघाले, चंद्रग्रहणाच्या वेळीं स्नानास गेले असता नानासाहेबावर मोगल अकस्मात् चालून आले, दसरा करून स्वारी बाहेर पडली किंवा आगोटीच्या सुमारास परत आली वगैरे वाक्यांत इंग्रजी महिना व तारीख सांगून ती लक्षांत राहणें किंवा राहिली तरी

तिच्यापासून तत्कालीन परिस्थितीचें चित्र चटकन मनापुढें उभें राहणें अशक्य आहे. सारांश महाराष्ट्राचा इतिहास लिहितांना व वाचतांना हिंदी कालगणना पद्धति दृष्टीपुढे ठेविणें अधिक फायदेशीर असतें.

बहुतेक उतारे कालानुक्रमानें लावले आहेत. परंतु पाच चार ठिकाणीं थोडासा विपर्यास झाला आहे. याचें एक कारण असें कीं, एक दोन उतारे घालण्याची अवश्यकता कांहीं मजकूर छापून गेल्यानंतर मला भासली. उदाहरणार्थ नागरी प्रचारिणीसभेच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेलें श्रीशिवाजी महाराजांनीं जयसिंगास पाठविलेलें फारशी पत्र या पुस्तकाची १४८ पृष्ठें छापून गेल्यानंतर मला मिळालें. यामुळें तें १४९ व्या पृष्ठांत घ्यावें लागलें. खरें पाहतां ते ७७ व्या पृष्ठावर यावयास पाहिजे होते. याखेरीज कांहीं उतारे कालानुक्रमाकडे दुर्लक्ष करून मुद्दाम निराळ्या ठिकाणीं घेतले आहेत. 'पेशवाईतील शिक्षण' या मथळ्याखालीं शके १६६४ व १६८० मधील उतारे शेजारीं मांडले आहेत याचें कारण त्यांचा विषय एक आहे; व 'म्हैसुराकडील राजकारणें' हा शके १६८२ मधील विषय बराच आधीं घेतला याचे कारण शेवटीं पाणिपतविषयक प्रकरणे एका ठिकाणी घेता यावी हें आहे.

शब्दांच्या टीपा ज्या त्या ठिकाणीं द्याव्या अशी प्रथम योजना होती. परंतु अशानें जागा फार अडेल असें लक्षण दिसलें. यामुळें शेवटीं शब्दसंग्रह जोडून मुळांत टीपा कमी करण्याचें ठरविलें. तथापि उतारे ज्या पुस्तकांतून घेतले आहेत त्या ग्रंथकारांनीं दिलेल्या महत्वाच्या टीपा होता होईतोंवर कायम ठेवल्या आहेत. प्रारंभीच्या प्रास्ताविक ओळी लिहितांना देखील रा. साने, राजवाडे, वगैरे लेखकांनीं जोडलेल्या टीपा व मजकूरच मुख्यतः जमेस धरले आहेत.

बहुतेक ठिकाणीं आधार दिले आहेत त्यावरून मूळ ग्रंथ पाहण्यास अडचण पडणार नाहीं. परंतु अप्रकाशित किंवा लौकरच प्रसिद्ध होणाऱ्या अशा कित्येक हस्तलिखित बाडांचाहि मी उपयोग केला आहे हें नमूद केलें पाहिजे. उदाहरणार्थ कल्याणचे रा. सदाशिवराव दिवेकर यांनीं पर्नाळपर्वतग्रहणाख्यान व शिवभारत हे ग्रंथ प्रकाशित करण्याची तयारी केली आहे परंतु छापण्यापूर्वी मला त्यांनीं ते वाचून पाहण्याची संधी दिली यामुळें त्यांतून उतारे घेतां आले. त्याचप्रमाणें खासगी लोकांच्या दप्तरांतील कांहीं बाडें चाळीत असतांना भोसले,

वंशातील पुरुष, औरंगजेब, शाहु इत्यादिकांच्या मृत्युकालाच्या वगैरे मित्या देणारे श्लोक मला आढळले ते मी टिपून ठवलले येथें दिले आहेत. परंतु ते कोणत्या बाडांतून घेतले व आज तीं बाडे कोठें आहेत याची मला माहिती व स्मरण नसल्यामुळें त्यांचीं नांवे देतां आलीं नाहींत.

शेवटीं या कामीं सहाय करणाऱ्यांचा उल्लेख केला पाहिजे. ज्यांच्या ग्रंथांतून वेचे घेतले आहेत त्यांचा निर्देश त्या त्या स्थळीं केलाच आहे. प्रो. दत्तो वामन पोतदार, श्री. सरदार तात्यासाहेब मेहेंधळे, व भारत–इतिहास–संशोधक मंडळ यांच्या संग्रहीं असलेले ग्रंथ मला वाटेल तेव्हां पाहण्याची मोकळीक असल्या-मुळें या कामांस हात घालता आला. त्याचप्रमाणें श्री. आबासाहेब मुजुमदार व न्यू–इंग्लिश स्कूलचे प्रो. माधवराव पटवर्धन यानीं फारशी शब्दांचे विस्तृत मराठी कोश करण्याची बहुतेक तयारी केली आहे. तिचा उपयोग करण्याची परवानगी त्यानीं दिल्यामुळें मला या पुस्तकांत शेवटीं शब्दसंग्रह जोडता आला. या सर्व सहायाबद्दल मी वर उल्लेखिलेल्या विद्वानांचा अत्यंत आभारी आहे. तथापि प्रो. पोतदार यांनीं अनेक प्रकारें सहाय करून व दुसऱ्याकडून करवून मला हे काम तडीस नेईपर्यंत स्वस्थता मिळूं न देण्याचे व्रत स्वीकारल्यामुळें फार उपयोग झाला हें नमूद करणें अवश्यक आहे. पत्रांच्या नकला करण्यास रा. रामचंद्र गणेश जोशी या उत्साही व तरुण गृहस्थानें मदत केली.

# अनुक्रमाणिका.



---

# महत्त्वाच्या मिती

१५१६ शहाजी भोसल्याचा जन्म
१५२० शहाजी व जिजाई यांचा रंगपंचमीचा खेळ
१५२५ शहाजी व जिजाई यांचें लग्न
१५४३ शहाजीस मनसबदारी मिळाली
१५४५ शहाजीस संभाजी नांवाचा मुलगा झाला
१५४६ भातवडीच्या युद्धांत शहाजीनें पराक्रम गाजविला
१५४७ शहाजी निजामशाही सोडून आदिलशहाकडे गेला
१५४८ वैशाख मलिकंबराचा मृत्यु
१५४९ वैशाख शु २ } शिवाजीचा जन्म
१५५१ **फाल्गुन व ३** } **शिवाजीचा जन्म**
१५४९ अश्विन इब्राहीम आदिलशहाचा मृत्यु
१५६८ शिवाजीनें तोरणा घेतला
१५६९ दादाजी कोंडदेवाचा मृत्यु
१५७० श्रावण व. १ शहाजीस मुस्तफाखानानें पकडलें
१५७१ वैशाख शु. ९ शिवाजीस समर्थांचा अनुग्रह
१५७१ ज्येष्ठ शु. १५ शहाजीची सुटका
१५७३ फाल्गुन व ३ तुकारामाचा मृत्यु

१५७७ पौष व. १४ शिवाजीनें जावळी घेतली.
**१५८१ मार्गशीर्ष शु. ७ अफजलखानाचा वध**
१५८२ चैत्र-आषाढ शिद्दी जोहाराचा पन्हाळ्यास वेढा
१५८२ आषाढ व. १ बाजी प्रभूचा पराक्रम
१५८५ चैत्र शु. ८ शाइस्तेखानावर शिवाजीचा छापा
१५८५ पौष व ४ सुरतेची पहिली लूट
१५८५ माघ शु. ६ शहाजीचा मृत्यु
१५८७ आषाढ शु. १० पुरंदरचा तह
१५८८ ज्येष्ठ शु. २ शिवाजी औरंगजेब भेट
१५८८ श्रावण व १२ शिवाजीची कैदेतून सुटका
१५९१ भाद्रपद औरंगजेबानें काशीचें देवालय पाडलें
१५९१ माघ व. ९ सिंहगडास तानाजीचा पराक्रम
१५९२ कार्तिक शु. १ सुरतेची दुसऱ्यांदा लूट
१५९३ माघ साल्हेरचें युद्ध
१५९५ माघ व. १४ जेसरीचें युद्ध
**१५९६ ज्येष्ठ शु. १३ शिवराज्याभिषेक**
१५९६ ज्येष्ठ व. ९ जिजाबाईचा मृत्यु

१५९८ फाल्गुन कुतुबशहा व शिवाजी यांची भेट.
१५९९ कर्नाटकची स्वारी
**१६०२ चैत्र शु. १५ शिवाजीचा मृत्यु**
**१६०३ माघ व. ९ रामदास समाधिस्थ झाले**
१६०४ वैशाख व ७ शाहूचा जन्म
**१६०५–२८ औरंगजेबाची दक्षिणेवर स्वारी**
**१६१० फाल्गुन व ३० संभाजीस तुळापुरीं [illegible]ारलें**
१६११ रायगडचा वेढा
**१६१८–१९ जिंजीचा वेढा**
१६२१ फाल्गुन व ९ राजारामाचा मृत्यु
१६२८ माघ व ३० औरंगजेबाचा मृत्यु
१६३३ भाद्रपद व. ३ बाळाजी विश्वनाथास सेनाकर्ते पद मिळालें
**१६३५ मार्गशीर्ष शु. १० बाळाजीस पेशवाई मिळाली**
१६४२ चैत्र शु. ५ बाळाजीचा मृत्यु
१६४६ अश्विन व. १० साखरखेडल्याचें युद्ध
१६४९ फाल्गुन शु. १३ पालखेडास निजामास कोंडलें
१६५१ चैत्र शु१२अहमदखान बंगषाचा जैतपुरीं पराभव

१६५२ फाल्गुन शु. २ शाहुसंभाजी भेट
१६५३ चैत्र शु. ६ डभईची लढाई
१६५९ भोपाळचा वेढा
**१६६०–६१ वसईचा संग्राम**
१६६१ फाल्गुन मुंगीपैठणचा तह
**१६६२ वैशाख शु. १३ बाजीरावाचा मृत्यु**
१६६२ आषाढ शु.१२नानासाहेबास पेशवाईची वस्त्रें
१६६२ पौष शु. १० चिमाजीचा मृत्यु
१६६५ भाद्रपद व. ५ मावळ्याची सनद
१६७० ज्येष्ठ शु. ५ निजाम्मुल्मुकाचा मृत्यु
**१६७१ मार्गशीर्ष व ३ शाहुमहाराजांचा मृत्यु**
१६७२ मार्गशीर्ष शु. १५ कुकडीनदीवर लढाई
१६७५ चैत्र रघुनाथरावानें अहमदाबाद घेतली
१६७५–७६ कुंभेरीचा वेढा
१६७७ ज्येष्ठ व ७ जयापाचा नागोरास खून
१६८१ कार्तिक व ५ नगरचा किल्ला मराठ्यांना मिळाला
१६८१ माघ व. २ उदगीरचें युद्ध
**१६८२ पौष शु. ९ पाणिपतचें युद्ध**

# चित्रें





## नकाशे



---

# दक्षिण महाराष्ट्र.


नाशीक
संगम
कोपरगांव
दौलताबाद
त्रिंबक
पुणतांबे
औरंगाबाद
संगमनेर
बेलापूर
गोदावरी
मुंगीपैठण
राक्षस भुवन
चावंड
जुन्नर
अहमदनगर
पारगांव
जांबगांव
कुसूर
चास
कडा
अष्टी
पाटोदे
चाकण
तळेगांव
जामखेड
सुलेगांव
चांभार गोंदे
खर्डे
चिंचवड
भीमानदी
पेडगांव
पुणें
रासीन
यवत
पाटस
सिंहगड
सासवड
भांबोरी
सुपे
तोरणा
परंडा
खडकी
पुरंदर
राजगड
वांगी
शिरवळ
बारामती
इंदापूर
भोर
टेंबुरणी
फलटण
नीरा नदी
नरसिंगपूर
प्रतापगड
वाघोली
करकंब
अकलूज
भोसे
कोरेगांव
सातारा
पंढरपूर
रहिमतपूर
म्हसवड
ब्रह्मपुरी
पाल
सांगोले
मंगळवेढे
फलटण
पुसेसावळी
आटपाडी
बावची
कऱ्हाड
प्रचीतगड
मलखेड
हुटगी
करजगी
जत

# महाराष्ट्र.


महाराष्ट्र.
गाविलगड
तापी नदी
इलिचपूर
पूर्णा नदी
नागपूर
भंडारा
सुरत
थाळनेर
साल्हेर
दमण
चांदवड
नाशिक
त्र्यंबक
असई
वाशीम
माहूर
वेरूळ
दौलताबाद
औरंगाबाद
जालना
शिंदखेड
पैठण
माणिकगड
कल्याण
संगमनेर
जुन्नर
शिवनेरी
मुंबई
राजमाची
अहमदनगर
कुलाबा
लोहगड
उदगीर
जंजिरा
परिंडा
रायगड
राजगड
प्रतापगड
बारामती
इंदापूर
तुळजापूर
कल्याणी
बेदर
सुवर्णदुर्ग
दाभोळ
सातारा
सोलापूर
परळी
संगमेश्वर
गुलबुर्गे
सदाशिवगड
मालखेड
रत्नागिरी
विशाळगड
पन्हाळा
पावनगड
मिरज
विजापूर
राजापूर
विजयदुर्ग
कृष्णा नदी
गोदावरी नदी
वर्धा नदी
भीमा नदी

# १ स्वराज्यापूर्वीचा महाराष्ट्र

दंडकारण्यांत वसाहत झाल्यापासून किती शतकांनीं मराठी भाषा व मराठे लोक अस्तित्वांत आले आणि त्यानंतर शिवाजी महाराजांच्या हातून स्वराज्याची स्थापना होईपर्यंत किती काळ लोटला हा मुद्दा अद्याप वादग्रस्त आहे. तथापि स्वराज्यापूर्वीचा महाराष्ट्र परतंत्र व यादवीनें हत-प्रभ बनलेला आणि आपपरभावाची स्पष्ट कल्पना नसल्यामुळें आपलें सामर्थ्य अनाठायीं खर्च करणारा होता, हें निर्विवाद आहे. या घोटाळ्यांतून महाराष्ट्रानें ज्या धार्मिक व राजकीय तत्वज्ञानाच्या जोरावर आपली उन्नति करून घेतली आणि पारतंत्र्य झुगारून देऊन स्वातंत्र्याचें निशाण रोवलें त्या परिस्थितीची कांहीं कल्पना येथें दिलेल्या उताऱ्यावरून करतां येईल.

## मराठीची व्युत्पत्ति व सद्यःस्थिति

" मऱ्हाठा " हा पूर्वीचा जनवाचक शब्द. संस्कृत नाटकांत " मरहट्ट " असा जनवाचक शब्द येतो तो या " मऱ्हाठा " शब्दाची प्रकृति दिसतो. ' मरता तब हटता ' म्हणजे मरतो तेव्हां हटतो, अर्थात प्राणांतींहि शत्रूस पाठ न दाखविणारा अशी ' मरहट्ट ' शब्दाची व्युत्पत्ति केली आहे. ही व्युत्पत्ति मऱ्हाठ्यांच्या वीरश्रीच्या संबंधानें पाहूं गेलें असतां यथार्थ आहे. तरी अशा रीतीनें क्रियापदांचीं छिन्नभिन्न झालेलीं किंवा छिन्नभिन्न केलेलीं रूपें जोडून झालेल्या आणखी एखाद्या जनवाचक किंवा जनपदवाचक शब्दाचें उदाहरण देतां नाहीं, त्यापक्षीं वरील व्युत्पत्ति विलक्षणच खरी. ' राठोड ' नांवाचे रजपूत मारवाडांत प्रसिद्ध आहेत. जोधपूरचा राजा ' राठोड ' वंशातला होय. ' महा राठोड ' म्हणजे मोठे राठोड; व ' महाराठोड ' शब्दाचा अपभ्रंश " मऱ्हाठा " असें कित्येकांचें मत आहे. एका रजपुताच्या गोत्रांतील लोक आले व ते सर्व महाराष्ट्रभर गांवोगांव पसरले हें म्हणणें अगदीं असंभाव्य होय. तशांत ' राठोड ' गोत्र रजपुतांत आहे पण ' महाराठोड ' असें गोत्र रजपुतांत नाहीं. तेव्हां वरील व्युत्पत्तिप्रमाणें हीही व्युत्पत्ति विलक्षणच. ' मऱ्हाठा '

हा प्रायः ' महाराष्ट्र ' शब्दाचा अपभ्रंश समजतात; [ आणि ] ' मरहट्ट ' किंवा ' महाराष्ट्र ' शब्द चांगला बावीसशे वर्षांचा आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

' भाषेच्या नियमावरून पहातां ' महाराष्ट्र ' शब्दाचा ' महाराठ ' व ' सुराष्ट्र ' शब्दाचा ' सुराठ ' अपभ्रंश व्हावा. पण शिलालेखांत ' महारठ ' व ' सुरठ ' अशीं शब्दांचीं रूपें आपण पहातों. हीं जर रूपें अस्सल खरीं तर ' महारठ ' हा ' महारथ ' शब्दाचा व ' सुरठ ' हा ' सुरथ ' शब्दाचा अपभ्रंश असावा. ' महारथ ' म्हणजे ' मोठा योद्धा ' व ' सुरथ ' म्हणजे ' चांगला योद्धा. ' ' महारथ ' शब्दाचा पहिल्यानें ' महारठ ' व ' मरहट्ट ' असा अपभ्रंश होऊन कालांतरानें या अपभ्रंशाचें पुनः ' महाराष्ट्र ' असें संस्कृत रूपांतर झालें, हें म्हणणें सोपपत्तिक दिसतें.

आमच्या प्रिय अर्वाचीन मऱ्हाठीचा पाया मुकुंदराजाने यादव वंशांतील जैत्रपाळ राजासाठीं विवेकसिंधु नांवाचा ग्रंथ करून घातला; तो त्याच वंशांतील रामदेवरावाच्या राज्यांत चार भावंडांनीं व त्यांच्या अनुयायांनीं मजबूत केला. इतक्यांत अविंध कोसळले व त्यामुळें नुकत्याच मजबूत झालेल्या पायास धक्का बसण्याचा थोडा बहुत संभव होता खरा; पण जसा काय वज्रलेपाचा ज्ञानेश्वरादिकांनीं उपयोग केला होता, तेव्हां तो हालतो कसचा ! पुढें तीनशें वर्षांनीं एकनाथ स्वामी झाले, त्यांनीं व त्यांच्या नंतर लौकरच रामदासस्वामींनीं, वामनपंडितांनीं व तुकाराम बोवांनीं आपल्या रसभरित वज्रलेपाची रेलचेल करून दिल्यामुळें मूळचा पाया अगदीं अढळ होऊन त्याच्यावर एक साधेंच पण टुमदार झोंपडें हल्लीं उठलें आहे. झोपड्याच्या ऐवजीं इंग्रजी भाषेप्रमाणें एक टोलेजंग इमारत उठविणें हें महाराष्ट्रपुत्रांचें काम आहे. पाया मजबूत आहे त्यापक्षीं हवी तितकी हवाशीर व प्रशस्त हवेली वर उठविण्यास सांपडेल.

[ राजारामशास्त्री भागवतकृत ' चार उद्गार ']

## मराठीचा उत्पत्तिकाल

अंतस्थ विचारक्रांति व अन्य भाषेंतून विचार घेणें एवढें कारण एक

भाषा मरून तिच्या जागीं दुसरी नवी उत्पन्न होण्याला बिलकुल पुरें नाहीं. यथायोग्य कारण म्हणजे भिन्न संस्कृतीच्या दोन मानववंशांची टक्कर होऊन त्यांपैकीं एकावर दुसऱ्यांत मिसळून जाण्याची पाळी येणें हें होय. याचे योगानें संस्कृतच्या प्राकृत भाषा कशा झाल्या व प्राकृतांच्या अपभ्रंश हि कशा बनत गेल्या याची संगति चांगली लागते; व इतिहासहि आपणास तेच सांगतो. तेव्हां तसलेंच कांहीं कारण मराठीआदि हल्लींच्या आर्य भाषांच्या उत्पत्तीलाहि लागू पडते कीं नाहीं हें आपण पाहिलें पाहिजे.

आठव्या शतकांतील आरबांची स्वारी जलमार्गें सिंध—कच्छ येथें प्रथम झाली. दहाव्या शतकाचे शेवटीं सिंधूपलीकडे तर त्यांची सत्ता कायम झालीच पण तिच्या अलीकडेहि ते घुसूं लागले. यामुळें तेथील आधीं येऊन वसलेल्या क्षत्रिय कुळ्यांमध्यें खळबळ उडून आत्मसंरक्षणासाठीं त्या दक्षिण-कडे व पूर्वेकडे जाऊन हिंदू लोकांत मिसळल्या. कांहींनीं राज्येंहि स्थापिलीं. या कुळ्या गुर्जर परमार, चालुक्य, चौहाण इत्यादींच्या होत. गुर्जर, चालुक्य यांच्या कांहीं टोळ्या आधीं एकदां हूणांच्या बरोबर आंत घुसल्या होत्या, त्यांनीं गुजराथेंत व महाराष्ट्रांत राज्येंहि केलीं. पण त्यांचें मोठ्या प्रमाणांत प्रयाण नवव्या शतकानंतर झालें. हें चालुक्य—राज्य गुजराथेंत स्थापन झाल्यावरच गुजराथेस ‘ गुर्जर ’ हें नांव मिळालें. आधींच्या गुर्जरांच्या वेळीं मिळालें नव्हतें यावरून व महाराष्ट्रांत ‘ कल्याणकटक ’ या सारखीं आपल्या पूर्वींच्या वसतिस्थानाचें स्मरण करून देणारीं स्थळें दुसऱ्या चालुक्यांनीं (तैलपांनीं) स्थापिलीं, यावरून हि दिसून येतें. हे गुर्जर परमार, चालुक्य, चौहाण मूळचे हिंदू नव्हते हें डॉ० दे. रा. भांडारकर यांनीं चांगलें दाखविलें आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं इ. स. ९ शत-काच्या शेवटापासून पुढें परमार, चालुक्य, चौहाण इत्यादि क्षत्रिय कुळें हिंदुस्थानभर ( कानडा, तेलंगण व खालचे प्रांत वगळून ) पसरलीं. तीं अन्यधर्मीय, अन्य संस्कृतीचीं व अन्य भाषेचीं होतीं. त्यांचीं व ते जेथें जेथें गेले तेथील लोकांची सरमिसळ होऊन, ते कायमचे मिळून जाण्याच्या धामधुमींत नव्या भाषा उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति प्राप्त झाली होती.

पुढें अकराव्या शतकाच्या पहिल्या २४ वर्षांत गजनवीच्या महंमदानें

आपले अफगाण, तार्तर आदि सैनिक घेऊन अनेक वेळ हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या; व वर सांगितलेल्या क्षत्रियांच्या हालचालीस व प्रयाणास आणखी एकदा जोराचा धक्का दिला.

महंमदाबरोबर आलेल्या लोकांपैकीं कांहीं विदेशी लोक येथें वसाहत करुन राहिल्याचा उल्लेख फारसा कोठें मिळत नाहीं हें खरें. पण गुजराथें-तले कांहीं लोक खानदेशांत, राजपुतान्यांतले उत्तर माळव्यांत, पंजाबांतले अयोध्या प्रांताकडे अशी येथील रहिवाशांची पांगापांग मात्र त्यांच्या स्वारी-मुळे झाली असल्यास नवल नाहीं. यानंतर दुसरी धाड घोरच्या महमदाची. ही बाराव्या शतकाच्या शेवटीं आली. या महमदाला हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापावयाचें होतं. यामुळें अन्य संस्कृतीच्या व अन्य मानववंशाच्या लोकांचा मोठा समुदाय आमच्यांत घुसला हें एक; व त्यानें तेथील आमच्या लोकास देशोधडीस लाऊन राजपुताना, माळवा, गुजराथ येथवर वणवण भटकायाला लावलें, हें दुसरें. महंमद घोरी दिल्ली व पंजाब जिंकूनच थांबला नाहीं. त्यानें आपले सरदार पूर्वेकडे बंगाल्यांत व दक्षिणकडे माळवा गुजराथ येथपर्यंत पाठविले. पुढें तेराव्या शतकाच्या शेवटीं अल्ला-उद्दिनानें गुजराथचें कर्ण राजाचें राज्य धुळीस मिळविलें व महाराष्ट्रांत देव-गिरीच्या यादवांचा १२९४ त पराभव केला. महमद गझनवीबरोबर अफगाण, आरब, तार्तर व महमद घोरीबरोबरहि असेच अफगाण, तार्तर, तुर्क इत्यादि परधर्मी व भिन्न कुळांचे लोक अकराव्या शतकाच्या आरंभा-पासून तों तेराव्याच्या शवटापर्यंत हिंदुस्थानांत येऊन घुसले. त्यांनीं आमचा धर्म स्वीकारला नाहीं, तरी त्यास आमच्या भाषा बोलाव्या लागत; यामुळें नव्या भाषा इ. स. ११ व्या शतकापासून १३ व्या पर्यंत येथें उदयास आल्या. मराठींत १३ व्या शतकांत निश्चित स्वरूपाचें वाङ्मय सापडतें. तेव्हां ती निश्चित स्वरू-पाची बोली, या रूपानें तत्पूर्वी एक दोन शतकें * तरी उत्पन्न झाली असली पाहिजे हें उघड आहे. [ कै०, वा. पां. दा. गुणे; विविध-ज्ञान वि. १९२२ ]

---

* भाषेच्या उत्पत्तीपासून वाङ्मयापर्यंत मजल मारण्यास दोनशे वर्षांचा काळ पुरेलसें वाटत नाहीं. यासंबंधीं विद्वद्वर्य राजवाडे व वैद्य यांचीं मतें वाचण्या-जोगीं आहे.



विजापुरचे पादशाहा

[ पृ. ५ अ.

# राक्षसतागडीची लढाई

निजामशाहा, आदिलशाहा, कुतुबशाहा व बेरीदशाहा या चौघां-मुसलमानी बादशाहांनीं रामराजास ठार मारून विजयानगरचें हिंदु राज्य धुळीस मिळविलें. हा प्रकार ज्या तालिकोटच्या युद्धांत घडला असें मुसलमानी इतिहासकार म्हणतात त्यांसच आमच्या बखरकारांनीं राक्षस-तागडीची लढाई असें म्हटलें आहे. कृष्णेच्या काठीं रकसगी व तंगडगी अशीं दोन खेडीं आहेत; तेथें रामराजाच्या सैन्याचा तळ होता. त्यावरून ' राक्षसतागडी ' हें अन्वर्थक नांव या युद्धास देण्यांत आलें आहे. येथें दिलेली बखर या युद्धानंतर लौकरच म्हणजे शके १४८७च्या श्रावणांत लिहिली गेली. परंतु मूळ बखर हातीं लागलेली नसून शके १६०६ मध्यें लिहिण्यांत आलेली नक्कल आपणास मिळाली आहे असें बखरीच्या अखेरच्या वाक्यावरून दिसतें. नक्कलकारानें मूळची बखर अक्षरशः उतरली नसल्यामुळें भाषेच्या दृष्टीनें तिची योग्यता कमी झाली आहे. तरी हि ऐतिहासिक मजकुराच्या दृष्टीनें ती वाचनीय आहे. महाराष्ट्राच्या इतिहासांत जसें पाणिपत तसें कर्नाटकाच्या इतिहासांत राक्षसतागडीचें युद्ध. या युद्धानंतर कर्नाटक परधर्मीय राजांच्या ताब्यांत गेला. विशेषतः अदिलशाहानें विजयानगरचा मुलूख हस्तगत करण्यासाठीं फार धडपड केली; आणि हें काम शहाजी भोसल्याच्या हातून बरेंच तडीस नेलें. सध्याचें म्हैसूरचें राज्य विजयानगरच्या साम्राज्याचा अवशेष आहे.

बखरीच्या प्रारंभाचा भाग कसरीनें खाल्ला असल्यामुळें दुर्बोध झाला आहे. सबब तो व त्यापुढचा कांहीं भाग विस्तारभयास्तव येथें गाळला आहे. हें युद्ध शके १४८६ माघ शु. ५ रोजीं झालें. रामराजा युद्धास निघण्यापूर्वीं आईकडे निरोप घेण्यासाठीं गेला. येथून पुढची हकी-कत या उताऱ्यांत आली आहे.

"तेथोन मातुश्री चंद्रसालेचे घरासी गेलेवरी मातुश्रीनें राजयास समोर येउनु राजयावरून मोबलग थोर थोर जडित वस्ता वलोंदुरी देउनु आपुले महालामधे नेऊन बहुत मेहेमानी केली. मग *राजभुवरानें हे मजकूर तमाम सांगितले जे " च्यार पादशाहा मिळोन हे मुलुकावरी चाली करून येताती. हे धर्ममुलुक, देवस्थान, अनछेत्र व देवब्राह्मण—स्थल असे. त्यासी त्याचे तसनस होऊ नये. त्याकरिता लस्केर कटकबंदी करून आपण जाउनु, त्यासी गोपेमाल देऊनु. आपणासी निरोप देणें " म्हणवोन मातेचे पाया पडला. त्यावरी मातेनें बहुत दिलगीर होऊनु राजभूवरासी बोलो लागली जे " तुवा राजकुवर आमचे+सीत पादशाही होऊ आले. तुरकाचे कांहीं गरगशा जहाले नव्हते. करता जाजती करुनु येताती. तुवा त्याचे सांगाते सला हेजीबाती करणें " म्हणोनु राजभुवराचे दिलसमाधान बहुत केलें. त्यानें न अइकतां तेथून उठोन गेला. मग खुषीनें तिनें रजा दिल्हे. तेथून संगीत महालासी येउनु राजा बैसता पलंगावरी निद्रा केली. रात्रीं राजभुवरानें स्वप्न देखिलें जे आपुले कानीचे मोती तोडून घेत होते. बैसले सिंहासन हिरोन घेत असे. आपणासी दूत येऊनु वोढीत असे. ऐसें पाहुनु घाबिरा होऊनु उठिला. सर्वेचि थोर थोर जोइसी व पंडित व वेदशास्त्री व ग्रामजोसी आपुले वडिलाचे वेळे आदिखानी बहुत दिवसाचे होते. त्यासी बोलाऊ पाठविलें. मग त्यापुढे स्वप्न सांगितलेवरी त्यानीं राजभुवराचें मन समाधान केलें जे " तुझे शत्रु जे कोण्ही येताती ते नास होउनु जातील. तुवा क्षेत्रपती मार्कंडी आउश होउनु राजसिंहासनीं राज्य करिसील " म्हणोन बोलिले. मग आपण आले लोकासी असावलिया

---

१ इडापिडा टाळण्यासाठी तोडगे करून. २ आतिथ्य. ३ नाश, हानी. ३ कान उपटणें. ४ देऊं = शिक्षा करूं. * राजाधिराज=रामराजा. ५ गोंधळ, बाचाबाची. ६ वकीलीस कारकून धाडणें. ७ परवानगी ८ क्षत्रपति=क्षत्रियराजा. ९ असोले नारळ दिले. हा त्यावेळचा निरोप देण्याचा एक प्रकार असावा

व करनाटकी चादरा[10] देऊनु दोहडाविले[11]. मग राजयानें बैसोन पांच हजार होनु ब्रामणासी वाटिले. मग राजयानें बरवे मोहूर्त पाहूनु घोडा सारंगा अमृतनिधान राजबैसता आणऊन त्यावरी बसोन अकरावे तासीं तख्त विज्यानगरा होऊनु[12] बाहीर येऊन उतर तर्फेसी नेव[13]गोजी देऊनु उतरिले. पागा व पीलखाना[14] व उस्तरखाना व थटी[16] व सिकारखाना व जमदारखाना व शरबतखाना व कोठी व फराशखाना[17] व अंबारखाना व तमाम[18] येऊनु नऊगजी आसपास येऊनु उतरीले. शाहार विजयानगरामधें धांडोरा[19] फिरविलें कीं 'येक घोडा व राऊत न राहातां लस्केरासी चालणें' म्हणोनु ताकीद केली. तमाम बाहेर येऊनु उतरिले. खजाना फोडुनु ...... चवघे जण बैसोनु वाटणी दिल्हे. * ... येकून जिनसवार होनु बेरीज १२३५७४११. येणेप्रमाणें वजीराचे हेजबास हुजूर बोलाऊनु जिनसवार हैमीणे[20] दिल्हे. तमाम वजीरासी ताकीद फर्मावले कीं घोडियासी सिले[21] व राऊतासी सिले व टोप व हत्तीस सिले देऊनु हे अवघे भार करुनु बसवणें. यैसे ताकीद केले. मग दुसरे रोजीं वजीरांनी दिदवानी खबर व हरकारेस पाठविले. कुलगणती बितपसील—घोडे सुमार ३,५०,०००, हत्ती सुमार ९७७८, हत्तिणी ७३१८, बाण सुमार ४६०९५७८, बंदुखी पेदे १४८९१५. इटेभालेकरी १२०५६, रामबाण २,३१,३२०, करल बारानी २५०, कोमारबाण ११११२०, भेंडे फिरंगी सुमार ३९२८, छडेबाण बाढाई सुमार ३०४९, बंदुक+९३८, सिलेदगले सुमार२७८५० खुर्द ३३००, सिले टोप सुमार २७८५०, जबरजंग[23] +२२००, हुक्के सुमार १३४३८७०, एकांगी धीरानी ८००००, वडगौडानी ५८९१०, सिले घोडे १४०००, लोहार सुमार १०९०, सिले हत्ती सुमार१८००, हुनरवंद ३००४, सिकारकुत्ते ७०९, पानबुडे १८००, नदी टोकरे[24] सुमार २००, दारु वजण खंडी ९३६५१०॥३॥४

---

१० वस्त्रें. ११ निरोप दिला. १२ पासून, हून. १३ डेरा १४ हत्तीखाना. १५ उष्ट्र = उंट. १६ गाई, म्हशी वगैरे गुरें ढोरें. १७ बैठकी, लोड वगैरे संग्रह. १८ सर्व. *येथें वीस प्रकारचे होन व त्यांची संख्या दिली आहे. त्यांत शिवराई होन आहेत. १९ डांगोरा. २० कसा. २१ हत्यार पात्यार. २२ तोफा. २३ लहान तोफ. २४ नांवा.

या खेरीज मनेवरानां व पुंडानां, पालेगारानी व लिंगारीयानी व अल-
कुरानी व राजबिडीयानी व हिबलकारानी मोबलग गणती सापडीत नाहीं.
जंगलोजंगल व डोंगरडोंगर व दरेखोरे जागा जागा उतरले असे नजरेनें
पाहता करनाटकी लसकरे सांत आठ गांव जमीन उतरले. असे राजभुव-
रानें नउगोजी तुंगभद्रातून पुढे दिधले. णेसरवाना जाऊनु कुस्णानदी
कडका धरून उतरले. राजयानें हत्तीस आणऊनु पाहून सीले कैरविल.*
तमाम हत्ती सीले संदुती करून हत्तीवरी जंबुरे[26], जबरजंग लाऊन अला[27]-
हिदा पेशे[28] नामाजाद कुस्णानदी–तटाकीं उतरवीले. राजभुवरानें का ताव-
रगीरी व कुंदरापिवयेल बरगे दरमायानें येऊनु नउगजी देऊनु उतरले. पेश
नामजादी लस्केर व बाजारबुणगा येऊनु मुसकी नजीक उतरीले. निजाम-
शाहा पादशाहा बहीरी मऱ्हाटा तख्त दौलताबाद यानें भिमरथीस येऊन
उतरोन सुलतान पेरोजाबाद नजीक उतरला. व अक्बर जलालदीन पाद-
शाहा शहादुर्गानजीक उतरला. व इभराइम कुतुबशाहा–तेलंगण तख्त
गोलकोंडे–यानें मुदगल व रायेचूर दरम्यानें उतरला. चहु तर्फेनें मुसल-
मान पातशाहा यानीं लस्कर व लुटावरे व पेंढारे व वणजारे व चोर
पाईक[29] नदी धरून उतरले. राजभुवराचे मुलुकामधें चिधिचोली[30], बंद धरून
आणु लागले. तमाम मुल्रुक हुल्ली[31] होऊन चालिले. राजभुवरानें आपले
लस्करासी ताकीद करून बाजारबुणगा नजीक च्यार हजार घोडा, व पाव-
प्यादे पंनास हजार ठेऊनु तमाम वजीराने व राजबिडीयानी व राजकों-
मारानी व येकांगधीरानी व सपरीगारानी व रजपुतानी व क्षेत्रीयांनी व
दलवीयानी व मनेवारानी हे अवघे जाऊनु राक्षसत्तागडीस जाऊन नजकि
उतरले. अराबों[32], भांडी फिरंगी गाडियावरी मुस्तेदी[33] करून जोडुनु बाण
तमाम पावसुर बाणाईत बैलावरी दर बैलामी बाण सुमार २८ येकुन बाण
सुमार ८०,०,०० व राजबाण व कोमारबाण येसे उंटावरी अराब पुढें
उतरवीलें व बारूं[34], गे[35]लांले व तुव खिजतना इ ने सांगाते घोडा, राऊत

---

*येथें ९० हत्तींचीं नावें दिलीं आहेत. २५ योजनें २६ लहान तोफा. २७ निराळा,
२८ पुढे. २९ पायदळ शिपाई. ३० लूट. ३१ गडबड, दंगा. ३२ गाडे.
३३ तयार. ३४ दारु. ३५ गोफण.

व पावपाद्ये असपास दरम्याने ठेवणें व बिमलया नाईक, त्रिवेंगलपा नाईक व कार्तिकविरपा नाईक हे तीघे जणासी राजभुवरीं कपडे देऊन मुसलमान पातशाहीसी झगडा करावे (यास) पेस नामजादी[36] पाठविलेवरी त्यानीं येउन आपुले करनाटकी कुल लस्केर देखील राक्षेमतागडी नजीक उतरिले. हे खबरी जासुदानी व काल्बारानी व हरकारेयानी जैसे जरजरा[37] तिलतिल खबर घेउनु आपुले पादशाहासी सांगितलें. मग मुसलमान पातशाही गांव पांच कोसावरी येउनु उतरले वरी निजामशहा मऱ्हाठा पातशाही व ईभराईम कुतुबशहा तेलंगण पातशाही हे दोघे जण फुटोन अलाहिदा लस्केर घेउनु तेलाव[38] फिरो लागले. ते पाहोन राजभुवरानें लस्कर पायदल फौज करून भार[39] रचिले. अली येदलशाहा पातशाहा कन्नडजाण यानें आपुलें कुल लस्केर घेउनु येक फौज करून उभा राहिला. इमामनमुळीक, पातशाहा वराड देश, आपुले कुल लस्केर घेऊनु येकभार रचिले. असे तीनी च्यारी पातशाहा च्यारो तर्फे भार करून राहिलेवरी करनाटकी पाऊप्याधे व घोडेस्वारानी येकदुमाले[40] होउनु अरोबा मर्वे[41] रचून पुढे चालुनू निजामशाहा बाहिरी पातशाहा व कुतुबशाहा तेलंगण तर्फे झगडा केले. बाणाबाणी जहाले. व त्यामधे व यामधे लस्केर बहुत जाया जाला. दोहीं तर्फेचे लस्केर जखमी बार जहाले. निजामशाहा बाहिरी पादशाहा व कुतुबशाहा तैलंगण यानें दीड कोस माघारे जाऊनु अली येदलशाहा कन्नडजाण व ईमामनमुळीक वराडदेश पादशाहा यानें आपले जागा मुस्तैद दोनी फौजा होते. त्यानीं येउनु झगडा दिल्हे. जखमी व पाडाऊ जाहाले * बीतपसील. हे रणजखमी व पाडाऊ जाहालेवरी राजभुवरानें ऐकोन अपुले तरफेचे वजीरास व लोकासी व बाजे[42] खलकोसी कपडे पाठविले. आपुले लोकासी सांगोन पाठविले जे "आपण येइजे तों झगडा न करणें. लोक बहुत जाया होताती. तमाम जमा जाहालियावरी शर्तमर्दीनें[43] झगडा

---

३६ अधिकार देणें, नेमणें. ३७ थोडी थोडी. ३८ शत्रूची पाहणी करण्यासाठी. ३९ व्यूह. * येथें मुळांत जखमी व ठार झालेल्या लोकांची यादी दिली आहे. त्यांत निज्यामशाहाकडील लोकांत सिवाजी काटे व खेरोजी भोसले हीं नांवे आहेत. ४० एकामागे एक उभे राहून. ४१ इतर. ४२ कारस्थानी लोक. ४३ पराक्रम.

केला जाईल '' यैसे भोसल्या दलवीयासी पाठउनु दिल्हे. अली येदल-
शाहा पाद्शाहा कनडजाण यापासी छरीयेपा नाईक जामदार याला हेजी-
बातीस पाठाविले जे " तुवा अपण चालोन येउनु अम्हापासी येउनु
मांडीवरी बैसून फर्जंद[४४] म्हणवीले, कि तुम्हाकडे अपण न येऊ म्हणोन यैसे
शर्तनामा[४५] केलेवरी रायेचूर व अदवानी हे दुदलोणी बद्दल दिल्हे. आपुले
सब्देमधें पाद्शाही जमजम करुनु असावे यैसे असतां तुम्ही अपुले मुलुका-
मधून तिघ पाद्शाचे लस्केरासी वाट देउनु अपण कुल लस्केरसाहित येउनु
मदती होउनु उतरले असे. बहुत बरें. चार पादशाही मिळुन आलीया
काय होणार असे ? पेस्तर[४६] तुमचे मुदा काय कैसे असे '' म्हणोन. मग
अली येद्लशाहा यानें जबाब दिल्हे. जे " तिघे पादशाही लस्केर जोरा-
वार होउनु माझे मुलुकामधून आले. मजपासी जोरावार नाहीं. कुल
लस्कर व मुलुक खराब केले. हे राजवटेमधे आम्हीं पडलों नाहीं. हें तों
जैसे फर्जंद म्हणोन मांडीवरी बैसोन सव सफध दिल्हे असे त्यासी खता[४७]
नाहीं. तुम्ही कांहीं दिलगीर न होणें. '' यैसे हेजीबा सांगातें खलबत
करुनु हेजीबासी शाल व आसावली व तेजी[४८] व हस्तकडेंग[४९] व कुडंकी[५०]-
यासी मोती जोडा १ दिल्ह. व हत्ती छावा येक १ दिल्हे. व हेजीबा
सांगात मोरक्तसर[५१] दाह जण आले होते त्यासी शाला येक येक देउनु हे-
जीबासी पानें देउनु दोहडाविलेवरी हेजीब जाउनु राजभुवरासी हे हकी-
कती बयाणें[५२] अर्ज केले. हेजीब सांगाते अली येद्ळशाहाचे हरकारे[५३] सीवा-
जी गोपीनाथ जमारीकादा होता. त्या सांगातें तीन तास पासुनु पांच तास
परियंत खलबत करुनु हरकारा मशारनुलेसी येक दुस्त कपडे दिल्हे. व
मेतीयाचा तुऱ्हाइ येक १ व कमरशाल १ दिल्हे. बहुत मेहमानी केली.
अली येद्लशाहासी फिरंगी[५४] व कमर गुर्दा शोर मोलाचा देउनु पाठविले. हे
खबर निजामशाहा बहीरी व कुतुबशाहा तेलंगण व अकबर जलालदीन
मोगली पाद्शाहा यासी दिदवानी हरकारे यानीं लिहून पाठविलें जे

---

४४ मुलगा. ४५ करार; वचनप्रमाण. ४६ पुढें. ४७ खोट. ४८ घोडा.
४९ वलय, हातकडे. ५० चोकडा. ५१ वजनदार लोक. ५२ वृत्तांत कथन.
५३ जासूद, दूत ५४ तरवार.

“ अली येदलशाहा सांगाते राजवटा लाविली असे ” म्हणोन. मग तिघे पादशाहा यानीं येदलशाहा पादशाहा नजीक हरकारेसी पाठविले. “ अम्ही अवघे मिळोन राजभुवराचे मुलुकगीरी कराव्या आलों असों. दरम्याने तुम्ही त्या सांगाते राजवटा कारिता हें तरी बरें नव्हे. अवघे येकवट होउनु गोशमाल देणं लागतें. अलाहिदा राजवटा केलीयानें काम होऊन येत नाहीं. तरी तुम्ही · त्यामधें मिलालीया आम्ही कांहीं फिरोन जाणार नाहीं. शर्तमर्दीनें मुलुकागेरी करून. तुम्ही आम्हांबराबरी मसलतीस येणें ” म्हणोन. तरी येदलशहानें सांगोन पाठविलें कीं “ तुम्हाबरोबर असों. जें काये दिलचे मुदा असेल ते कबुल ” म्हणोनु. मग हरकारेसी तश्रीफें देउनु रवाना केले. राजभुवरानें आपण येऊन राक्षेसतागडी नजीक उतरले. रणथाबा चौधार राक्षेसतागडीचे मैदानामधें घातलें. करनाटकी लस्केर तमाम येउनु उतरले. झगडेसी सुरु जाहाले. मुदती रोज २७ झगडा जहाला. जलालदीन अकबर पादशाहा तख्त जालनापूर यानें मोगल व कर्ण, रजपूत, राहाठोड हे नाल्तवाडी दरम्याने उतरले यामधें व त्यामधें रायबागानजीक झगडा रोजबरोज होऊं लागला. करनाटकी वजीर, व यैनलमुलुक व अंकुशखान बारगीर वजीरानी पारखे होउनु येदलशाहा तर्फेसी आले. जलालदीन अकबर पादशाहा व निज्यामशाहा पादशाहा बहीरी व कुतुबशाहा तेलंगण हे तिघे मिळून राजफौज करून चालोन आले. राजबिडे, पाऊप्याद्ये, हसम झगडा दिल्हे. पहिले तासपासून अकरा तासपावेतो झगडा जहाला. रण दुतर्फे पडिले. राजभुवरानें राजबिडे व बाजे वजीरासी व लोकासी बोलाऊन खलबत केलें. सद्रहु वजीर अवघे मिळून राजभुवरास अर्ज केले जे “ मुसलमान पादशाही लस्केर येकवट होउनु येताती. आम्ही त्याचे तोंडेसी उभे रहातो. जैसे मारावे तैसे झगडा फत्ते करितो. अली येदलशाहा व इमामनमुळीक हे दोघे पादशाही लस्कर आपुले जागा होऊन पुढे येताती. दोघे पादशाही झगडा देत असे. रोजबरोज रण पडीत असे. ह्यानीं दगा देउनु सापडावितील. ह्याचे पतेरा नाहीं. ते तर्फेसी मुदाम दाहा हजार घोडा व पन्नास हजार पायेदळ त्याचे तोंडेसी राखणें. आम्हीं दिलेंपाखीनें मेंशाकत करून. दोन्ही

---

५५ मानाचा पोषाख. ५६ मनापासून. ५७ मेहनत.

पादशाही लस्कर दगा देतील " येसे सिरभोई ठेऊन रोशन केलेवरी राज-भुवरानें वजीरासी कपडे देऊन दोहडाविलें. जागा जागा आपुले गड कोटासी इतबारी लोकासी राजभुवरानें पाठविले. * बीतपसील.........

येणे प्रमाणें कपडे देउनु पाठविले. राजफौज झगडा जहाले. निज्यामशाहा बाहिरी व कुतुबशाहा तेलंगण मोडा जहाला. अकबर जलालदीन मोगला-वरी झगडा घातला. त्याचे मदतीस कोण्ही आले नाहीं. निज्यामशाहा बाहिरी व कुतुबशाहा तेलंगण हे मोड जहालें. मोड होउनु येक जागा भार रचिले होते. लस्कर करनाटकी झगडा करुनु परतुन येता मागुती हे फौज लस्कर झगडा दिल्हे. हे करनाटकी लोकांनीं ४०००००० हजार बाण येकायेकी बत्ती लाविले. त्या खाली दोघे पादशाहाचे लस्कर मोबे[६०]-लग झगडीयांत पडीलें. कच खाऊन आपुले जागेसी उतरले. मोगली लोक मागुती येउनु अलाहिदा झगडा दिल्हे. करणाटकी लोक बहुत पडीले. इतुके झगडा देउनु राजभुवराचे लस्केर जाउनु आपुले जागा उतरले. राजभुवरानें आपण राजहौश मुस्तेदी रामहत्तीवरी बैसोन कुल लष्कर दोघे तिघे पादशाहावरी चालिले. भांडे थोर थोर भरुनु भांडेचे बहुत मार जहाले. बहुत कच होऊन लस्कर मोड जाहाले. त्यावरी राजभुवरानें बहुत खुर्षाहाल होउनु नउगोजीस परतून येउनु उतरले. करनाटक लोक तिनी पादशाहा लस्करासी झगडा करून [६१]भागोन बेहुशार होऊन लस्केर उतरलें होतें. अली येदलशाहा व इमामनमुलीक वराडदेश पादशाहा हे दोघे जण पादशाहा एकाएकी मुस्तेदीहून राजभुवरावरी घोडे केला. त्याचे [६२]जिनों उतरून बेखबर होते. पाऊप्यादे लोक रोटीपोळी करून घेत होते. तो येही जाऊन सभा पडोन खतर केले. राजभुवर रामराज अली येदलशाहा पादशाहा कन्नडजाण हाता खाले पाहून जाब बोलिला जे " तुवा माझे लेक म्हणोन बोलीली होतासी. तुवा येकायेकी दगा करूनु मजवरी सभा पाडि-लासी. आता माझें काये [६३]तंतबीर चालणार असे ? माझे लस्केर तमाम पडीले " म्हणोन. ताजा कपडे, पुरतकालीक दाईव, टोपीस हिरा

---

५८ सांगितल्यांवर. ५९ विश्वासू. * येथें पंधरा सरदार पंधरा ठिकाणीं पाठविलें त्यांची यादी दिली आहे. ६० पुष्कळ. ६१ थकून. ६२ खोगीर. ६३ उपाय.

मोती मानीकाचे कुलाब घालून मावीशाला पांघरून, अपुले देवासी स्मरण करून अली येदलशाहासी सांगोन पाठविलें जे " तुवा आपण फिरंग घेऊन येकांग लढाई करावे. दुसरीयानें आपुलीयावरी हात देऊ नये " म्हणौन. त्यापासी सौगंद[६४] घेतले. मग अली येदलशाहानें आपण येकांगी भिडीतां नजीक उभे राहुन डोसकी कापिले. हे खबर च्यारो पादशाहासी जाहीर जाहाले. करनाटकी लस्केर तमाम चिंदीचोल जहाले. पलोन हत्ती व घोडे, उंट, बारु, गलेले व बाण सुमार व खजाना तमाम लुटालुटी जहाले. कुल लस्कर मिलोन विज्यानगरासी गेले. राजभुवरांचे माये व तिघीजण बाइला हे खबर ऐकोन माहालासी आगी लाऊन दिल्हे. माणीक, मोती व हीरा, रत्न तमाम मुसलमान लस्कर पादशाहा जाऊन कटकेंबंद[६५] उतरोन मुदाम १४ रोज शहरामधे सोदीसोदी[६६] केले. मोबलग माल सांपडिले. मुलु-कागिरी[६७] तिनी पादशाहा यानी केले. अकबर जलालदीन पादशाहाचे लस्कर परतून गेले. व इमामनमुलुक हे अपुले मुलुकासी गेले. निज्यामशाहा बाहिरी आपुले मुलुकासी गेले. अली येदलशाहा यानें मुलुकगीरी करीत चालिले पिनगोंडेसी जाउनु वेढा घालून तिनी महिने लढाई केली. मग कोट वर-जार होउनु काबीज करू दिल्हे नाहीं. मग तेथून तोरगलासी येऊन वेढा घातले. स्थल वेंकटी झगडा केले. कांहीं काबीज होऊं दिल्हे नाहीं. मग तेथें लस्कर ठेऊनु अली येदलशाहा पादशाहा विज्यापुरासी आले. रक्ताक्षी नाम संवछरे वैशाख वदि अस्टमी सोमवारी १० वे तासी श्रवण नक्षत्रीं भिमासीम वख्तीं रामराजानें जीव दिल्हे ऐसे खबर करनाटकी पादशाहाचे राजा जाहीर जहाले. अली येदलशाहानें च्यारी पादशाहासी मेहमानगी केली. मग ते बहुत खुषी होऊन गेले. येदलशाहानें राजयाचे सीर कासीस देऊन पाठविले. त्याचे विलायती गड कोटासी काबीजबदल घोडे राऊत देऊन पाठविताती. पेस्तर अहवाल नजरे पडालिया बयानवरा[६८] बखेर पाठउन देऊन. आजी तागाईत छ २५ माहे मोहरम रोज च्यारि संदेस लिहुनु पाठविले असे. ( द्वितीय संमेलन वृत्त पृ. १६८ )

---

६४ शफथ. ६५ सैन्यानिशीं. ६६ शोधाशोधी. ६७ मल्ख कबज्यांत घेणें. ६८ तपशीलवारं.

# दामाजीपंत व विठ्या महार



सातारकर महाराजांच्या दप्तरांत एका महजराच्या नकलेची नकल सांपडली. त्यांत शहरांत व खेड्यांत महारांना कोणकोणते हक्क पूर्वापर आहेत त्यांची याद दिली आहे.

मूळ महजराचा प्रस्तुत खर्डा सारांशरूप आहे. या सारांशरूप महजराचा मथळा असाः —

> " बादशाहाचा हुकूम शिका मोर्तब व दामाजीपंत कारकून याचे हातचीं कलमें "

म्हणजे मूळ महजरावर बेदरच्या पातशाहाचे शिक्का मोर्तब होते आणि तो खुद्द दामाजीपंत मंगळवेढेकर यांच्या हातचा होता.

महारांच्या हक्काचा तपशीलवार निर्देश केल्यावर खालील वाक्यें ह्या सारांशांत आलीं आहेतः —

> " हें देणें पाछायाचें. व दामाजीपंत याच हातचा कागद असे. विठ्या महार, मंगळवेढ्याचा, पाछायाचे कामीं पडला. व दामाजीपंत कामीं पडला म्हणोन पादशाहाणीं विठ्या महारास हक करून दिल्हे "

या वाक्यानंतर आणीक कांहीं राहिल्या साहिल्या हक्कांचें गणन करून पुनः खालील हकीकत लिहिली आहेः —

> " बेदरास जाऊन पाछाव याची लेक बेगम आनली. आणि पाछावपासी हात जोडोन उभा राहिला. बाच्छाव याचे घोड्याची जागल करावयास गेला. तों तेथें मांग चोरीस आला. तेव्हां माहार जागा होता. मग बाच्छाव यास जागे केलें. विश्वासूख माहार ठरला. म्हणोन घोडा वरातीस दिल्हे. अंबरनाक महार यास कृपा करून दिल्हे. बाच्छाव याचीतील कोठीतील कोठाडीं लुटल्या त्याजबदल तगादा दामाजीपंतास केला. ते वेळेस श्रीविठोबाचे विठ्या

> महारानें रूप धरून बाच्छाव याची रसद पोहोचती केली. दामाजीपंताचा पैका भरून विठ्या माहारानें दिल्हा. आणि पाच्छाणें पुन्हा पावती दिल्ही. व दामाजीपंत याजपासी विठ्या माहारानें आणोन दिल्ही. बाछाव याणीं चौकशी केली.व दामाजीपंत याची चौकशी केली. त्याजवरून विठ्या महार यास हक दर उपकार पोटास भाकरी व बसावयास जागा करून दिल्ही. माहाराचे बंदोबस्त करून दिल्हे. ''

महजरांतील या हकीकतीवरून असें दिसतें कीं मंगळवेढ्यास दामाजीपंत कारभारी ऊर्फ कमावीसदार असतांना विठ्या नांवाचा माहार हि मंगळवेढ्यास होता. दामाजीपंताच्या कारकीर्दीत देशांत कडाक्याचा दुष्काळ पडला. तेव्हां दामाजीपंतानें लोकांकडून धान्याचीं सरकारी कोठारें लुटविलीं. त्या कालीं वसूल धान्याच्या रूपानें घेत असत व नंतर धान्य विकून येईल तो पैका रसद म्हणून राजधानीस पाठवीत. कोठारें लुटविल्यावर रसदीचे पैसे राजधानीस पाठविण्यास दामाजीपंताजवळ सहजच नव्हते. तशांत चुगलखोरांनीं कोठारें लुटविल्याची बातमी पातशाहापर्यंत बेदरास पोहोचविली. रसदीकरितां पातशाहाचें धरणें दामाजीपंतावर येऊन बसलें. द्रव्य कोठून आणावें अशा विवंचनेंत दामाजीपंत पडले. पंताच्या संकटाचा साक्षीदार मंगळवेढ्याचा विठ्या माहार होता च. त्याच्याजवळ बापजाद्यांनीं पुरून ठेविलेलें किंवा इतर कोणत्या तरी कारणानें जमा झालेलें द्रव्य होतें. व तें कर्मधर्मसंयोगानें रसदीची फेड करण्याइतकें होतें. तें द्रव्य विठ्ठलरूपी परमेश्वराचा, मंगळवेढच्या विठ्या नांवाच्या माहाराच्या अंगांत, संचार होऊन दामाजीपंताकडील रसद म्हणून बेदरास सरकारांत भरण्याची विठ्या महारास परमेश्वरप्रेरणा झाली. विठ्या माहार मजल दर मजल बेदरास गेला; आणि त्यानें पातशाहाच्या कचेरींत दामाजीपंताकडील म्हणून रसदेचा भरणा केला, पावती घेतली व ती दामाजीपंतास आणून दिली. अर्थात दामाजीपंताचें संकट वारलें व धरणें हि सुटलें.

दामाजीपंताच्या रसदेची अशी ही ऐतिहासिक हकीकत प्रस्तुत महजरावरून उपलब्ध होते. ती देऊन प्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे तिचा इत्यर्थ काढतात तो असा आहे. यःकश्चित कमावीसदारानें धान्याची खंडोगणती कोठारें लुटविणें, बादशाहाकडील धरणें येऊन बसणें, माहारानें गुपचुप रसद जाऊन भरणें वगैरे हा सर्व प्रकार यद्यपि वास्तविक, तत्रापि आश्चर्योत्पादक होता. कवींनीं लाघव करून ऐतिहासिक हकीकतीला आपल्या कल्पनेनें काव्यरूप दिल्हें, व भगवान् भक्तवत्सल जो श्रीविठ्ठल त्यानें माहाराचें रूप घेऊन दामाजींची रसद भरली, रसद भरतां क्षणीं च महाररूपी परमेश्वर पातशाहाच्या डोळ्या देखत गुप्त झाले वगैरे कविकल्पना रचिल्या. परमेश्वर माहाराच्या हृदयांत शिरून, तत्द्वारा एका दयार्द्र गृहस्थाचा बचाव झाला ही खरी ऐतिहासिक हकीकत प्रस्तुत महजर न सापडता तर कल्पना कोटीतील असावी असा जसा आजपर्यंत तर्क करीत होतों तसा च पुढें करीत राहिलों असतों.

[चतुर्थ संमेलनवृत्त पृ.५३–५५.]

---

# मालोजी व विठोजी



बाबाजी भोसल्याचे मुलगे मालोजी व विठोजी हे भीमानदीच्या कांठीं कांहीं गांवांची पाटीलकी संपादून होते. तेथून ते निजामशाहाच्या दरबारीं गेले आणि तेथें तरवार गाजवून त्यांनीं अधीक ऐश्वर्य संपादन केलें. पुढें मालोजी इंदापूरच्या लढाईंत बादशाही कामांत खर्ची पडला. यामुळें कांहीं वर्षेंपर्यंत विठोजीनें सरदारी चालविली. शेवटीं विठोजी मरण पावल्यानंतर त्याचे व मालोजीचे मुलगे निजामशाही दरबारांत मलिकंबराच्या हाताखालीं राहून सरदारीचीं कामें करूं लागले. येथपर्यंतची हकीकत येथें दिलेल्या शिवभारतांताल श्लोकांत आली आहे. शिवभारत हा ग्रंथ परमान-

न्दकवीनें शिवाजीमहाराजांच्या हयातींत व त्यांच्याच आज्ञेवरून लिहिला असें त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. यामुळें बखरींतील हकीकतीपेक्षां शिवभारतांतील मजकुराचें प्रामाण्य बलवत्तर मानलें पाहिजे.

दाक्षिणस्यां दिशि श्रीमान् मालवर्मा नरेश्वरः ।
बभूव वंशे सूर्यस्य स्वयं सूर्य इवौजसा ॥ १ ॥
स पुण्यदेशे धर्मात्मा निवासं स्वमकल्पयत् ।
तन्वन् सौराज्यमधिकं नदीं भीमरथीमनु ॥ २ ॥
महावंशसमुद्भूतामुमां नाम यशस्विनीम् ।
उपयेमे स विधिना सावित्रीं सत्यवानिव ॥ ३ ॥
स शंभुप्रीतये शंभोर्भक्तः सागरसंनिभम् ।
मधुरं खानयामास तडागं शंभुपर्वते ॥ ४ ॥
एतस्मिन्नेव समये दुर्गं देवगिरिं श्रयन् ।
निजामशाहो धर्मात्मा पालयामास मेदिनीम् ॥ ५ ॥
तमसेवंत सततं यवनानामधीश्वरम् ।
सर्वे यादवराजाद्या दाक्षिणात्याः क्षमाभुजः ॥ ६ ॥
तथा येदिलशाहोऽपि पत्तने विजयाव्हये ।
निवसन् राज्यमकरोद्यवनो यवनैर्वृतः ॥ ७ ॥
अथ केनापि कालेन निमित्तेन बलीयसा ।
येदिलेन निजामस्य विरोधः सुमहानभूत् ॥ ८ ॥
तदा तं मालभूपालं कालं प्रति महीभृताम् ।
श्रुत्वा निजामो मेधावी सहाय्ये समकल्पयत् ॥ ९ ॥
ततस्तस्य प्रियं तत्र कर्तुमप्रातिमद्युतिः ।
गत्वा देवगिरिं माल–महीपतिरुवास ह ॥ १० ॥
अथ विठ्ठलराजोऽस्य भ्राता भीमपराक्रमः ।
समेतः स्वपताकिन्या भेजे धारागिरीश्वरम् ॥ ११ ॥
यद्यप्यासन् निजामस्य सहायास्तत्र भूरिशः ।
तथापि मालवर्मैव सर्वेभ्योभ्यधिको भवन् ॥ १२ ॥

संतानार्थी स नृपतिर्धर्मपत्नीसमन्वितः ।
देवदेवं महादेवमारराध महाव्रतः ॥ १३ ॥
अथ कालेन महता देवी तस्य महौजसः ।
आनंदयन्ती दयितं ससत्वा समजायत ॥ १४ ॥
ततः सा दशमे मासि प्रस्फुरद्राजलक्षणम् ।
सुमुखं शुभवेलायां सुषुवे सुतमद्भुतम् ॥ १५ ॥
अथ वर्षद्वयेतीते द्वितीयमपि नन्दनम् ।
लेभे महीपतेः पत्नी मूर्तिमन्तमिवोत्सवम् ॥ १६ ॥
तौ शाहश्च शरीफश्च सिद्धनामांकितावुभौ ।
ववृधाते श्रिया सार्धं कुमारौ कुलदीपकौ ॥ १७ ॥
प्रपेदे पंचमं वर्षं शरीफस्याग्रजो यदा ।
तदा महोदारवर्मा मालवर्मा महीपतिः ॥ १८ ॥
महत्या सेनया सार्धं दधानोऽभ्यर्हितं धनुः ।
प्रस्थापितो निजामेन समरायेंदिरापुरम् ॥ १९ ॥
तत्रात्यर्थं युध्यमानः सबलैरभियायिभिः ।
पुरोधाय प्रतिभटान् प्रययावमरावतीम् ॥ २० ॥
ततः शाहशरीफौ च पुरस्कृत्य प्रतापिना ।
चक्रे विठ्ठलराजेन राज्यं तदखिलं स्थिरम् ॥ २१ ॥
ततः शरीरं शाहस्य प्रविष्टे नवयौवने ।
ससंबाधेव शिशुता संचुकोच शनैः शनैः ॥ २२ ॥
दानवीरं दयावीरं युद्धवीरं महौजसम् ।
मालभूपसुतं शाहं वरलक्षणलक्षितम् ॥ २३ ॥
दृष्ट्वा यादवराजेन कन्या कुवलयेक्षणा ।
दत्ता सदक्षिणा तस्मै जिजूर्विजयलक्षणा ॥ २४ ॥
सुतां विश्वासराजस्य दुर्गां नाम्नाथ सद्गुणाम् ।
शरीफोऽपि महाबाहुर्भव्यां भार्यामविन्दत ॥ २५ ॥
अथ विठ्ठलराजे स्वे पितृव्येऽपि दिवं गते ।

महावीरेण धीरेण शाहराजेन धीमता ॥
राज्यभारः स हि महान् दध्रे बत निजे भुजे ॥ २६ ॥
संभः खेलश्च मल्लश्च मंबो नागश्च पर्शुकः ।
त्र्यंबकश्चापि ककश्च भ्रातरः सोदरा अमी ॥ २७ ॥
पुत्रा विठ्ठलराजस्य सुत्रामसमविक्रमाः ।
मालभूपालजौ शाहशरीफौ च प्रभाविणौ ॥ २८ ॥
निजामस्य प्रियकरा कराकृष्टशरासनाः ।
परं न गणयामासुरंबरस्य मते स्थिताः ॥ २९ ॥

---

# विठोजीचा वडील मुलगा संभाजी याचा मृत्यु



विठोजी मरण पावल्यानंतर निजामशाहानें एक वेळ मोठा दरबार भरविला. तो संपल्यानंतर सर्व सरदार आपापल्या हत्तीवरून व घोड्यावरून घाईघाईनें जात असतां खंडागळ्याचा हत्ती बेफाम होऊन लोकांना मारूं लागला. तेव्हां लुकजी जाधवरावाचा मुलगा दत्ताजी यानें तो हत्ती ठार केला. हें पाहून खंडागळे व जाधव यांच्यांत झटापट सुरू झाली. त्या वेळीं भोसल्यांनीं खंडागळ्याची बाजू उचलली व विठोजीचा वडील मुलगा संभाजी याच्या हातून दत्ताजी जाधवराव ठार झाला ! ही बातमी ऐकून लुकजीनें येऊन संभाजीस ठार केलें ! आणि आपला जावई शहाजी याजवरही वार करून त्यास मूर्च्छित केलें. शेवटीं निजामशाहानें लुकजीस दोष देऊन ही मारामारी थांबविली. यामुळें लुकजी निजामशाही दरबारांतून निघून मोगलास मिळाला. अशी हकीकत तंजावरच्या शिलालेखांत दिली आहे. तिचा काल शके १५४४ चा फालगुन शुद्ध पक्ष असावा असें येथें दिलेल्या विठोजीच्या सात मुलांच्या वाटणीपत्रांवरून दिसतें. या पत्रांत विठोजीचा वडील मुलगा संभाजी याचें नांव नसून इतर सात भावांचीं नांवें आहेत. शके

१५४४ च्या माघ अमावास्येस संभाजी भोसल्याच्या नांवें एक हुकूम सुट-लेला उपलब्ध आहे व त्यानंतर एकच आठवड्यानें झालेल्या या वाटणी-पत्रांत त्याचें नांव नाहीं. यावरून त्याचा मृत्यु या आठवड्यांत झाला असला पाहिजे. यानंतर लौकरच शहाजीस पहिला मुलगा झाला. त्याचें नांव संभाजी असें ठेवण्यांत आलें.

या खेरीज शके १५४४ मध्यें भोसले घराण्याची सांपत्तिक स्थिति कशी होती याचा अंदाज करण्यास व विठोजीचा मुलगा मालबा हा मालो-जाच्या मृत्युनंतर जन्मला असें गृहीत धरून मालोजीचा मृत्युशक ठरविण्यास हें पत्र उपयोगी पडण्याजोगें आहें.

१५४४ फाल्गुन शुद्ध ८

सके १५४४ दुंदभी नाम सवतछरे फाल्गुण सुध अस्टमी ८ वार गुरुवार सु॥ सलास इसरईन अलफ तेरीख ७ माहे जमादिलैवल ते दिवसी राजश्री रामेशभट व राजश्री चिंतामणी भट गोसावी यासि. राजश्री खेलोजीराजे व राजश्री मंबाजीराजे व राजश्री नागोजीराजे व राजश्री पर-सोजीराजे व राजश्री त्रिंबकजीराजे व राजश्री ककाजीराजे लिहुनु दिधलें ऐसें जे. तुम्हांपासीं राजश्री ताबाई आवानें ठेवणें ठेविलें होतें. बितपसील

| नख्त एकवीससे होनु | सोने एकसे आठ तोळे |
| --- | --- |
| २१०० | १०८ |

हे तुम्ही आमचे आम्हासी खडकीस आणौनु दिधलें. पैकीं मालबा रायाचा वाटा मालबासी देउनु वाटे सा आमचे आम्हांसी पावले. बितपसील

| नख्त अठरासे १८०० | सोने तोळे नऊद ९०८ |
| --- | --- |

एणें प्रमाणें आम्हांसी पावले. तुम्हासी व आपणासी अर्थाअर्थ समंध नाहीं.

गोही

| एकोजी जैतजी भोसले | भिकाजी मोहिते |
| --- | --- |
| मकुंद गोपिनाथ पत्रप्रमाणें साक्ष | तिमाजी भोसले |

[ खंड १५ लेखांक ३९५ ]

---

१ साक्ष.




बाह्मणी राज्य मोडून त्याच्या जागी पांच शाह्या प्रस्थापित झाल्या.
त्यांची नांवें:—

१ वऱ्हाडची इमादशाही शके १४०६—१४९६ ही अहमदनगरच्या निजामशहानीं बुडविली

२ बेदरची बरीदशाही शके १४४८—१५३१ ही विजापूर आदिलशहानें बुडविली

३ गोवळकोंड्याची कुतुबशाही शके १४४०—१६०९ औरंगजेबानें ही बुडविली.

४ अहमदनगरची निजामशाही शके १४१२—१५५६ ही शहाजहानानें बुडविली.

५ विजापूरची आदिलशाही शके १४११—१६०८ ही औरंगजेबानें बुडविली.

# पुणें ते सातारा रस्ता.


पुणें
आळंदी
कात्रज
सिंव्हगड
शिवापूर
पुरंदर
वज्रगड
बोरगांव
शिरवळ
खंडाळा
पांडवगड
सुरूड
सालपें
देऊर
वैराटगड
चंदन
वंदन
वर्धनगड
सातारा
रहिमतपूर
गणेशवाडी
पाल

# पाटीलकीसाठी खून व धर्मांतर



मौजे देवराष्ट्र, कर्यात वांगी प्रांत पन्हाळा येथील मुसलमानी अमदानींतील पाटीलकीची हकीकत अशी आहे ( सनदपत्रांतील माहिती पान ९८ )—

संभाजी भोसले याणीं पाटिलकी केली. तो पाटिलकी करीत असतां त्यांस देवाज्ञा जाली. त्याचे पोटीं लेक चौघे जण. वडील तुकोजी, त्याचे पाठीचा काळोजी, त्याचे पाटीचा बाळोजी, ( त्याचे पाठीचा हिरोजी ), ऐसे चौघे जण भाउ. त्यांमध्यें तुकोजी वडील. तो पाटीलकी करूं लागला. ऐसें असतां पांढरीचा विनाशकाळ आला. मूळ कन्हाडीहून रसद विजापुरास जात होती. त्यास रसद मौजे मजकूरच्या रानांतून जात असतां वाट पाडिली. चोरांनीं रसद नेली. तें वर्तमान विजापुरास गेलें. मग तेथून नामजाद आली. ते नामजादीनें काळोजी व बाळोजी या उभयतांस जिवें मारिलें. तुकोजी पळोन गेला. हमरोजीस धरून विजापुरास नेलें. महंमद सावकार याचे हवाला केलें आणि हुकूम केला कीं याजपासूनु रसदेचा निकाल करून घेणें, म्हणून तगादा केला. त्यास तो निपुत्रिक होता तो बाटला. ऐसें जाहालिया उपरि गांव वैराण पाडिला. त्यावरी कबूलखान दिवाण गांवास आले. त्याजबराबर हमरोजी आला. गांवास आलिया उपरी तुकोजी बोलिला कीं, " तूं मुसलमानाशीं मिळोन पाटिलकी करितोस. " पाटिलकी मुसलमानाच्या घरास गेली ऐसें जाणोन तुकोजीनें हमरोजीस जिवें मारिलें. या उपरी दिवाणानें बाहीर निघोन तुकोजी हि जिवें मारला. मग तुकोजीचा लेक आपाजी भोसला माजे शेणोलीमध्यें होता. त्यानें गांवास मुतालीक पाठविला. त्याचें नांव डुबाजी. तो सुरळीत पाटीलकीची मुतालकी करून पाटीलकीचा हक्क, लाजिमा आपाजी भोसला यांस पावता करीत होता. ऐसें सुरळीतपणें मुतालकी करीत असतां डुबाजीस देवाज्ञा जाली. त्याचे पोटी लेक

तिघे जण. संभाजी व सोनजी व नरसोजी ऐसे तिघे जण. त्याजवरी सोनजी शहाणा निघाला. तो पाटिलकीची मुतालकी करूं लागला. 'हक्क दक थोडा बहुत भोसल्यास द्यावा ' ऐसें बोलिला. मग संभाजी व नरसोजी या उभयतांनी विचार करून बोलिले जे 'हा भोसलियाचा मिळताऊ आहे ' म्हणून संभाजी व नरसोजी या उभयतां भावांनी सोनजीस जिवें मारिलें. मग दोघे जण पाटिलकी करूं लागले.

---

# परचक्रनिरूपण.



श्रीक्षेत्र नाशकाजवळच्या टाकळीस श्रीसमर्थांचा जो आद्य मठ आहे त्या मठांत ' परचक्रनिरूपण ' या रामदासी प्रकरणाच्या २८ ते ४१ पर्यंतच्या ओंव्या उपलब्ध झाल्या. त्यांत मुसलमानी अमदानींत झालेल्या हिंदुसमाजाच्या दुरवस्थेचें नामांकित शब्दचित्र काढलेलें आहेः—

पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ।
येणें करितां बहुताला । संकट जालें ॥ २८ ॥
लोकें स्थानभ्रष्ट जालीं । कितेक तेथेंचि मेलीं ।
उरलीं तें मराया आलीं । गांवावरी ॥ २९ ॥
माणसा खावया धान्य नाहीं । आंथरुण पांघरुण तेंहि नाहीं ।
घर कराया सामग्री नाहीं । काये करिती ॥ ३१ ॥
पुढें आला प्रजन्य काळ । धान्य महर्ग दुःकाळ ।
शाकार नाहीं भळभळ । रिचवे पाणी ॥ ३२ ॥
कितेक अनाचारी पडिलीं । कितेक यातिभ्रष्ट जालीं ।
कितेक ते आक्रंदलीं । मुलें बाळें ॥ ३३ ॥
कितेक विषें घेतलीं । कितेक जळीं बुडालीं ।
जाळिलीं ना पुरिलीं । किती येक ॥ ३४ ॥
ऐसें जालें वर्तमान । पुढें हि अवघा अनमान ।
सदा दुश्चीत अवघे जन । उद्वेगरूपी ॥ ३५ ॥

कांहींच पाहातां धड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।
अखंड चिंतेचा प्रवांहीं । पडिले लोक ॥ ३७ ॥
येक ह्मणती कोठे जावें । येक म्हणती काये करावे ।
विदेशा जाउनी काये खावे । वेच नाहीं ॥ ३८ ॥
तथापि मार्ग चि चालेना । भिक्षा मागतां मिळेना ।
अवघे भिकारी च जना । काये म्हणावें ॥ ३९ ॥
प्राणीमात्र जाले दुखी । पाहातां कोण्ही नाहीं सुखी ।
कठिण काळे वोळखी । धरींनात कोण्ही ॥ ४० ॥

# श्रीसमर्थकालीन अस्मानी सुलतानी

इंदूरबोधन व डोमगांव मठांत कांहीं बाडें रा. शंकरराव देव यांस सांपडलीं. त्यांत स्वकालीन अस्मानी सुलतानीचें वर्णन स्वतः समर्थांनीं ज्यांत केलें आहे असे तीन प्रबंध सांपडले त्यांतील निवडक भाग येथें दिले आहेत. त्यांत समर्थ म्हणतातः—दुष्काळ पडला, लुटालूट सुरू झाली, लोक मरूं लागले व गांवें वोस झालीं. चोऱ्यामाऱ्या व दंगेधोपे यांचा सुकाळ झाला. इतक्यांत परचक्र आलें व दोन्ही कडच्या सैनिकांनीं प्रजेचा संहार मांडिला. दांडग्यांनीं हजारों जीव कुटून काढिले, नाककान कापले, स्त्रिया भ्रष्टविल्या व लोकांच्या मोटा बांधून समुद्रांत बुडविल्या. चोरांनीं सौदागरांना बुडविलें आणि काफिल्यांना लुटलें. शामळांनीं व मुसलमानांनीं गुजरिणी व ब्राह्मणी बाटविल्या, जहाजावर धरून नेल्या, कित्येक स्त्रिया देशांतरास नेऊन गुलाम म्हणून विकून टाकिल्या आणि शेकडो मातुश्रिया हालहाल होऊन मेल्या.

## प्रबंध पहिला.

बहूसाल कल्पांत लोकांसि आला । महर्गें बहू धाडि केली जनाला ।
किती येक मृत्यासि ते योग्य जाले। किती येक ते देश त्यागूनि गेले १

किती येक ग्रामे चि ते वोस जाली । पिके सर्व धान्यें च नाना बुडाली ।
किती येक धाडीवरी धाडि येती । द्वया सैन्यकाचेनि संव्हार होती २॥
किती येक ते मेघ ही मंद जाले । अनावृष्टि स्थळोस्थळीं लोक मेले ।
किती येक अन्नाविसी भ्रष्ट जाले । किती येक लोकी जळीं प्राण दिल्हे ३
किती येक ते ताम्रबंदी च गेले । किती येक माऱ्हाष्ट्र बंदी मिमाले ।
किती येक ते छंद ना बंद नाहीं । किती येक बेबंद ते ठाई ठाई ॥४॥
किती येक ते धान्य लुटूनि नेती । किती येक ते पेव खाणोनि नेती।
किती येक ते पूरिले अर्थ नेती । किती पूरिलीं सर्व पात्रें चि नेतीं॥५॥
किती पंथ देशांत ते नासले हो । किती येक पंथांत ते मारिले हो ।
किती येक पंथांत ते लूटिले हो । किती दांडगी ते बहू कूटिले हो ।६।
किती येक ते घ्राणकर्णे चि घेती । किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती ।
किती मोट बांधूनि ते बूडवीती । पिछोडे चि बांधोनि हीरोनि नेती ७
किती पोट फाडूनि ते मारितातो । वृथा चोर अर्थाविसी प्राण घेती ।
किती येक सौदागरा बूडवीतो । किती येक ते काफले लूटिताती ॥८॥
किती गुज्रिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या।किती शांमुखी जाहाजी फाकवील्या।।
किती येक देशांतरी त्या विकील्या । किती सुंदरा हाल होऊनि मेल्या९
किती कोंकणामाजि ते लोक गेले । फळें कांकड्या भाक्षितां रोग जाले।
पिडा पावले पोट फूगोनि मेले। किती किर्र् म्हणोनि फीरोनि आले१०

---

## प्रबंध दुसरा.

जन बुडाले बुडाले पोटेंवीण गेले । बहु कष्टले कष्टले किती येक मेले।
वीसां लोकांत लोकांत येकाचि राहिले । तेणें उदंड उदंड दुखचि साहिले ॥ धृ० ॥
कांहीं मिळेना मिळेना मिळेना खायाला।ठाव नाहीं रे नाहीं रे नाहीं रे जायाला ।
हौस कैची रे कैची रे कैची रे गायाला ।
कोठे जावें रे जावें रे जावें मागायाला ॥ १ ॥

देश नासला नासला उठे कों चीं कुटी ।
पिके होता चि होता चि होते लुटालुटी ।
काळाकरितां जीवलगां जाली तुटातुटी ।
अवघ्या कुटुंबा कुटुंबा होते फुटाफुटी ॥ ३ ॥
केचा आधार आधार नाहीं सौदागर ।
कांहीं चालेना चालेना उदीम व्यापार ।
केचा आधार आधार नाहीं सौदागर ।
कांहीं चालेना चालेना उदीम व्यापार ।
सर्व सारिखे सारिखे जाला येकंकार ।
काळ कठीण कैसा पावे पार ॥ ४ ॥
नलगे हांसावें हांसावें सगट सारीखें चि ।
लोक तुटले तुटले संसाराची ची ची ।
जनीं ईजती हुरमती पाहों जातां कैची ।
दुनिया जाली रे जाली रे जाली रे कळाची ॥ ५ ॥
धान्ये माहाग माहाग तैसें ही मीळेना ।
कैसें होईल होईल होईल कळेना ।
काये होणार होणार होणार टळेना ।
पुण्य गेले रे गेले रे कांहीं च फळेना ॥ ६ ॥
सुडकें पटकर पटकर न मीळे पांघराया ।
शक्ती नाहीं रे नाहीं रे कोंपट कराया ।
वाट फुटेना फुटेना वीदेसीं भराया ।
औघीं बैसलों बैसलों बैसलों मराया ॥ ८ ॥
बायेला लेंकुरें लेंकुरें सांडुनिया जाती ।
भीक मागती मागती सिकडे चि मरती ।
रांडा पोरांच्या पोरांच्या तारांबळी होती ।
मोल मजुरी भीकारी होउनि वांचती ॥ ९ ॥
नदी भरतां भरतां बाळुनीयां घेती ।
वीख घेउनी घेउनी उबंड मरती ।

अग्नी लाउनी लाउनी जळोनिया जाती ।
मोठी फजीती फजीती सांगावें तें कीती ॥ ११ ॥
येक पळाले पळाले दुरी देशा गेले ।
बहु कष्टले कष्टले तेथे नागवले ।
फीरोनी आले रे आले रे घरीचे लोक मेले ।
कोठें उपाये दीसेना कासावीस जाले ॥ १२ ॥
उदंड चाकरी चाकरी मीळेना भाकरी ।
लोक नीलंड नीलंड काढुनी नेती पोरी ।
न्याये बुडाला बुडाला जाहाली सिर्जोरी ।
पैक्या कारणें कारणें होते मारामारी ॥ १३ ॥
येतो पाहुणा पाहुणा लौकरी जाईना ।
अन्न खातो रे खातो रे थोडें ही खाईना ।
उदंड वाढिलें वाढीलें तऱ्ही तो धाईना ।
गर्वें बोलतो बोलतो कोठें चि माईना ॥ १५ ॥
राहे वस्तीस वस्तीस चोरीतो वस्तांस ।
परी तो सांडेना सांडेना ठकीतो लोकांस ।
पुढें ठके रे ठके रे ठके अवेवास ॥ १८ ॥
लोक भलेसे दीसती खेटरें चोरीती ।
वस्त्रें धोतरें पातरें लपउनी पळती ।
कोठें धरीती मारीती महत्वा हारीती ।
काये करीती करीती वाईट संगती ॥ १९ ॥
दास म्हणे रे भगवंता कीती पाहसी सत्व ।
काये वांचोनी वांचोनी ने परतें जीवीत्व ।
कीती धरावें धरावें धरावें तें सत्व ।
जालीं शरीरें शरीरें शरीरें नीसत्व ॥ २० ॥

---

## प्रबंध तिसरा.

पनाळागडीं फार महर्ग जालें । बहु वीस्व तेणें गुणें वाज्य आलें ।

कधीं देव पावेल कांहीं कळेना । कदा धुंडिल्या येक दाणा मिळेना १
गुरें वीकिलीं सर्व वस्त्रें च पात्रें । भटीं वीकिली सोंवळी वोलि धोत्रें२

किती वीकिली जेन झोरे चवाळी। किती धाबळा माळ चंबु गवाळीं ३
किती ऊखळे मूसळें सूप पाट्या। किती वीकिले झाडुनी कुंप काठ्या ४
किती येक जार्ता किती खड्गवते । तऱ्ही तें नव्हें काम कांहींच फते५
किती येक तवार ढाला कटारा । कितेकीं सुऱ्या कातऱ्या त्या अपारा६
कितेकीच सीलेच भाले विकीले । कितेकी किती उंट घोडे विकीले ७
कितेकी मुद्या कुडक्या त्या विकील्या । कितेकी किती आंगड्या त्या विकील्या ॥ ८ ॥
स्त्रियांचे अळंकार नानापरींचे । किती थोरथोरां चि त्या सुंदरींचे ९॥

असे संकटीं रक्षिलें तां दिनासी ।
किती आठऊं प्रत्ययों तो मनासी ।
धरूनी करीं ऊतरीलें अनाथा ।
लिळे पाहतां पाववीले समर्था ॥ १० ॥

[ श्री सांप्रदायिक विविध विषय पृ. २६१–२६७ ]

---

# भातवडीचे युद्ध



भातवडीच्या लढाईत शहाजींनें प्रथम आपलें अद्वितीय शौर्य व्यक्त केलें असें तंजावरच्या शिलालेखांत म्हटलें आहे. या लढाईचें वर्णन 'बुसातिने सलातीन' नांवाच्या विजापूरच्या इतिहासांत आलें आहे त्याचा सारांश असा—

मलिकअंबर हबशी हा निजामशाही राज्यांतील एक चाकर असून त्यानें त्या राजधानींतील फंदफितूराच्या वेळीं मोठ्या हिंमतीनें बुऱ्हाणशाहाच्या कारकीर्दीत मुखत्यारीचा लगाम आपल्या हातीं पकडला; आणि लौकरच प्रबल झाला. परंतु हें त्याचें प्रबलत्व इतरांस सहन न होऊन त्यांनीं त्याचें

पारिपत्य करण्याचें मनांत आणिलें. आरंभीं तो प्रत्येक वेळीं अदिलशाहा-कडे लीनतेनें मदत मागून आपलें काम पार पाडीत असे. त्याकडं मनमुराद फौज जमतांच त्यानें प्रथम इब्राहीम निजामशहावर शस्त्र धरिलें आणि आदिलशाहाशीं उद्धटपणा आरंभिला. आदिलशाहाच्या मनांत निजामशाही राज्य संरक्षण करण्याची उमेद होती. परंतु मलीकचें बसन फारच फाजील होऊं लागलें. तेव्हां मोंगलाशीं सख्य करून त्यास मलिकअंबरावर फौज पाठविण्यास चेतविलें. मोंगलासहि तेंच हवें होतें. कारण ते मलीक याच्या त्रासानें अगदीं कावून गेल्यासारखे झाले होते ! त्यांत त्यांना आदिलशा-हाची मदत मिळतांच त्यांनीं तयारी केली आणि हिजरी सन १०३२ (इ. स. १६२३ ) त चाळीस हजार स्वार व इतर युद्धोपयोगी जंगी सामान सरं-जाम घेऊन ते अहमदनगरावर निघाले. तत्समई आदिलशाहानें चाळीस हजार स्वार मुल्ला महमद लारी सरलष्कर (ज्यास मुल्लाबाबा म्हणतात) त्याब-रोबर रवाना केलें. हें वर्तमान मलिकअंबरास कळतांच त्यानें दोन्ही सैन्यांचा एकदम फन्ना उडविण्याची हिंमत धरून स्वतः चाळीस हजार स्वारांसह तो युद्धास सज्ज झाला. दोन्ही सैन्यांची नगरापासून पांच कोसांवर भातोडी म्हणून एक गांव आहे. तेथें गांठ पडून आदिलशाही व मोंगली लष्कर खूप दमानें लढलें. परंतु सरलष्कराची शिकस्त होऊन आदिलशाही सैन्याचा पराभव झाला. तशीच मोंगलांच्या सरलष्करखानाची हीच दशा झाली. मलिकंबरानें त्या जयाच्या भरांत शेंकडो सरदार अमीरउमराव व इतर लोक कैद केले. तेव्हां बाकीच्या फौजेवर मोठा कहर उसळला !

[ मोडककृत विजापूरचा इतिहास पृ. १४६ ]

---

## निजामशाहीचें पुनरुज्जीवन



मलिकंबराच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा फत्तेखान कर्तृत्वशून्य निघाला. यामुळें निजामशाही बुडविण्याच्या कामीं मोगली सरदार मोहबतखान यास यश आलें. परंतु पातशाही बुडाली तरी निजामशाही सरदार



शहाजहान.



अवरंगजेब.





शाइस्तेखान.



नादिरशहा.

मोंगल [ पृ. २९ अ.

आपापला प्रांत बळकाऊन स्वतंत्र होण्याच्या विचारास लागले. त्यांत शहाजी हा सर्व निजामशाही सरदारांत फौजबंद व धोरणी होता. यामुळें त्यास आपणाकडे ओढून घेण्यासाठीं मोगल व विजापूरकर यांची खटपट सुरू झाली. तिचा फायदा घेऊन शहाजीनें निजामशाहीचें पुनरुज्जीवन केलें व पातशाहीच्या नांवाखालीं आपलें सैन्य वाढवून तो जबरदस्त बनला.

"शहाजी महाराज भीमगडीं जातांच निजामशाही प्रांत, पुणें व जालना बालेघाटपर्यंत व जुन्नर व अहमदनगर व संगमनेर व नाशिक व त्र्यंबकपर्यंत घेतले. आणि सात आठ हजार स्वार ठेऊन प्रांत लुटूं लागले. इरादतखान[1] दौलताबादेस होते. त्यास मालोजी भोंसले याज-कडून स्नेह केला; आणि उमेदवार शहाजहा पादशहा याच्या कृपेचें म्हणून मनसब बेवीस हजारी करार करून फर्मान शहाजी महाराज यांच्या नांवें व वस्त्रें पादशहाची आणून दिलीं. आणि शहाजी महाराज ज्याप्रमाणें सांगतील त्याप्रमाणें दिल्लीहून आणवून देऊन शहाजहानचे चाकर करून विजापूरचा पातशाहाचा मुलूख घ्यावा असें इरादतखान याच्या चित्तांत होतें. हें वृत्त महाराजांस समजून हे हुशारच होते. मुरारपंतास न कळतां खवासखान याजकडून कागदपत्रें येत होतीं. शहाजी महाराज यांणीं लिहिलें कीं, 'तुम्हांकडून कांहीं उपरोळा[2] जहाला असतां आम्ही पुनरपि निजामशाही उभी करितो.' त्यास खवासखान याच्या चित्तांत होतें. परंतु मुस्तफाखान याच्या विचारास येईना. खवासखान दौलताबादेस गेले. अजुर्दपणानें[3] इरादतखान याशीं स्नेह केला. आणि शहाजी महाराज यांचें भय होतें. आणि पत्राचें उत्तर पाठविलें कीं, "वंश निजामशाही म्हणून गादीवर बसवावें" असें लिहिलें. मुरारपंत याजबराबर फौज देऊन कुमकेस शहाजी महाराजा-कडे रवाना केलें. शहाजी महाराज श्रीवर्धन किल्ल्याहून निघून कोंक-णांत जाऊन, निजामशाही वंश कैदेंत होते, त्यांतून दहा वर्षांचा

---

१ हा मोगली सरदार. यानें मालोजी (शहाजीचा चुलत भाऊ) मार्फत शहाजीस आपणाकडे ओढण्याची खटपट केली. २ मदत, पाठबळ. ३ खिन्नतेनें, निरुपायानें.

मूल मुरतजा नामें होता त्यास आणून भीमगडीं नेऊन तक्तावर बसविलें. आणि प्रांत घेण्याच्या उद्योगास लागले. सिद्दी साबा सफैखान कोकण प्रांत घेऊन भिवंडीस होता. त्यास शहाजी महाराज यांणीं पत्र आपल्या व मुरारपंत यांच्या नांवें 'तुम्हीं निजामशाहास येउन भेटावें असें लिहिलें. तेव्हां महाराजाच्या लिहिण्यास राजी न होतां अदिलशाहाची चाकरी करावी म्हणून कोकणप्रांत शहाजी महाराज यांच्या स्वाधीन करून निघाले. तों शहाजी महाराज यांणीं फौज त्याच्या पाठलागास पाठविली. तेव्हां उभय लष्करची गांठ पडून युद्ध होऊं लागलें. दोन्हींकडील मनुष्यें बहुत जाया जालीं. सिद्दी अंबर तोफखान्याचा सरदार होता त्यास कैद केला; आणि सफैखान याच्याहि फौजेस वेढा दिला. इतक्यांत मुरारपंताकडील फौज कुमकेस येऊन सफैखान यास घेऊन नंतर विजापुरास जाऊन पातशहाची भेट घेतली. बादशाहांनीं त्यास दोन लक्ष होन देउन हरपनहळी येथें ठेविलें. नंतर कांहीं दिवसांनीं मृत्यु पावले. शहाजी महाराजांनीं श्रीनिवासराव[1] यास मेजवानीस बोलाऊन कैद करून त्याजकडील किल्ले व प्रांत घेऊन मुरतजा पादशहास जुन्नरास घेउन येउन द्रव्य व सरंजामहि बहुत संग्रह केला. दहा बारा हजार स्वार जमविले.

[ काव्येतिहाससंग्रह, पत्रें, यादी वगैरे लेखांक ४३८ ]

---

# मुरारपन्ताची तुळा



मुरार जगदेरावानें शके १५५५ च्या भाद्रपद अमावास्येस सुवर्णतुळा करविली व मोठा दान धर्म केला. त्या वेळीं शहाजी महाराजांनीं हत्तीचें वजन करण्याची युक्ति सांगितली अशी आख्यायिका महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. त्या प्रसंगाचें हें दानपत्र आहे.

---

१ जुन्नरचा किल्लेदार.

॥ श्री ॥

श्रीनृप विक्रमार्क शालिवाहन शके १५५५ मुख्यपत्रस्य प्रतीयम् । श्री मंगलमूर्तये नमः । नमस्तस्मै महेशाय यस्य संध्या त्रयछलात् ॥ यातायातं प्रकुर्वेति त्रिजगत्पतयोऽनिशं ॥ १ ॥ स्वस्ति श्रीमुखनामसंवत्सरे ॥ दक्षिणायने वर्षार्तो भाद्रपदेमासे कृष्णपक्षे अमावास्यायां सोमवासरे ॥ घटिका ११ पलानि १ हस्त नक्षत्रे घटिका ६ पलानि १८ ॥ ऐंद्रयोगे घटिका २२ पलानि १ तत्काले नागकरणे एवं पंचांगशुद्धौ अस्मिन् पुण्यकाले केतुग्रस्ते दिवाकरे सूर्योपरागे महापर्वणि श्रीमद्वाशिष्ठकुलजलधिमहारत्नभूतः परमप्रताप प्रहतारातिगेहिनीनयननरिपूरपूरितपारावारः श्रुतिस्मृतिसदाचाराचरणपावितावानितल महादानानुदानकृतार्थीकृतदीनानाथोऽनेकान्नसत्रजीविताखिलान्नजनसत्कीर्तिचंद्रिकयापि-- संसारतापततविबुधजनः धर्मावताराजाधिराजः महाराजः राजश्रीः पंडितः मुरारिः जगदेकप्रभुः ॥ सार्वभौमप्रतिनिधिः ॥ इंद्राणीभीमरथीसंगमे सकलपातकनाशकत्वेन पुराणप्रसिद्धे पुण्यक्षेत्रे रविग्रहस्पर्शकाले सब्रह्मसमाजस्नानश्राद्धादि नैमित्तिकं सांगं विधाय मुख्यकल्पमनुस्मृत्य सांगं साभरणं गजदानमश्वदानं गोशतदानं च कृत्वा शास्त्रविहितमार्गेण सुवर्णरजतादिचतुर्विंशतिसंख्याकानि तुलामहादानानि सांगानि तदैव कृत्वा सद्धनेन दीनानाथान् ब्राह्मणांस्तत्तन्मनोरथैः पूरयित्वा भूमिदानार्थं तत्रैव नागरग्रामसंज्ञकमाम्रवृक्षान्तर्वेद्यादिस्वसीमासहितराजरेखया शतत्रयवराहापरिमितभूमिकमग्रहारसंज्ञकं कृत्वा संगममित्यग्रहारनाम निर्दिश्य शतत्रयवराहपरिमिते भूमिके षोडशाधिकाद्विशतवराहपरिमित-- भूमिकं पृथगपास्याष्टादशभागान् समान् कृत्वा ॥ तत्र भागद्वयं संगमेश्वरस्य दीपदानाभिषेकनैवेद्यार्थमुपकल्प्यावशिष्टषोडशभागानेकैकमंशमेकैकस्मै विभज्य दत्तवान् ॥ तत्र तावत्षोडशब्राह्मणानां नामानि इमानि ॥ सोनभट देवगिरिस्त १ नरसिंहभट अग्निहोत्री २ त्रिंबकभट नांदुरकर ३ त्रिंबकभट सुदामे ४ त्रिंबकभट खेडकर ५ मानभट तळेगांवकर ६ माहादेवभट पुरंदरे ७ त्रिंबकभट पुराणिक ८ पुरुषोत्तमभट वैष्णव ९ मानभट वैष्णव १० गोपतिभट ढेरे ११ आपदेवभट चित्राव १२ बाळ पाठक नाशिककर १३

रंगनाथभट ग्रामज्योतिषी १४ सोमनाथभट ग्रामज्योतिषी १५ पुंडलिक हरिदास पंढरपूरकर १६ एवं षोडश ब्राह्मणेभ्यो दत्वाऽवशिष्टचतुर- शीति वराहपरिमिते भूमिके चत्वारिंशद्वराहपरिमितभूमिकं स्वपुत्रपौत्रादि- संतत्यर्थ वृत्तिं प्रकल्प्यावशिष्टचतुश्चत्वारिंशद्वराहपरिमितं भूमिकं पृथगपास्य तच्चतुर्धा समांशं विभज्यैकमंशं श्री कालिदासकविश्रेष्ठेभ्यो दत्वैकं वररुचये दत्वैकं त्रिमलभट पुरोहिताय दत्वैकं रायारायाय दत्वाऽवशिष्टवराह- चतुष्टयपरिमितं भूमिकं हलेगौडाय गृहनिर्मित्रे दत्वैवं राजेश्वया शत- त्रयवराहपरिमितभूमिकं क्षेत्रं चतुर्विंशतिधा पूर्वोक्तप्रकारेण संविभज्य ब्राह्मणेभ्यः अग्निहोत्राध्ययनाध्यापनादिधर्मानुष्ठानार्थं दत्तवान् ॥ अत्र पूर्वोक्तविभागक्रमेण स्वस्वक्षेत्रोत्पन्नान् ॥ चयोपचययार्दोत्रिसंततेः संबंधो नास्ति किंतु ब्राह्मणानामेवेत्युदकधारापूर्वकं दत्तवान् ॥ इदं शमित्रमुखपुत्रपौ- त्रादिवंशजैः संरक्षणीयं तथाच भावि भूपालैरपि संरक्षणीयं ॥ अन्यथा आकल्पं पितृभिः सह नरकवासो भविष्यति ॥ यदर्थे धर्मशास्त्रं ॥

स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुंधरां ॥
षष्टिर्वर्षसहस्त्राणि विष्ठायां जायते कृमिः॥१॥

---

# केवळ वतनासाठी !



देशमुखी, पाटीलकी वगैरे वतनें संपादन करण्यासाठीं अगर राखण्या- साठीं महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची कर्तबगारी कशी खर्ची पडत असे व या नादांत गुंतल्यामुळें स्वराज्य व परराज्य यांतील भेद ओळखण्यास ते कसे अपात्र बनले होते याची हकीकत देणारे हजारो कागद महाराष्ट्रभर सांपड- तात. त्यांपैकीं एक येथें मासल्याकरितां दिला आहे. यांतील हकीकत एक- तर्फी असण्याचा संभव आहे. परंतु तत्कालीन आपसांतील वैमनस्यांची कल्पना अशा कागदावरून करतां येते:—

हकीकत माहादजी वलद सुलतानजी जगदळे देसमुख. परगणे मजकूर

कदीम[1] देशमुखी प्रा। कऱ्हाडाबाद व प्रा। मसूर एथील देसमुखी कदीम होती. वडील भाऊ जगदेराऊ याचें वाटणीचें कऱ्हाड व धाकटा भाऊ रामोजी याचे वाटणीचें मसूर. दो हि परगण्याची देशमुखी दोघे भाऊ करीत असतां वडील भाऊ जगदेराऊ यामधें व कऱ्हाडीचा नैबामधें कांहीं बोलीचाली होऊन कुसर[2] पडला. त्यानें जगदेरायास दंड बांधला. ते देवयास ताकती नाहीं. मग जगदेराऊ पळोन गेला. नैबानें कुल बिसादी[3] लुटून खालसा केली. जगदेरायास हरामखोरी लावून देसमुखी अमानत[4] केली. खबेर[5] पादशाहास लेहून अमानत करून, नेगोजी थोरात उंबराव याचे दुमाला[6] केली. हा वजीर पादशाही चाकर होता. याच्या तनख्यांत दिल्ही. मसूर परगणाची देसमुखी देहे[7] सत्तावन आपले वडील करीत होते. जगदेराऊ बाहीर दावे करितां मरोन गेला. त्याचें पोटीं संतान नाहीं. मग आपला वडील रामोजी व त्याचा लेक दयाजी हे बादूर पादशाहापाशीं फिराद जाहाले. हजरत पादशाहानीं हकीकत मनास आणिली. तेव्हां पेसकसी दाहा हजार होन माथां ठेऊन कऱ्हाडीची देसमुखी कदीम होती ऐसें मनास आणून दुमाला केली. पेसकसीचे पैसे द्यावयास मौसर[8] नाहीं. म्हणऊन आऊंध तरफेचे देहे २७ सत्तावीस लुखजी कुकजी यादव पादशाही मनसफदार होते त्यांस सत्तावीस गावीची देसमुखी देऊन, त्यापासी पैसे घेऊन, पेसकसी फेडिली. त्यावरी थोरातामध्यें व आपल्या वडिलामध्यें दावा लागला. तेव्हां मागती आपले वडील हजूर विज्यापुरास गेले. हुजूर नागोजी व बहिरजी नाहवी याचें अडिनांव यादव हे होते. यावरी पादशाहाची मेहेरवानी होती. मग त्याची पाठी करून च्यारी गावींची त्यास देशमुखी दिल्ही. कडेगाऊ, कोरेगाऊ, टेंबू, गोवारें, ऐसे च्यारी गांव प्रा। मजकुरीचे देऊन, त्याची पाठी करून, थोराताचा दावा दूर केला. त्याउपरी रताजी रूपाजी यादव यांनीं आऊंधीची देसमुखी करून पुंडावे केले. वणगोजी मुधोजीस मिळोन मुलखामध्यें रांजीक[10] केले. आणि वणगोजी मुधोजीस आणून कऱ्हाडीचा कोट त्यास घेऊन दिल्हा. मोठमोठे सावकार लुटिले. पनाळापावेतों राजीक केले. ते

---

१ प्राचीन २ वांकडे पडलें ३ जिनगी ४ जप्त ५ हकीकत ६ स्वाधीन ७ गांव ८ नजर ९ ताकद १० दंगा

वर्त्ती वणगोजी मुधोजी पुढ जाहाले होते. त्यांची सनद कऱ्हाडीचे देस-मुखीची करून घेतली. तेव्हां यादवांमध्यें व आमच्या वडिलामध्यें दावा पडला. मग आपला आजा बादूर पादशहापासी फिराद जहाला. पादशाहानीं रताजी रूपाजी बहुत तलब[११] केला. ते हजूर न येत. मग त्यावेरी नामजादी[१२] करून रताजी रूपाजी जिवें मारिलें. ते वर्त्ती देसमुखी अमानत करून रणदुल्लाखान याचे हवाला केली. मसूर परगणाची देसमुखी देहे सत्तावन गावींची चालत होती. याउपरी निजामशाहींतून शहाजी राजे भोसले हे विज्यापुरास आले, पादशाहानीं मनसफ दिल्ही. ते वर्त्ती यादवाचे भाऊबंद शहाजीराजाकडे चाकर होते. त्यांनीं शाहाजीराजास मिळोन देस-मुखीचा करीना सांगितला जे, "जगदाळाच्या घरामध्यें कोणी नाहीं, जगदाळाचे घर मोडिले आहे, कऱ्हाडची देसमुखी आपल्याकडे केली पाहिजे, त्याचा आमचा दावा आहे." ऐसें सांगितलें. मग शाहाजीराजांनीं पादशहास अर्ज करून दौलतेचे भरीस देसमुखी कऱ्हाडची मागोन घेतली. मग आपला आजा नरसोजी हा मसूर परगणाची देसमुखी व कसबाची पटेलगी आपला वडील करित असतां, शाहाजीराजे भोसले यांस यादव मिळोन देसमुखी कऱ्हाडीची शाहाजीराजाकडे केली. हें वर्तमान आयकोन करनाटकामध्यें बेंगरुळास आपला आजा नरसोजी जगदळा गेला. तेथें शाहाजीराजाची भेटी घेतली त्यास कऱ्हाडीचे देसमुखीची हकीकती सांगितली. ते वर्त्ती यादव व शाहाजीराजे यांनीं विचार करून दगा देऊन आपला आजा नरसोजी जगदाळा मारिला. आपला बाप व आपला चुलता होता. याउपरी शाहाजीराजांनीं पिसळे म्हणून एक महराटे चाकरीस ठेविले होते, त्यास लावून देऊन मसुरीचे मोकदमीवरी दावा कराविला आणि मसूर परगणा शहाजीराजानें जहागीर घेतली. आणि मसुरीच्या कोटामधें आपलें ठाणें ठेविलें. ते वर्त्ती पिसळ्यास लावून देऊन मसुरीची पटेलगी व देसमुखी अमानत केली आणि **दादाजी कोंडदेव शहाजीराजाकडील सुभेदार** त्यास सांगोन पिसळ्यास व आम्हांस गोत लावून दिल्हें जे परगणे पाटणीचे स्थळीं खाने अजम लाडीखान हवालदार कऱ्हाडीचा व पाटणीचा

---

११ बोलावलें. १२ धरणें किंवा शिपाई पाठवून

एकच होता त्यानें मसूरपरगणाचे पाटील व हकजवारीचें गोत व कसबे मसूरीचे बैते बलूते ऐसे मेळवून पिसळे व आपला चुलता व आपला बाप यापासीं जमान घेऊन गोतानें निवाडा केला कीं, ' जगदळेयाची मसूर-परगणाची देसमुखी व कसबाची पटेलगी खरी असे ' ह्मणोन गोही[13] दिल्ही. व कदीम भोगवट्याचे कागदपत्र फर्मान[14] होते ते मनास आणून पिसळे खोटे केले. तेव्हां पिसळे बोलिले कीं, आम्हास भोसल्यांनीं व घोरपड्यांनीं स्थळीं उभें केलें, आपण भोसल्याचे चाकर असो, आपल्यास मोकदमीसी कांहीं समंध नाहीं. ' ऐसे यजितपत्र[15] लेहून दिल्हें. तेणप्रमाणें लाडीखान हवालदारानें हकजवारीचे साक्षीनसी माहजर करून दिल्हे. ते वख्तीं देसमुखी व पटेलगी पनाळा अमानत होती. मग आपला चुलता तानाजी हा सुल्तान महमूद पादशाहा यासी जाऊन दुमाला फर्मान करून घेतले. पनाळाच्या किल्लेदारास ताकीद घेतली. त्याउपरी भोसल्यांनीं ठाणां-तील लोक काढून पिसळ्याचें नांव सारून आपला चुलता तानाजी जग-दळा जिवें मारिला आणि मागती देसमुखी शाहाजीराजानीं आपल्याकडे घेतली. आपला बाप पटेलगी करून होता. आपला जीव वाचवून देस-मुखीचें नांव काढिलें नाहीं. त्याउपरि भोसल्याची जबरदस्ती देखोन आपला जिव वांचवून होते. त्याउपरि शाहाजीराजाचा लेक शिवाजीराजा जाहाला. त्यानें पुंडावा करून पादशहासी बिघाड केला. ते वख्तीं आपला बाप पादशाही फौजास मिळून देसमुखीचा मजकूर करून देसमुखीचा हक्क घेऊं लागला. अबदुलखान हा जाउलींत बुडविला, तेथें भोसल्याच्या सरदारांनीं पाळत करून वसंतगडीहून स्वारी जाऊन, तें ठाणें घेरून, आपला बाप दस्त करून, वसंतगडास आणिला, आणि त्याची गर्दन मारिली. ते समयीं आपले नेणतपण होतें. आपण धाकुट होतों मग आपली आई व आपण पळोन सातारास गेलों. तेथून आपली आई राजगडास जिजाई आवा, शिवाजीराजाची आई, तापासी गेली, कीं माझें च वतन घेऊन आपले तीन खून केले, आपले पोटीं एक मूल आहे, त्यास कौल दिल्हा पाहिजे. तें वख्तीं शिवाजीराजे बोलिले कीं, ' देसमुखी गोष्टी न करावी, कौल च

१३ साक्ष १४ आज्ञापत्र, राजपत्र १५ राजीनामा

आहे, ' 'देसमुखी गोष्टी न काढावी.' ऐसें लिहिलें आपले आईपासून घेतले कीं 'पटेलगी करून असावें.' ऐसा कौलें घेऊन, मग आपले आईनें नेऊन शिवाजीराजास भेटविलें. त्यांनीं वेंकाजी दत्तो याचे हातीं देऊन, पटेलगी दुमाला करून, मसुरास पाठविले. मसुरीची पटेलगी करीत होतो. तों पुढें कितेक दिवसा शिवाजीराजे मृत्यु पावले. त्यांचे लेक संभाजीराजे राज्य करूं लागले. त्यांस जाऊन भेटोन अर्ज केला कीं, 'साहेबीं कऱ्हाडची देसमुखी घेतली, मसूरींचें तरी देसमुखीचें वतन आपलें आपलें दुमाला करणें, बाँज गुम्हाई माझें वतन घेऊन तीन खून केले आहेत, तरी त्या खुनांचा वाटा तरी मसूरचिं वतन तरी तेवढें दुमाला करणें. कऱ्हाडची नांवगोष्टी काढणार नाहीं.' ऐसें लेहून दिल्हें. मग संभाजीराजे मेहरबान होऊन मसूरपरगणाची देसमुखी दुमाला करावी ऐसें केलें. काम होऊन यावें. तों एसजी फर्जंद याचे हवाला देसमुखी केली. मग त्याचें आर्जव करून, मग एसजी फर्जंदानें अर्ज करून देसमुखी दुमाला करविली. तो सवेंच संभाजीराजा धरून नेला. राजाराम पळोन चंदीस गेला. त्याचे सरदार संताजी घोरपडा व धनाजी जाधव यांनीं मागती इकडे ढोहणा केला. मग आपण वाईस जाऊन नवाब न्याहरखान साहेबास भेटलों. त्यापासून पन्नास स्वार व पन्नास प्यादे मागून घेतले व आपण कांहीं स्वार-प्यादे ठेविले आणि मसूरीचे ठाणें बळाविलें. ते वख्तीं हजरत शाहाजादे अजमशाहा पनाळेवरी मसलतीस चालिले. त्यांस भेटोन इलतमेस गुदरे अर्ज केला. त्यांनीं हि आपलें निशान—फर्मान करून दिल्हा. नवाब रोहिलाखान यांनीं हि आपला परवाना करून दिल्हा. तुळापुरीं ज्योंहांपन्हास अर्ज करून जानसारखान फौजदार पा। खटाऊ यावरी हुकूम घेतला. याउपरि साताऱ्चे मसलतीवरी सर्जाखान आले. त्यांनीं साताऱ्यास वेढा घातला. न्याहारखानाचे वाईचें ठाणें तहगीर जहालें. तेव्हां मसूरचिं हि रहिमतपुरीं होतें तें हि उठोन गेलें. मग सर्जाखानास जाऊन भेटोन, सर्जाखानाचे पन्नास स्वार व पन्नास प्यादे व त्यापासीं शेख अजमतुला म्हणौन ठाणेदार मागोन घेतला. ते वख्तीं संताजी घोरपडा व धनाजी

१६ अभयपत्र १७ पूर्वी १८ औरंबजेब

जाधव येऊन साताऱ्चा वेढा उठविला. सर्जाखान सुटोन आले. गनीमानें[१९] मसुरास वेढा घातला. ठाणेदार राती करून निघोन गेला. वाई, बुध, व खटाऊ ऐसी ठाणीं टाकून गेले. कोठें आसिरा नाहींसारखा जाहाला. बिन आमिराविण आठ रोज गांव भांडाविला. मग त्यांचा कौल घेऊन त्यांस भेटलों. त्यांनीं धरून वसंतगडास नेलें. नागवण बांधिली. मग आपला लेक सुभानजी हा त्यांपासीं कौल ठेवून आलों. पैका ठेवयास थारा नाहीं म्हणोन चंदीस राजामापाशीं गेलों. त्याचें आर्जव करून देसमुखी दुमाला करून घेतली. फिरोन माघारा आलों. आपली देसमुखी करीत असतां, धनाजी जाधव याचे निसबतीचे पदाजी व पिराजी यादव याचे लेक व हे हजारी पंचहजारी चाकर होते यांनीं व धनाजी जाधवानें मागती आपणासी कथळा केला. मग आपण नवाब हमीमुद्दीखान याकडे खटावास जाऊन अर्ज केला. त्यांनीं हजूर लेहून रा। संबाजीपंत राजे याचें ठाणें दिल्हें. इत्यादि.

---

# राजकारण दुलग असावें.



शहाजीचें वजन निजामशाही दरबारांत अतोनात वाढल्यामुळें इतर सरदार त्याचा द्वेष करू लागले; व शेवटीं त्यानीं मोगलास बोलावून आणून निजामशाहीचें पुनरुज्जीवन करण्याचा शहाजीचा प्रयत्न फसविला. यामुळे शहाजीस विजापूरकरांची नोकरी पत्करावी लागली वगैरे हकिकत मल्हार रामरावकृत सप्तप्रकरणात्मक चरित्रांत दिली आहे ती अशी:--

शहाजी याचा द्वेष कारभारी मनसबदार मातबर करू लागले. तथापि याची जड भारी. मनसुब्यानें हरएक प्रकारें राजास हारी आणावें हें न

---

१९ मराठ्यांनीं, शत्रूंनीं

घडें. ते समयीं ' ही पातशहात बुडाली तरी बुडो, परंतु हिंदु राजे यांचा कारभार चालूं न द्यावा ' असा सर्व यवनांनीं कट केला. त्यास जाधवराव अनुकूल आणि दिल्लीस राजकारण करून अलमगीर पादशाहा याची फौज मदतीस आणविली. तें राजकारण सिद्ध होऊन मीरजुमला सरदार व पंचवीस हजार फौज आली. ते समयीं साबाजी अनंत यांचा व राजे यांचा घरोबा. त्याणीं सल्ला दिली ' पादशाही चाकर निमकहराम होऊन दौलत बुडवितात. तुम्ही विचार पाहून चालावें. ' याप्रमाणें सांगितल्यावर राजे यांचें म्हणणें पडलें ' काय चिंता आहे ? दिल्लीची फौज आली तरी मनसबा करून युद्ध करून पराभव करतां येईल. धनी मात्र कायम पाहिजे. ' असें हिंमतीनें सांगितलें असतां साबाजीपंत याचे सल्लेस न ये. ' घरफूट चांगली गोष्ट दिसत नाहीं. धनी बायको व मुलें पडली. आपलें राजकारण हि दुलग असावें. ' त्याजवरून राजे यानीं नारोपंत मजमदार याचा भाऊ बाळकृष्णपंत हनुमंते यास ' विजापूरचें राजकारण असावें ' म्हणून सुलतान सिकंदर पादशाही करीत होते त्यांचे मुख्य इख्त्यार कारभारी मुरारजगदेव यासी भेटविलें. राजकारण सिद्ध केलें. त्याचा हि आदर बहुत पडला, जे ' मातबर सरदार काबील. यांचें राजकारण अनायासें आलें. त्यांस आणून तीं [ निजामशाही ] पादशहात क्षीण जाली आहे त्यांतील प्रांत आपण साध्य करावा. ' हें चित्तीं आणून जहागीर मनसब देण्याचा करारनामा ठरवून दिला. आणि वकीलास बहुमान वस्त्रें देऊन राजे याजयाजकडे पाठविले. त्याजवर दिल्लीची फौज मीर जुमला घेऊन आला. ती हि समीप येऊन पोंचली. त्यास सारे सरदार जाधवराव, मलिक वगैरे सामोरे जाऊन ते व हे एक होऊन चालून आले. ते समयीं राजानें विचार केला जे ' दौलताबाद मैदान मुलूख. यांत लढाई घेणें चांगलें नाहीं. ' हा विचार करून कोंकणांत माहुली किल्ला येथें पादशाहा व बेगमसाहेब यास घेऊन गेलें. नंतर सारी फौज माहुलीस चालून गेली. तेथें सहा महिनें सामग्री तयारी करून युद्ध केलें. त्यांत फौजेवर छापे घालणें, मोर्चे लावणें, व लढाई इत्यादिकें फौज बहुत हैराण जाली. असें असतां [ बेगम ] साहेब इजकडे राजकारण करून [ मोगलांनीं ] भेद केला. त्याजवरून

हिम्मत खचली. जाधवराव यानें बुद्धिभ्रंश केला. तेव्हां आपले सारे सरदार यानीं याजकडे राजकारण लाविलें हें वर्तमान शहाजीराजे यांस समजतांच ' खावंद दुलग जाला. यावर आपण आग्रह करणेचें प्रयोजन नाहीं. आपण याचे म्हणाविले. निमक खाऊन पादशाही आपले साटां खराब केली, बुडविली हें अपयश कशास घ्यावें ? खावंदच त्यास अनुकूल जाला. त्याचे देवेंकरून घडणें तें घडो; ' म्हणून विजापूरचें राजकारण सिद्ध झालें च होतें तिकडे जावें, ही पादशहात सोडावी असा विचार करून आपली जमीयत फौज कुटुंब घेऊन * शके १५५८ त निघून चालले. ते समयीं शरफजी राजे यास सरदारी सरंजाम निराळा होता. त्यास ' तुम्ही मिळोनच असावें ' असें सांगून ते पादशाहीत च राहविलें. जाधवराव कांहीं फौज घेऊन पाठलाग करीत आले. त्यांची मुजाका न धरितां शिवनेरी तालुक्यांत येऊन जिजाबाई ठेविली होती त्याचा बंदोबस्त यथास्थित करून त्यास नेणें ठीक नाहीं म्हणून ठेविली. बराबर पुत्र संभाजी राजे घेतले. बाईसाहेब याजपाशी कारभारी कृष्णाजपिंत हनुमंते व संक्राजी निळकंठ व सोनोपंत व रघुनाथ बल्लाळ कोरडे असे काहीं सरदार ठेविलें. आपण दरमजल चालले. जाधवराव फौज मागे आली असतां फलटण पर्यंत आले. फौज हि पोचली. फलटणीं जगपाळ नाईक निंबाळकर पुंडपणाकरून दहा हजार फौजेचे सरदार महाराजांचे आप्त होते ते हे एक जाले. याजमुळें आपला परिणाम नाहीं [ असें ] समजोन जाधवराव माघारे निघोन गेले. पादशाहा बेगम यास [ ते ] दौलताबादेस घेऊन गेले. दिल्लीची फौज कुमकेस आणिली होती त्यासी करारमदार होता त्याप्रमाणें देऊन परत लाऊन दिली. राजे विजापुरीं निघून आले. ते समयीं दौलताबादेकडील शिवनेरी व धोडप तालुका होता त्याचा बंदोबस्त करून कायम राखिला. विजापुरीं पावले तेव्हां मुरारपंत सामोरे येऊन घेउन गेले. पादशाहाची भेट जाली. कराराप्रमाणें कर्नाटकप्रांत बेंगरूळ, होसकोटे, बाळापूर, शिरकटे वगैरे

---

* येथें मुळांत शके १५४८ असें चुकीनें पडलें आहे.

तालुके हवाली केले. त्याजवर बंदोबस्तास कारभारी नारोपंत हनुमंते ठेविले. ‘ दौलताबादेतील मातबर कर्ते नामांकित वजीर सरदार आले. त्यास [ निजामशाही ] पादशाही च आक्रम करावयास येईल ’ असें जाणोन शाहा व मुरारपंत हर्ष मानिते जाले.

[ श्रीशिवछत्रपति महाराज यांचें चरित्र पृष्ठ २०।२१

—— ० ——

# स्वराज्यस्थापनेची चर्चा



स्वराज्यस्थापनेच्या कामीं शिवाजी महाराजांना दादाजी कोंडदेवाचें सहाय झालें किंवा नाहीं याचा निर्णय देतां येण्याजोगा अनुकूल अगर प्रतिकूल पुरावा अस्सल पत्रांत सांपडत नाहीं. यामुळें या प्रश्नाबद्दल मल्हार रामराव चिटणीसकृत ‘ छत्रपती शिवाजी महाराजांचे सप्तप्रकर्णात्मक चरित्र ’ या ग्रंथांतील २९ व्या पृष्ठावरील एतद्विषयक उतारा येथें दिला आहे. त्यावरून शके १५६२ च्या सुमारास तरी दादाजी स्वराज्यस्थापनेची धाडसी कामगिरी अंगावर घेण्याच्या कल्पनेविरुद्ध होता असें म्हणावें लागतें.

“ या समयीं माहाराजांनीं विचार केला जे “ आपण वडिलांनीं मेळाविलें तें खाऊन राहाणें योग्य नाहीं. आपण हिंदू. सर्व दक्षण देश म्लेंछांनीं ग्रासिला. देवब्राह्मणगायींस, क्षेत्रांस पीडा केली. धर्म बुडविला. हा रक्षणार्थ प्राण हि वेंचून धर्म रक्षूं. व आपलें पराक्रमानें नवीन दौलत संपादूं, तें अन्न भक्षूं. नवें साधावें हे या कुलांत जन्मल्याचें सार्थक. दैवावर भार घालूं. पुरुषप्रयत्न बलवत्तर, अधिक होय. दैव पंगू आहे. यास्तव प्रयत्नें अलबल करावें. त्यास दैव जसजसे सहाय होईल तसतसें अधीक करीत जावें. देव परिणामास नेणार समर्थ आहे. ” या

प्रकारें मनांत पूर्वजन्मांतर योगें आणून निश्चय करते झाले कीं 'वय व्यर्थ घालवणें नीट नव्हें.' ही सल्ला दादाजी कोंडदेव यास विचारली. त्यांनीं 'आपण म्हणतां परंतु याचा शेवट लागणें परम दुर्घट आहे. सर्व पृथ्वी यवनांनीं पादाक्रांत केली. स्थलें, किल्ले, जागा, फौज त्यांची भरली. या करण्यास आपणास मातबर स्थलें असावीं, हिंदु राजे व हिंदु फौजा जागा जागा साह्यकर्त्या असाव्या, आपण परमश्रम साहसांनीं दुष्कर्म करावें, त्या समयीं ईश्वराची अनुकूलता व सिद्धपुरुषांचा आशीर्वाद असतां अशा गोष्टी घडतील. साहेब मनांत आणितात हें कठीण. वडिलें यवनांची सेवा करून योग्यता मेळवून दौलत संपादन केली. याचा विचार म्हणतां तरी हें युग विपरीत. तेव्हां दिवसेंदिवस धर्म क्षयास जाणार, तेव्हां हें घडणें दुरासाद. कालदेशवर्तमान तींहीकरून मनस–ब्यास येत नाहीं. वडिलीं दौलत संपादिली ती गमाविली हे वाट्यास न यावें,' अशा प्रकारें सांगितलें असतां महाराजांनीं, चित्तांत मसलत करण्याचे गुण सांगितले तितके मात्र घेऊन दोष ठेविले नाहींत. 'उपेक्षा करणें ठीक नाहीं. आपण चित्तांत आणिलें तसें करावें. धर्म वृद्धिंगत करण्यासाठीं प्राण दौलत गेली तरी जावो. प्रयत्न करावा' हेंच मनःपूर्वक आणून पहिलीं दौलतींतील माणसें संक्राजी निळकंठ व बाळकृष्ण मजमदार व सोनोपंत व रघुनाथ बल्लाळ कोरडे शिवाय सरदार वगैरे ममतेंत मसलतींत येतील त्याप्रमाणें घेऊन आणखी चांगले मर्द शिपाई ठेवावा, असें करूं लागले. तशीं च राजकारणें करावीं; मातबर चहूं जागचे मराठे यांसी आप्तपणा करावा, पत्रें लिहावीं; त्यास आणून भेट घ्यावी. आपण त्याजकडे जाऊन "आम्हांस अनुकूल असावें" असें बोलावें. असें करण्यांत ज्यांनीं माहाराजांचें बोलणें परम आदराचें व पराक्रमाचें ऐकावें त्यांस वेध लागून वाटावें कीं 'हे परम थोर होत, यांचे च संमतें चालावें, हे सांगतील तसें चालावें.' अशी सर्वांचीं चित्तें वेधून घेतलीं. शके १५६२ यांत या मसलतीचा आरंभ करिते झाले."

---

# गुप्त कट व लोकांची जमवाजमव



स्वराज्यस्थापनेसाठीं बालशिवाजींचे कायकाय प्रयत्न चालत असावे याची कल्पना येथें दिलल्या पत्रावरून येण्याजोगी आहे. स्वराज्य स्थापण्याच्या कल्पनेस परमेश्वराची अनुकूलता आहे असें वाटत असलेल्या लोकांकडून देवासमक्ष एकमेकाशीं इमानानें वागण्याच्या शपथा घेववीत असें दिसतें. अशा रीतीनें हा कट स्थापन होऊन त्याची गुणगुण सरकारदरबारांत जातांच त्यांनीं डोळे वटारले म्हणजे कटांतील माणसांची त्रेधा उडे. त्यांच्या सांत्वनार्थ शिवाजा महाराज कोणती भाषा वापरीत हें या पत्रावरून कळून येईल. तथापि हीं पत्रें बनावट आहेत असा कित्येकांचा आक्षेप आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. या प्रश्नाचा निर्णय होण्यास आणखी नवीन कागद शोधून काढले पाहिजेत.

[ खं. १५ पृ. २७२ ] श्री १५६७ वैशाख शु. १

( सिका ) नकल

राजश्री दादाजी नरस प्रभु देशपांडे व कुलकर्णी ता॥ रोहिरखोरें व वेलवंडखोरे यासी. प्रांत सिवाजी राजे सु॥ खमस अर्बैन अलफ. तुम्हांस मेहेरबान वजिराचा विजापुराहून हुकूम आला तो ठाणे सिरवलाहून अमिनानी तुम्हाकडे पाठविला. त्याजवरून तुमचे बाप नरसीबाबा हवालदिल जाले वगैरे कितक बहुतेक लिा. त्यास शाहासी बेमानगिरी तुम्ही व आम्ही करीत नाहीं. श्रीरोहिरेश्वर तुमचे खोरियातील आदि कुलदेव तुमचा डोंगरमाथा पठारावर शेंद्रिलगत स्वयंभू आहे. त्याणी आम्हांस यश दिल्हे व पुढे तो सर्व मनोरथ हिंदवी स्वराज्य करून पुरविणार आहे. त्यास बाबास हवाल होऊ नये खामाखा सांगावा आणि तुम्ही तो कागद घेऊन सिताब हुजूर येणें. राजश्री श्रदादापंताचे

विद्यमानें बाबाचें तुमचे व आमचे श्रीपासी इमान जाले ते कायम वज्रप्राय आहे त्यांत अंतर आम्ही व आमचे वंशज लेकराचे लेकरीं वतन वगैरे चालविण्याविसी कमतर करणार नाहीं. हें राज्य व्हावें हें श्रीचे मनांत फार आहे. याप्रमाणें बाबाचे मनाची खातरी करून तुम्ही येणें. र॥ छ२९ सफर बहुत काय लिहिणें ( मोहोर )

रुजू सुरनीस माहे सफर बार

---

# प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें वाढतें स्वराज्य

शिवाजी महाराजांनी आपल्या वयाच्या अकराव्या वर्षापासून स्वराज्य स्थापनेच्या खटपटीस प्रारंभ केला व त्या कामीं त्यांना अनेक विद्वान्, अनुभवी व धोरणी मुत्सद्यांचे पाठबळ होतें हें त्यांच्या नांवानें निघालेल्या अनेक आज्ञापत्रांतील अर्थपूर्ण मुद्रेवरून स्पष्ट आहे. ' प्रतिपच्चंद्र रेखेव ' या मुद्रेचा प्रारंभ शके १५६१ मध्यें झाला; व महाराजांनीं दिलेल्या बहुतेक सनदावर ती आढळते. या सनदांतील भाषा फारसी शब्दांनीं भरलेली असते. त्यांचा अर्थ कळण्यासाठीं हें पत्र भरपूर टीपांसहित नमुन्या दाखल दिलें आहे. तत्कालीन बादशाही सनदा वाचणारांसहि हा नमुना उपयोगी पडण्याजोगा आहे. [ च. सं. व्र. पृ. ६७]. ही सनद १५६८ कार्तिक शुद्ध ३ रोजीं दिलेली असून प्रारंभीच्या अष्टकोनी शिक्यांत प्रत्येक ओळींत कोणतीं अक्षरें आहेत हें सोबतच्या चौकटींतील मजकुरावरून समजेल.

| प्रतिपच्चंद्र<br>रेखेव वर्धिष्णु<br>विश्ववंदिता ॥ शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा<br>भद्राय राजते ॥ |
|---|

अजं[1] रख्तखाने[2] राजश्री सीवाजि[3] राजे दामदौलतहू[4] बजानेब[5] कारकुनानि[6] हाल[7] व इस्तकबाल[8] पा।[9] इदापूर[10] बिदानंद[11] सुा[12] सबा[13] अबैन[14] अलफ[15] बो।[16] संभाजी[17] भोसले देशमुख पा।[19] मजकूर हुजूर एउनु[20] मालूम केले जे[21] आपणासि[22] इनाम बा।[23] मोकदमी मिरासी[24] कसबे[25] मजकूर जमीन चावर जिराती ४॥ पा[26] उणे पांच देर[27] सवाद[28] कसबे मजकुर बा। थल निमजग।[29] अजं[30]

पाच पैकी बा।[31] फर्मान हदेसिके[32] खास देखील[33] नख्तयाती[34] ता।[35] ठाणे ता। देहाये[36] व बाजे[37] पटिया[38] व महसूल[39] व उंट[40] व कडबा[41] व बाजे[42] बाबा व वेठी[43] बेगारी फर्मासी[44] कुल[45] बाब व कुल कानू रवा[46] आहे सालबाद भोगवटे तसरुफाती[47] चालत आले आहे हाली[48] साहेबासि[49] मुकासा अर्जानी[50] जाला आहे माहाली कारकून ताजे खुर्दखताचा उजूर करितात सरजाम[51] होए मालूम जाले तरी बो सभाजी भोसले देशमुख पा मा यासि इनाम बा मोकदमी मिरासी कसबे मजकूर जमीन जिराती चावर पाउणे पाच पैकी बा फर्मान हद सिके खास देखील नख्तयाती ता ठाणे ता देहाय व बाजे पटिया व महसूल व उट व कडबा व बाजे बाबा व वेठी बेगारी व फर्मासी

---

१ हून, पासून २ फरासखाना अज रख्तखाना इ राजश्री= राजश्रीच्या फरासखान्यांतून ( हुकूम केला जातो कीं ) ३ 'शि'वाजी अशीं अक्षरें नाहींत ४ अखंडितलक्ष्मी ५ स, प्रति. ६ कारकून याचें अनेकवचन ७ वर्तमान ८ भावी ९ परगणा १० इंदापूर ११ ( हुकूम ) दिला जातो १२ सुहूरसन १३ सात १४ चार्ळीस १५ हजार १६ इसमाने १७ जि ऱ्हस्व आहे १८ राजे उपपद नाहीं १९ उपर्युक्त परगणा २० एउनु=एऊन २१ कीं २२ सि ऱ्हस्व आहे २३ बद्दल २४ वंशपरंपरेची २ उपर्युक्त कसबा २६ पाव २७ आंत २८ शिवार २९ निमजगा नांवाच्या थळांत ३० पैकी. चावर या शब्दास मागे फारशी व पुढें मराठी अशी दुहेरी शब्दयोगी अव्ययें लावलीं आहेत. ३१ बरहूकूम ३२ खास शिक्याच्या ३३ सुद्धां ३४ नख्त यांचे बहुवचन ३५ ताहा ३६ गांव. देह=गांव याचे बहुवचन ३७ इतर ३८ पट्या ३९ वसूल ४० ही बाब काय होती तें समजत नाहीं ४१ एक बाब ४२ इतर बाबा ४३ वेठ बिगार ४४ निवडक ४५ सर्व ४६ चालत ४७ वार्षिक चालीचा भोगवटा ४८ सध्या ४९ सि ऱ्हस्व काढली आहे. ५० साध्य, प्राप्त ५१ आक्षेप, मागणी

कुलबाब कुलकानु भोगवटे तसरुफाती साला बाद चालिले असेली[53] तेणप्रमाणें दिधले आहे दुमाले[54] कीजे औलद[55] अफलाद[56] चालविजे दर[57] हर[58] साल ताजे खुर्दखताचा उजूर न कीजे तालीक[59] घेउनु असली[60] फिराउनू[61] दीजे मोर्तब सूद[62]

तेरिख १ माहे सौवाल
सौवाल                                   सुरू सूद




---

# स्वराज्यसिद्ध्यर्थ माणसांची जमवाजमव.



पुढें दिलेल्या पत्राचा सारांश धुळ्याचे संशोधक रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं काढला आहे तो असा: " बीरवाडीच्या तप्याखालीं बाजी पाटील व माल पाटील यांचीं कांहीं गांवें अदिकारपणाचीं होतीं. पाटलांना हुसकावून देऊन तीं गांवें चंद्रराव मोरे खात होता. चंद्ररावानें तीं गांवें बीरवाडीच्या तप्याखालून काढून कांगोरीच्या किल्ल्याखालीं वर्ग केलीं होतीं. या सुमारास कांगोरचा किल्ला छत्रपतींनीं हस्तगत केला असावा, असें दिसतें.

---

५२ येथपर्यंत अर्जदाराच्या अर्जाचा सारांश झाला. यापुढें महाराजांचा उत्तरा दाखल हूकुम ५३ असेली=असेल ५४ स्वाधीन ५५ पुरुष संतति ५६ स्त्रीसंतीत ५७ आंत ५८ प्रत्येक. दरहरसाल=प्रत्येक वर्षी ५९ नकल ६० मूळ ६१ परतून ६२ झालें ६३ प्रारंभ.झाला. पत्राच्या शेवटीं ' मोर्तब सूद ' असा फारसी शिक्का असे. त्या ऐवजीं हा संस्कृत ( मर्यादेयं विराजते ) योजण्यास सुरुवात झाली होती. यावरून स्वभाषाभिमानाचें जनकत्व महाराजांच्या पदरच्या कोणत्या विद्वानाकडे दिलें पाहिजे त्याचा शोध झाला पाहिजे.

कांगोरी किल्ला छत्रपतींनीं जिंकल्यामुळें त्यांचे पाशीं दाद मागण्यासाठीं उभयता पाटील गेले. आपलीं गांवें आपणांस परत दिल्यास आपण, जरूर पडेल तेव्हां, महाराजांची सेवा करण्यास दहा लोकानिशीं येत जाऊं असें त्यांनीं कबूल केलें. हें पाटलाचें म्हणणें मान्य करून छत्रपतींनीं त्यांचीं गांवें त्यांस दिलीं. व जरूर पडेल तेव्हां दहा लोकांनिशीं चाकरीस येत जावें असा त्याच्याशीं करार केला. " [ भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त पृ० १६७-६८ ]

[1]ईं कौलनामा अजे [2]रख्तंखाने राजश्री सिवाजी राजे दामदौलतहु[3] बजानेबुं[4] मालें पाटील व वाजी पाटील व अदिकारी तपे बीरवाडी मु॥ इसने खमसैन अलफ बांदे[5] कौलनामा ऐसाजे बीरवाडी खालील देह चंदरराउ खात होते. तेथील अदिकारपण आपलें आहे. येस्यास चंदररायामधें व आपणामधें बरेपणा नाहीं म्हणौउनु सदरहु गांवीचें अदिकारपण चंदरराउ खात असेती. त्यांसी जरी आपण कुसूरं[6] करावा तरी ते सबल; आपण कमजोर; याकरितां आपण गै करीत गेलों. हालीं सदरहु गांव चंदररायें किले[7] कांगोरी खाले दिधले आहेति. हे खबर आपण आइकोनु साहेबांचे सेवेसी आलों आहों. तरी आपण मिरासीदार नफर[8] आहों. साहेबीं आपणास हातीं धरुनु आपला आदिकारपण आपणास देउनु मिरासीवरी बैसविले पाहिजे. सालाबाद हक लाजिमा[9] जो गांवगना असेली त्याप्रमाणें आपण खाउनु चाकरी आदिकारपणाची करुनु. जें वख्तीं साहेबास मसलतींचें काम पडेल ते वख्तीं जैसे मावले देसमुख आपले लोक घेउनु मसलतीस साहेबांपासीं येताहेती ते च हेरें[10] निसबेतीन जे वख्तीं मसलतीचें काम साहेबास पडेल ते वख्तीं आपण दाहा १० लोक बराबरी घेऊनु साहेबांचे सेवेसी येउनु दरोज रोजमुराबदल अडसेरी[11] टके[12] ८६ सों दर

---

१ हें अभयपत्र २ सिवाजी राजे यांच्या फरासखान्यांतून ३ लक्ष्मी अलंकृत ४ माल पाटील यास. ५ कारणें. ६ तंटा. ७ हा किल्ला बीरवाडीच्या दक्षिणेस आहे. ८ मनुष्य. ९ जाबाबदारी १० स्वतः जातीनिशी. ११ अर्धा शेर. १२ अर्धा आणा.

नफरे घेउनु मसलती जो वरी असेली तोंवरी साहेबकाम करूनु मसलतीचें काम जालियावरी साहेब रजा देतील तेथवा गांवास जाउनु " म्हणौउनु मालूम केले. बरोये मालुमाति खौतिरेसी आणौउनु साहेब तुम्हांवरी मेहरबान होउनु सदरहु गांवाचें अदिकारपण तुमची मिरासी तुह्मास दिल्ही असे. तुम्ही अदिकारपण खाउनु अदिकारपणाची चाकरी करणें. हक लाजिमा व गांवखंडी व किरकोळी हक नि॥ बलुते व बाजे हक खाउनु लेंकराचे लेकरीं खाणें व जे वख्तीं मसलतीचें काम पडेल ते वख्तीं तुम्ही दाहा लोक १० बराबरी घेऊनु साहेबापासीं येत जाणें, जोंवरी मसलतीचें काम असेल तोंवरी दाहा लोकांनसीं चाकरी करुनु दरोज रोजमुरा दर नफरे रुके ८६ प्रमाणें साहेबापासुनु घेत जाणें. मसलती जालियावरी साहेबाची रजा घेऊनु गांवांस जात जाणें ये बाबे कौल असे.

---

# चंद्रराव मोरे.



चंद्रराव मोरे राजे जावळीकर यांस अफजलपूर उर्फ बावधनचे बादशाही हवालदार यानीं लिहिलेलें पत्र येथें दिलें आहे. मायन्यावरून चंद्रराव मोऱ्यांच्या थोरपणाचा अंदाज करतां येतो.

शके १५६७ मधील या पत्रांत चंद्रराव यांस बादशाही हवालदार रामराम लिहितात. यावरून रामदास व शिवाजी यांची गांठ पडण्यापूर्वी 'रामराम' करीत असत असें या पत्रावरून शाबीत होत आहे.

'गोणियामधे घालूनु,' दम कोंडून जबरदस्तीनें कतबे लिहून घेत व मुलखांत त्यावेळीं मारामाऱ्या व जबरदस्ती होत असे याचें दर्शक हें पत्र आहे. वगैरे अनुमानें रा. का. ना. साने यानीं या पत्रावरून काढिलीं आहेत.

---

१३ प्रमाणें. १४ हकिकत. १५ मनास

आषाढ वा। १ शके १५६८

मा। ह्या राजमान्या विराजित राजमान्य

राजश्री चदरराऊ राजे गोसावी यासि

जाब सुद

॥ S ॥ श्रीमत प्रहुडप्रिताप अखडित लक्ष्मी आलकृत परोपकार मूर्ती महामेरू राजमान्य राजश्री

प्रति स्नेह आंकित गोमाजी नरसिह व रामाजी कृस्ण हवाले अफ-जलपूर महमूदशाही उरुफ का। बावधन पा। वाई रामराम विसेश येथील क्षेम तो धर्म श्री गोसावी स्वकीये कुशेल लिहिती आज्ञा केली पाहिजे विसेश पिलाजी मालोजी बिराजर देसाई इही वाडी कसबे मजकुरीची मारूनु वस्तभाव नेली व कुणबी २ धरूनु नेले होते त्यास मार करूनु व गोणियामधे घालूनु त्या पासूनु कतबे लेहोनु घेतले व जमान घेतले तोवरी गोसावि यासि खबर लिहिली त्या वरुनु त्यास लेहोनु कुणबी सोड-विले परतु त्याची वस्तभव दिधली नाही जमानदारास तगादा करिताती तो जमानदार येउनु या कुणबीयासि तगादा लाविती यावरुनु रयेता बेदील होऊनु वाडी पडते वाडी पडली म्हणिजे दुरी दराज लागेली तरी राउळी त्यास कागद लेहोनु त्याचा कतबा व याच्या वस्ता पाठऊनु देविलिया पाहिजेती गोसावियामधे व हजरती साहेबामधे वेगलीक नाही आणि दरम्यान हे लोक यैसे अमल करनु बदलाम करिताती तरि त्यास ताकीद लेहोनु सदरहु गोष्टींचा तगादा तोडूनु टाकाविला पाहिजे या उतरा वरूनु हुजूर खबर लिहिणे लागेली ये विसी बहुत काये लिहिणे गोसावी विवेकी आहेती कृपा असो देऊनु कागदी पत्री संभाळित जाणे छ १४ जमादिलोवल सु॥ सबा अर्बैन अलफ हे विनाति * मोर्तबु

[ वा-इ-१८३८ पृ-६

---

१ हीं अक्षरें बरोबर लागत नाहींत. २ त्यावरी, त्यावर ३ राजांनीं * मूळ मोडीपत्र विरामचिन्हांरहित येथें जशास तसें छापलें आहे.

# यवनांच्या नोकरीपेक्षा स्वराज्याचा प्रयत्न करणें श्रेयस्कर.

शके १५७१ मध्यें शहाजीस कैदेंतून सोडतांना विजापूर दरबारानें ज्या मानहानिकारक अटी घातल्या त्या त्यानें मान्य केल्या. हें पाहून शिवाजी महाराजांना संताप आला व त्यांनीं या प्रसंगीं आपल्या वडिलांचें धोरण कसें चुकत आहे व स्वतंत्र स्वराज्य स्थापण्याची अवश्यकता कशी आहे यासंबंधी आपले विचार सोनाजी पंडिताजवळ बोलून दाखविले. वडिलांनीं यवनांची नोकरी इमानें इतबारें केली तरी त्यांच्या हातून ह्मणण्याजोगी महत्वाची कामगिरी झाली नाहीं व उलट त्यांच्यावर कैदेचा मात्र प्रसंग आला, तेव्हां नोकरीनें महत्व प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे हें त्यांच्या बोलण्याचें तात्पर्य होते. या उताऱ्यांतील भाषा कानडी वळणाची आहे. याकरितां तिचा दुर्बोधपणा घालविण्यासाठीं क्वचित शाब्दिक फेरफार केला आहे:—

अपुले वडील शाहाजी राजे यांनीं अल्ली यदलशाहापासून मोकळीक होणेस्तव लाभलें राज्य देखील सोडून सातारांस येऊन राहिल्यावरी शिवाजी राजे पुरंदर गडांत होते. त्यांनीं आपला मंत्री सुवर्ण नामक ब्राह्मण (किंवा सोनाजीपंत) त्यास बलाऊन येकांतीं सांगितलें जे “अमुचे वडील शाहाजी राजे परम शूर आणि योगवंत हि. त्यांनीं केलीं कामें हि निर्मल मनें करून केलीं; परंतु त्यांत थोडा भाव सुचतो. तो असा कीं ते प्रथम निजामशहाच्या संगतीस होते; ते अल्ली यदलशाहाचे बोलावण्यावरून त्यांकडे आले. परतून निजामशाहांनीं बलावितां च याकडे गेले. पुनः अल्ली यदलशाहाकडे हि आले. ऐशा दोन तीन येरधारा जाहल्या. यवनांच्या संगतीस ते जितके दिवस होते तितकेदिवस त्यांचीं कामें इमानानें करून हि त्यांना यांचे ठाईं कपटच भासावयाजोगें जाहलें. परंतु आपलें म्हणून विश्वास धरावयास स्थळ राहिलें नाहीं. यवनानीं यांच्या हातून आपलीं कामें करवून घेऊन तदनुसार मान बहुमान केले, येवढेंच.

परंतु ' हें आपलें ' म्हणून मानावयाजोगी करणी वडीलांकडून घडली नाहीं. याचें कारण हेंच कीं थोर मनुष्यांनीं येकाची संगति धरिल्यावरी त्याशीं बिगडताच नयें. कदाचित् बिगडावयाजोगें [ जाल्यास ] परतून त्याशीं मिळू नये. हे तो प्रसिद्ध नीति आहे. त्यांत हि वडील अंगेवरून शूर आणि इमानानें वर्तले तरीहि कृत्रिमी यवनापासून वडीलांस ईश्वरें राखिलें इतकेंच. आह्मी प्रयासान घेतल सिंव्हगड हि व आपण बहुत प्रयास करून संपादिलें ब्यंगळूर हीं यवनास सोडून देऊन साताऱ्यांत येऊन राहिले. आतां त्यास वृद्धाप्यदशाहि आली. याउपरी आम्हांस सुचल्या बुध्धीनें वागलें पाहिजे. अलीयदलशाहाकडे वडिलांनीं अनेक प्रयास केले तरी हि त्यांचे चित्तांत आम्ही जड जाहलों. आम्हांस तोडावें म्हणूनच आहे. तसेंच निजाम-शाहाचें राज्य जिंकून देवगिरिदुर्गांत आहे ( त्या ) अवरंगजबास हि आम्ही येक शल्य होऊन अहों. आम्हास तोडावें म्हणावयाचेंच त्याच्या मनांत आहे. या दोन प्रबल शत्रूमध्यें आम्ही पुरंदरगडांत असून राज्य करावें म्हणिजे आम्हांस कदापि साधणार· नाहीं. येखादे वेळेस दगा करून आम्हांस बुडवितील. याकरितां आह्मी बाहेर निघून या दोघास हि आवरावें तेव्हांच आमचा टिकाव होईल. हे तजवीज तुम्हास मानते काय? म्हणून विचारल्यास त्यांनीं उत्तर दिल्हे जे. महाराजांनीं केली तजवीज इतुकी ही खरीच. प्रस्तुत माहाराजांनीं योजिलें कार्य हि करावेंच. ईश्वर हि साह्य होईल. ह्मणून त्यांनीं जबाब दिल्हा. त्यावरून महाराज शिवाजी राजे फौजेची संजोगणीत्व [ करून ] यवनावरी राजकारणास प्रवर्त्तले.

[ तंजाउरचा शिलालेख पृ. २४



# राजनीति.



कैदेतून सोडतांना महमद अदिलशाहानें शहाजीस दोन अटी घातल्या होत्या, त्या अशा : ( १ ) संभाजीनें बेंगरूळ सोडावें आणि ( २ ) शिवाजीनें सिंहगड सोडावा. खरे पाहतां संभाजीनें फरादखानाचा पराभव करून व शिवाजीनें मुसेखान व फत्तेखान यांना धुळीस मिळवून आपल्या बापाच्या मुक्ततेसाठीं अदिलशाहास चांगलाच शह बसविला होता. परंतु शहाजीनें महमदशाहाच्या दोनहि अटी मान्य करून आपली सुटका करून घेतली. तेव्हां बापाच्या धोरणाची निंदा करून सिंहगडासारखा किल्ला द्यावा लागल्याबद्दल संतापलेल्या व मी विजापुरावर स्वारी करणार असें प्रतिपादणाऱ्या शिवाजीस आवरून धरून सोनाजीपंत खरी राजनीति सांगतो.

दुरंतं बलवद्वैरं दुरंतः पापसंचयः ।
दुरंताभ्यर्हितागर्हा दुरंता गुरुगर्हणा ॥ १ ॥
विधाय बलवद्वैरं तव तातः कृताग्रहः ।
नाभूदवहितो यर्हि तदर्हस्तार्हि निग्रहः ॥ २ ॥
स प्रभावी महाराजो मंत्रिणस्तस्य सुव्रताः ।
तेन यद्बलवद्वैरं कृतं सोपनयः कृतः ॥ ३ ॥
तनुते यद्बलं वैरमबलीयान् बलीयसा ।
तर्हि तस्य पराभावे सर्वथा प्रभुरेव सः ॥ ४ ॥
दानमभ्यधिके शत्रौ समे साम विधीयते ।
ऊने दंडविधिः प्रोक्तो भेदः साधारणः स्मृतः ॥ ५ ॥
दिने दिने भवन्नूनः समस्साम्यं विमुंचति ।
आधिक्यं चाधिको येन को भेदं न प्रशंसति ॥ ६ ॥
नरेंद्र नूनमूनोऽपि द्वेषणो भेदमर्हति ।
ऊनस्याप्यूनतात्यर्थं हितायैव भवेद्युधि ॥ ७ ॥
ऊनोऽपि यदि दूनोयमिति मत्वानुनीयते ।
तर्ह्यन्तः श्लाघ्यमानोसौ स्वमेव बहुमन्यते ॥ ८ ॥

ऊनानामप्यनूनत्वमनूनानां तथोनता ।
दृश्यते मनुजाधीश समयांतर वैभवात् ॥ ९ ॥
तस्मादूने नरेंद्रेण द्विषि दण्डो विधीयते ।
मते पत्युरपां येन मनस्सम्यङ्निधीयते ॥ १० ॥
गिरयो नैव गुरवो गुरुरेव गुरुर्मतः ।
भवतात्र प्रभवता दत्तः सिंहाचलस्ततः ॥ ११ ॥
प्रदत्ते द्विषतेऽमुष्मिन् विमुक्तश्चेत् स पार्थिवः ।
तर्हि दत्तोऽपि भवता न दत्तः सिंह्पर्वतः ॥ १२ ॥
यः सिंह्पर्वतं मेने समं शाहसुमेरुणा ।
बिंगरूरं च नगरं किं कृतं तेन वैरिणा ॥ १३ ॥
उपक्रांतामिदानीं तु त्वया विजयमंडलम् ।
सुविक्रांतस्य नृपतेः सर्वमेव महीतलम् ॥ १४ ॥
समं च विषमं चेति वैरं द्विविधमुच्यते ।
प्रथमं तु समेनाहु र्द्वितीयमधिकेन चेत् ॥ १५ ॥
समे समत्वादुभयो र्नभवेद्विजयः खलु ।
अधिकस्याधिकत्वेन विषमे विजयो ध्रुवम् ॥ १६ ॥
फत्तेखानप्रभंगेन मुसेखानवधेन च ।
अहर्दिवं प्रभो तुभ्यं महमूदोऽभ्यसूयति ॥ १७ ॥
पश्य येदिल दिल्लींद्रौ विषयानन्तरौ तव ।
यवनौ बालिनौ तुभ्यं द्रुह्यतोहर्निशं नृप ॥ १८ ॥
अमू उभयतो यस्य द्वेषणौ रोषणौ तव ।
तस्य नूनमिहस्थाने स्थितिः स्थाने न संप्रति ॥ १९ ॥
अतोऽति दुर्गमं स्थानमास्थाय जगतीपते ।
यतस्व जगतीं जेतुं किमजय्यं शिवस्य ते ॥ २० ॥
न दुर्गं दुर्गमित्येव दुर्गमं मन्यते जनः ॥
तस्य दुर्गमता सैव यत्प्रभुस्तस्य दुर्गमः ॥ २१ ॥
प्रभुणा दुर्गमं दुर्गं प्रभुर्दुर्गेण दुर्गमः ।

अदुर्गमत्वादुभयोर्विद्विषन्नेव दुर्गमः ॥ २२ ॥
संति ते यानि दुर्गाणि तानि सर्वाणि सर्वथा ।
यथा सुदुर्गमाणि स्युस्तथा सद्यो विधीयताम् ॥ २३ ॥
सुवर्णशर्मणोवाचमिमां श्रुत्वा नृपोत्तमः ।
माननीयोऽति महतां माननीयाममन्यत ॥ २४ ॥

शिवभारत अध्याय १६

# शहाजी शिवाजी संबंध



मराठ्यांच्या इतिहासांतील महत्त्वाच्या मित्या देणाऱ्या दहा पंधरा शकावल्या व टिपणं प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत भोर संस्थानांतील कारीचे इनामदार जेधे देशमुख यांच्या संग्रहीं असलेली शकावली चांगली विश्वसनीय आहे अशी संशोधकांची खात्री होत चालली आहे. ती कैलासवासी लोकमान्य टिळक यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या संमेलन प्रसंगीं संशोधून मांडली. या शकावलींत शके १५४० पासून १६१९ पर्यंतच्या मित्या दिल्या आहेत. त्यापैकीं दोन मित्या येथें उदाहरणादाखल दिल्या आहेत.

शके १५७० सर्वधारी नाम संवछरी श्रावण वद्य प्रतिपदा. शाहाजी राजे मुस्तफाखानें धरिले; नजीक चंदी. त्याजबा। कान्होजी ना। जेधे व दादाजी कृष्ण होते त्यास कनकागिरीस अटकेंत ठेविलें. तें समयीं दादाजी पंताचा पुत्र रत्नाजीपंत कनकागिरीस मृत्यु पावले.

शके १५७१ विरोधी संवछर ज्येष्ठ शुद्ध पूर्णिमा. शाहाजी राजे येऊन कोंढाणास येऊन सोडिले. ते समई कान्होजी नाईक जेधे व दादाजी कृष्ण लोहकरे यांस सोडिलें. माहाराजांची व त्यांची भेटी जाली. ते समई माहाराज बोलिले कीं " तुम्हीं आम्हांमुळें बंदिवासी, श्रमी जालेस. याउपरि

आम्ही पातशाहासी तह केला कीं बारा गांवांतून मुजरा करून हुकूमप्रमाणें कर्नाटक प्रांतें ममलत करावी. त्यावरून बेंगरूळ प्रांत पांचा लक्षा होनाचा जाहागीर दिल्हा आहे, याकरितां आपणास कर्नाटकाची ममलत करावी लागली. तुमचें वतन मावळांत आहे. चिरंजीव राजश्री सिउबा खेडेबारिया व पुणा आहेत. त्याजवळ तुम्ही जमावानसी राहावे. तुमची जबरदस्ती त्यां प्रांतें आहे. अवघे मावळचे देशमुख देखील त्यासी रुजु होऊन त्याचे आज्ञेत वर्तेत ऐसा विचार करून जबरदस्तीनें रहावें. येखादी मोगलाकडील फौज व यदलशाहीकडलि फौज आली जरी आपण इमान राखावा. त्यासी लढाइ करावी.'' ऐसी शफथ इमान पुरस्कर बेलरोटीवर हात टेऊन घेतली. तैसीच त्याणीं हि कान्होजी नाइकास शपथ दिल्ही आणि कान्होजी नाईक यांस वस्त्रें देऊन बराबर हुजऱ्या व पत्रें देऊन राजश्री सिवाजी राजे यांजकडे पाठविलें.

---

# कर्यात मावळ शिवाजी महाराजाचें



येथें दिलेलें निवाडपत्र शके १६०० मध्यें लिहिण्यांत आलें असून त्यांत निजामशाहाकडून शहाजीस पुणें परगणा मिळाल्यापासून ५०।६० वर्षांतील पुणें परगण्यासंबंधींच्या पांच चार महत्वाच्या गोष्टी नमूद करण्यांत आल्या आहेत. पुणें परगण्यांत सात तर्फा होत्या त्यापैकीं फक्त कर्यात मावळच्या तर्फेचा (३० गांव) मोकासा मात्र शहाजीनें शिवाजीच्या नांवें प्रथमपासून करून दिला होता; सांडस खुर्द (२० गांव) चुलत भाऊ संभाजी यास दिला होता आणि राहिलेल्या पांच तर्फांचा कारभार दादाजी कोंडदेव पहात असे. मुरार जगदेरावानें पुणें जाळल्यापासून ७।८ वर्षेंपर्यंत पुणें ओस पडलें होतें. तें दादाजीनें पुन: वसविलें वगैरे हकीकत बखरींतून आढळतें. दादाजी कोंडदेवाच्या हयातींत कर्यात मावळ

खेरीज पुणें परगण्यांतील इतर तर्फांवर बालशिवाजीच्या नांवें हुकूम सुटत नव्हते. कर्यात मावळाखेरीज चाकण ( श. १५६१ ), इंदापूर ( श. १५६८) व सुपे परगण्यांतील पणदरे गांवचा मोकासा शिवाजीस मिळाला होता. दादाजी मरण पावतांच सर्व पुणें परगणा शिवाजीनें ताब्यांत घेतला. तरी हि कर्यात मावळ हें खास शिवाजीच्या नांवचें असें शेवटपर्यंत मानण्यांत येत असल्यामुळें शाइस्तेखानाच्या वेळी मारामारीचा भर कर्यात मावळांत होता. पुरंदरच्या तहांत जैसिंगानें पुणे प्रांत घेतला तेव्हां देखील कर्यात मावळचा वसूल बादशाही अमलदार शिवाजी महाराजांच्या नांवानें वजा घालीत असत.

अजे[1] रख्तखाने राजेश्री शिवाजी राजे साहेब दामदौलतहू. ताहा[2] पायगुडे व कर्जवणे देशमुख व मोकदम व कुलकर्णी व रयान[4] कर्यात मावळ प्रांत पुणें. सुहूरसन तिसा सबैन अलफ. मालूम दानद[5]. मोरो विठल होनप देशकुलकर्णी कर्यात मजकूर[6] हुजूर येऊन आपली हकीकत जाहीर केली कीं "आपले वडिलांची मिरासी देशकुलकर्णी, तर्फ पुणे ७ बितपशील:—

तर्फ नीरिथडी देहे[7] ३७
तर्फ हवेली देहे ८२
तर्फ कडेपठार देहे ४३
तर्फ सांडस खुर्द देहे २०
तर्फ सांडस बुद्रुक देहे २९
तर्फ कर्यात मावळ देहे ३६
तर्फ पाटस देहे ४३

येणेंप्रमाणें पिढी दरपिढी कारकीर्द दरकारकीर्द देशकुलकर्ण चालत आलें आहे. ऐसीयासि राजश्री महाराज साहेबांस[8] निजामशहा यांनीं परगणे मजकूर मुकासा दिल्हा, ते वक्तीं तर्फा तर्फांनीं महाराज साहेबीं ठाणीं ठेऊन हावलदार व कारकून तर्फा तर्फांस सतंतर [=स्वतंत्र ] कमावीस करीत असेती. ते वक्तीं आपल्या वडिलीं गुमास्ते तर्फतर्फांस कारभारास

१ अज=पासून, कडून. २ अखंडितलक्ष्मी. ३ कडे, यांसि. ४ रयत लोक ५ जाणावें. ६ मागें सांगितलेली म्हणजे कर्यात मावळ. ७ गांव ८ शहाजीस.

दिल्हे असतां, कर्यात मावळास गपचूप पुण्याहून पाठविले. त्यांनीं कितेक दिवस मुतालिकी करीत असतां कागदपत्राचा शिरस्ता आपणाजवळीं आणून देत असेती व हकलाजिमा आणून देत असेती. चाकरीचे खे[९]-शीनें आपल्या वडिलासीं वर्तत असतां, रयतेसीं बेदं सलूक केला; ह्मणून त्यास दूर करून नामाजी लांडा पुणेहून गुमास्तागिरी देऊन कर्यात मावळास पाठविला. नामाजी हयात असतां आपला हक लाजिमा व कागदशिरस्ता आपणास देत गला असे. महाराज साहेबांचे कारकीर्द चालत असतां निजामशाही गुदरोन गेली. इदलशाहीतर्फेनें विजापुरीहून मुऱ्हारी जगदेराव सुभा येऊन पुणे जाळून* लुटून तलफ केलें. ते वर्त्तीं दौलत-मंगल उर्फ भुलेश्वर येथें मुऱ्हारीनें किल्ला बांधोन शहर §वसविलें. तेथें आपले वडील नांदावयासी गेले. कितेक मुदती भुलेश्वरी कारभार पडिला. त्या करितां कर्यात मावळी नामाजी लांडा कारभार करीत असे. तो आपला हक लाजिमा व कागदशिरस्ता देत असे. +इदलशाहीतून महाराजसाहेबांस पुणें मुकामा जाहले ते वर्त्तीं साहेबांस कर्यात मावळ व राजश्री मंबाजी राजे भोसले यांसी सांडस खुर्द महाराजसाहेबीं आपणापासून मोकासा दिल्हा. साहेबाचे तर्फेनें कर्यात मावळास हवालदार व कारकून अलाहिदा गेले. त्यासी नांगेजोडी करून नामाजीनें आपणासी बेइमान होऊन नजर बदलली. ऐसीयास आपण येऊन साहेबापाशीं हकीकत जाहीर केली. तों निळो सोनदेव साहेबांचे मजुमदार यांनीं आपाजीची पाठीं राखिली. आपाजीस आपणासी रुजु होऊं देत नाहींत, तरी साहेबीं मेहेरवान होऊन देशमुख व मोकदम व कुळकर्णी व रयतीस ताकीद करून खुर्दखत दिल्हें पाहिजे.'' म्हणून तुम्ही मालूम केले. त्यावरून तुम्हांस बोलावून हकीकत पुसिली. तुम्ही हि सदरहु प्रमाणें

---

९ नात्याने. १० भलती वागणूक

* शके १५५१ ? मोडककृत विजापूरचा इतिहास पृ. १५५ पहा.

§ भुलेश्वरास परगण्याचें ठाणें श. १५५१–५८ होतें. खं. २० पृ. २३४ पहा

\+ शके १५५८ खं. २० ले. २३५ पहा. ११ शिवाजीस १२ संगनमत.

सांगितली. तरीं हलीं मोरो विठल देशकुलकर्णी याचे कर्यात मावळाचे देशकुळकर्णाचा अंमल त्याचे दुमाला करणें. आपाजीस दाखल न करणे. याचा हकलाजिमा यासी देणें. तकरार फिर्याद येऊ न देणें. तालीक घेऊन असल फिरोन देणें. मोर्तब सुद. मोर्तब असे.

---

# साधुपुरुषांचा आशीर्वाद



स्वराज्य स्थापण्याच्या कामी यश येण्यास सिद्ध पुरुषांचा आशीर्वाद पाहिजे अशी महाराजांची भावना असल्या विषयींचा पुरावा पुढें लिहिलेल्या पत्रांत आहे.

[ सनदापत्रें पृ० ११३ ] श्रीभवानी शंकर. १५७५ श्रावण शु. ३

श्रीसकल तीर्थस्वरूप वेदमूर्ति राजश्री सिद्धेश्वरभट बिन मेघनाथभट ब्रह्मे उपाध्ये, परगणे चाकण स्वामी गोसावी यांसी:—

आज्ञाधारक राजश्री शिवाजी राजे बिन शहाजी राजे भोसले साष्टांग दंडवत, सुरू सन अर्बा खमसैन अल्फ पत्र लेहून दिधलें ऐसा जे, स्वामीच्या अनुष्ठानबळें आपण राज्यास अधिकारी जालों व सकळ मनोरथ चिंतिले पावलों, ऐसा अनुभव आला म्हणून व संकटकाळीं साहाकारी जाणोन, पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें, स्वामींस वर्षासन होन पातशाही १०० शंभरी केले असेत. सदरहू वर्षासन यावत्काळ पर्यंत चालऊन यासी अन्यथा करूं अथवा पुढें कोणी आपले वंशपरंपरेचा होऊन अन्यथा करील त्यास श्रीजीची व कुलस्वामीची व आपल्या पूर्वजांची व गोब्राह्मणाची आण असे. यावेगळे स्वर्गदेवतेच्या पूजनास व श्रीनवचंडीमध्यें जपतपहवनास व ब्राह्मणभोजनास जें लागेल, त्याची आज्ञा करीत जाणे. आज्ञेप्रमाणें प्राप्त करीत जाऊन. राज्य स्वामींच्या प्रसादाचें आहे आपण आज्ञाधारक असों. जाणिजे. रवानगी छ १ माहे रमजान मोर्तब. केलें असे.

रूजू सुरूनिवीस

# २ स्वतंत्र स्वराज्याची स्थापना

मुसलमानी पादशहांच्या नोकरींत शहाजीस आपल्या कर्तबगारीच्या जोरावर बरेंच महत्वाचें स्थान पटकावतां आलें खरें. परंतु कांहींहि झालें तरी अखेरीस जातीस जात मिळते व यवनी बादशाहींत हिंदूंची पूर्ण वाढ होण्यास अवसर सापडणें शक्य नाहीं असा खडतर अनुभव शहाजीस निजामशाहींत व नंतर अदिलशाहींत आला. परंतु हा सर्व अपमान सोसून-हि तो यवनांच्या नोकरींत राहिला याचें कारण त्याचें बहुतेक आयुष्य सेवावृत्तींत गेलें होतें. तथापि या मानहानीच्या अनुभवानें शिवाजीमहा-राजांच्या अंतःकरणांत लहानपणापासून यवनी सत्तेचा द्वेष व स्वराज्य स्थापनेची अवश्यकता बिंबविली होती. यामुळें स्वातंत्र्याचा उघड पुरस्कार करण्याची संधी साधण्यासाठीं ते टपून बसले होते. महंमद अदिलशहाच्या मृत्यूनें ही संधि महाराजांना अनायासें मिळाली. तिचा फायदा घेऊन त्यांनीं अदिलशाही व मोगली मुलखावर झडप घातली व आपलें स्वातंत्र्य तरवारीच्या जोरावर शत्रूंच्या अंतःकरणांस पटवून दिलें. याच वेळीं शहा-जीनेंहि ‘ आपण यापुढें अपमान सोसून नोकरी करणार नाहीं. ’ असें विजापूर दरबारास स्पष्टपणें कळविलें. अशा रीतीनें शके १५७८ च्या सुमारास स्वतंत्र स्वराज्याचें जें निशाण शिवाजी महाराजांनीं उभारलें त्यास शहाजीनें अप्रत्यक्षपणें दुजोरा दिला. या वेळीं शहाजीनें औरंगजेबाशीं स्नेह कायम ठेवला होता यामुळें मोगली सरदार नौशीरखान याची मराठी सैन्याशीं चकमक झडल्यानंतर देखील शिवाजीमहाराज व औरंगझेब यांच्या-मध्यें वकीलामार्फत तडजोडीचें बोलणें चालू राहिलें. तथापि शहाजहानाच्या आजारीपणामुळें भावांशीं तंटा करण्यासाठीं औरंगजेबास दिल्लीकडे जावें लागलें तेव्हां आदिलशाही व मराठे यांचें वैमनस्य वाढतें राहावें असा औरंगजेबाचा डाव होता व हें धोरण पसंत असणारें प्रधानमंडळ विजा-

पुरास अधिकारारूढ होऊन अफजलखानाची स्वारी निघाली. या स्वारींत मराठ्यांना यश आल्यानंतर महाराजांनीं ' मोकासेपणाचें ' नातें सोडून आपलें स्वातंत्र्य जाहीरनाम्याच्या द्वारें महाराष्ट्रास कळविलें. या स्वातंत्र्य-चंद्रास पुरंदरच्या तहानें कांहीं वेळ ग्रहण लागलें तरी तें लौकरच सुटून या चंद्राच्या पूर्ण प्रकाशांत शके १५९६ मध्यें राज्याभिषेकाचा अपूर्व समारंभ घडून आला.

---

# अदिलशाहीचे लचके तोडणारे चार नक्र



महंमद आदिलशहाच्या कारकीर्दीत आदिलशाहीचा विस्तार कर्नाटकांत व महाराष्ट्रांत वाढला होता तरी पण ही वाढ दिखाऊ होती. कारण तुंग-भद्रेच्या दक्षिणेकडील सर्व म्हैसूरप्रांत व कर्नाटकप्रांत शहाजीच्या अमला-खाली बहुतेक स्वतंत्र झाला होता; आणि कृष्णेच्या व भीमेच्या पश्चि-मोत्तरीय सर्व प्रांत शिवाजीनें आक्रमिलेला होता. अशा प्रकारें काळजी उत्पन्न करण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली असतां आधीच खंगून गेलेला महमदशाहा जास्त थकून शके १५७८ च्या मार्गशीर्षांत मरण पावला; व त्याच्या मागून एकोणीस वर्षे वयाचा, त्याचा भावडा मुलगा अली, ममनदीवर आला. त्यावेळी अदिलशाहीचे लचके तोडण्यास चोहीकडून शत्रूंनीं उचल केली. तिचें वर्णन करतांना रा. राजवाडे राधा-माधवविलासचंपूच्या प्रस्तावनेंत (पृ. ९४–९५) म्हणतात·—

अली अदिलशाहाला खाऊन टाकण्याला चार नक्र टपून बसले होते. पहिला नक्र शिवाजी, दुसरा नक्र शहाजी, तिसरा नक्र औरंगझेब व चौथा नक्र त्याचे अमीर उमराव. या चार नक्रांतून पहिली कुरापत औरंगजेबानें काढिली. “ ही औलाद महमद शाहाची नव्हे ” असा आरोप बिचाऱ्या

अली.वर औरंगनें आणिला. अलीशाहा औलाद असो, अफलाद असो की नक्कल असो, त्याच्यामुळें औरंगचे कोणतें गोत्र बिघडत होतें तें देव जाणें ! हा आरोप अलीच्या कारभाऱ्यांनीं साहजिकच नाकबूल केला. एवढे कारण लढाई पुकारण्याला औरंगजेबासारख्या धीलझिबबला बस झालें. दुसरे सैतान शिवाजी. त्या कज्जेदलालाला हें भांडण निघालेलें पाहून केवळ हर्षवायू झाला. नवरा मरो, नवरी चुलींत जावो, दोहकिडून अवदान मारण्यास सवकलेल्या या बुभुक्षितानें दोन्हीकडून आपला डाव साधण्याचा बेत केला. अली आदिलशाहालाहि मदत करण्याचें अभिवचन दिलें व औरंगशहाचा हि पक्ष उचलला. खबरदारी मात्र अशी ठेविली कीं एकाची बातमी दुसऱ्यास न कळावी. तिसरें भूत बुढे मिया शहाजी. ह्या वृद्ध कपींनी आपण कशांतच नाहीं म्हणून कानावर हात ठेविले. आपले बंगळूर बरें कीं आपण बरें. शहाजी म्हणजे आज साठसत्तर हजार प्याद्याचा व घोड्याचा मालक. तो जर अलीशहास मिळता तर औरंगजेबा सारख्या टारग्याची, बिचाऱ्या अलीशहाला बडविण्याची काय माय व्याली होती ! पण ह्या वेळीं कर्नाटक सुरक्षित ठेवलें पाहिजे; व तेथून आपल्याला हालतां येत नाही असा बहाणा ह्या म्हाताऱ्यानें केला. आणि तेंहि खरेंच. औरंगझेबानें कर्नाटकांतील संस्थानिकांना चिथवून त्यांच्या कडून बंडाळी खरीच माजविली होती. चौथीं भुतें अलीशहाचे अमीर उमराव. ह्यांची तर सर्वांवर कडी. खाल्ल्या घरचे वांसे जाळणारे हे शहाण आपल्या धन्याशीं हरामपणा करून बाहेरच्या चोराला जाऊन मिळाले. अशी सारी वेताळ सभा भाबड्या अलीशहाच्या भोंवतीं कोलितें घेऊन नाचूं लागलीं असतां औरंगजेबानें बेदर शक १५७९ च्या आषाढ शुद्ध तृतीयेस एका खटक्यासरसें हांटलें. नंतर कल्याणी हि झपाटली. औरंगजेबानें ही बडी शिकार मारिली; तर शिवाजीनें तर त्याच्याहीवर ताण केली. औरंगजेबाला दिलेल्या वचनाला जागून औरंगजेबानें बेदर घेण्याच्या अगोदर एक महिना म्हणजे १५७९ च्या वैशाखांत शिवाजीनें आदिलशहाचें जुन्नर शहर लुटलें व अश्विन वद्य द्वादशीस कल्याण भिवंडी हबकून आदिलशहाचा कोक-

णांतील राज्यभार हलका केला ! औरंगजेबाला दिलेलें अभिवचन अक्षरशः पाळीत असतां अल्लीशहाशीं केलेला करार शिवाजी विसरला नाहीं. अल्ली अदिलशाहाच्या मर्जीखातर शिवाजीनें औरंगजेबाच्या अहमदनगर प्रांतातील गांवें व खेडीं लुटून खुद्द अहमदनगरास नगोरी खानाशीं उर्फ नौसीर खानाशीं दोन हात करून तें शहर लुटिलें. येणेंप्रमाणें दोन्ही पक्षांना रिझविण्याच्या कामगिरीत शिवाजी गुंतला असतांना शहाजीनें कर्नाटकाचा ताबा घेतला. हें नाटक असेंच कांहीं वर्षें रंगत रहावें व त्यांत आपल्याला मनाजोगती सोंग घेतां यावी अशी शहाजी व शिवाजी यांची इच्छा होती. परंतु दाराशुकोहाची माशी शिंकून लढाई एकदम बंद झाली व तह झाला. त्यानें शहाजी व शिवाजी यांना आपल्या बेतांना निराळें स्वरूप द्यावें लागलें. तहानें बेदर, कल्याणी, परंडा निजामशाही कोंकण व वांगी महाल इतक्या प्रांताला आदिलशाही मुकली. पैकीं निजामशाही कोंकण शिवाजी दाबून बसलाच होता. आता विजापूर प्रांतापासून म्हैसूरच्या उत्तरेकडील तुंगभद्रेपर्यंतचा प्रांत तेवढा आदिलशाहाच्या ताब्यांत मोंगलांचा मांडलीक म्हणून राहिला. तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील प्रांत शहाजीनें कायमचा बळकाविला होताच. महंदशाहा मेल्यानंतर फक्त एका वर्षांत त्याच्या दिखाऊ ऐश्वर्याचें भांडवल फुटून अदिलशहीचें दौर्बल्य अगदी उघडकीस आलें.

---

# औरंगजेबाचीं शिवाजीस पत्रें



[ खंड ८ लेखांक ५ ] अलीफ १५७९ वैशाख वद्य ६

सर्व उमरावांत श्रेष्ठ, आपले बरोबरीचे मंडळींत थोर, नानाप्रकारचे कृपेस पात्र, शिवाजी भोसले, बादशाही कृपेस पात्र कृतकृत्यता पावून जाणोत कीं तुमची अर्जदास्त इकडील पंज्याचे निशाणाचे फर्मान पोहों-

चल्यानंतरची, पाहली. हरएक विषयीं जें सांगणें तें तुम्हांकडील वकील सोनाजी यांजपाशीं सांगितलें. त्यांणीं तुम्हांसी बोलोन खातरजमा केलीच असेल. साप्रत जे किल्ले व मुलूक, विजापूरकराकडील, तुमचे हातीं होते ते पेशजीप्रमाणें होऊन तुमचे मनोगताअन्वयें बंदर दाभोळ व त्याजखालील मुलूख तुम्हांस दिल्हा असे. ऐशीयास, इकडील दौलतीची किफायत मदत जी करणें असेल तिचा समय हाच आहे. हें जाणोन करण्यांत आणावें आणि हूजूर भेटीस यावे. या खेरीज जे मतलब तुमचे मनांत असतील ते सर्व घडोन येतील.........सांप्रत ईश्वरकृपा व आमचे दैवशालित्व व फौजेचा शेरपणा यांनीं इकडील वाईट इच्छिणार नाहींसे जाले. दिवसा–नुदिवस इकडे जय येत चालला. तो असा कीं किल्ला बेदर हा मोठा मजबूत, आज पावेतों त्यास कोणीच सर केला नव्हता व कोणाचे मनांत कल्याण देखील सर करावयाची येत नव्हती, तो एकंदर दक्षण व कर्नाटक दरवाजा, एक दिवसांत हस्तगत जाला. इतरांसी वर्षाची वर्षेंहि वश जाला नाहीं. ईश्वराचें सर्व कृत्य ! इकडील प्रतापशूरांचे शौर्यामुळें तुम्ही ये विषयीचा संतोष मानून, वरचेवर जसे आमचे जय होतील तसें त्या संतोषाचें वर्तमानावर कान ठेवीत जाणें, आणि आमचा लोभ पूर्ण आहे असें मानीत जाणें. छ १८ रजब सन ३१ जुलूस, सन १०६७ हिजरी

---

[ खंड ८ लेखांक ६ ] अलीफ १५७९ फाल्गून शुद्ध २

आपले बरोबरीचे मंडळींत श्रेष्ठ, सर्व उमराव लोकांत श्रेष्ठ, महत्कृपेस पात्र, बादशाही कृपेस योग्य शिवाजी भोसले बादशाही कृपेस आपला सत्कार मनांत आणून समजोत कीः—तुमची अर्जदास्त कृष्णाजी भास्कर पंडित याचे पत्रासुद्धां रघुनाथपंत वकील यांजबरोबर पाठवून

( दिलेली पाहून ) मजकूर ध्यानास आला. यद्यपि तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसराया जोग्या नाहींत, तथापि तुम्ही आपले कृतकृत्यांचा पश्चात्ताप केला आणि हा दरबार उपेक्षेचा नाहीं जाणोन, वडिलांचें लक्ष निभ्रांत इकडे आहे असें समजोन * तुमचे पूर्वकृत्य मनांत आणीत नाहीं. येविषयींचा संतोष मानून इकडलि दौलती विषयीं कोशीस करीत जावी. " आपले वतनी माहाल, किल्ले व कोकण देशसुद्धां, नगरवाले खेरीज, विजापूरकर आदिलखानाचे इलाख्यांत जे आहेत ते त्यांजकडून मुल्क हस्तगत जाल्या नंतर बंदोबस्त होण्याविषयीं वचन असावें म्हणजे सोनोपंत यांस हूजूर पाठवितो आणि इकडील लक्षांत वागून सरकारी मुलुकाची सरहद्द रक्षण करून कामदाराशीं शरीक होतो की ज्यायोगें बंड वगैरे बखेडे न होवोत " म्हणून+ लिहिलें त्यास तुम्ही लिहिल्या अन्वयें वर्तून हा फर्मान पाहतांच आपले मजकुराची अर्जी लेहून सोनोपंताबरोबर पाठवून देणें. म्हणजे त्याप्रमाणें केलें जाईल. जाणोन लक्षांत वागोन आमचे लोभाची पूर्णता समजावी. छ १ माहे जमादिलाखर सन १०६८ हिजरी.

---

# स्वराज्यवृक्षास शाखा फुटूं लागल्या



अफजलखानाची स्वारी १५८१ च्या वैशाखांत सुरू झाली. त्या पूर्वी शिवाजी महाराजांनी बारा मावळे ताब्यांत घेऊन त्यावर एक अधिकारी नेमला होता व ते स्वत: कर्नाटक प्रांतीं स्वारीवर गेले होते. शके

---

* यावरून शहाजी आपणास अनुकूल आहे अशी औरंगजेबाची समजूत दिसते.

\+ अवतरणांतर्गत मजकुर शिवाजी महाराजांनीं औरंगजेबास पाठविलेल्या पत्राचा सारांश आहे.

१५७८ च्या मार्गशीर्षांत महमद अदिलशाहा मरण पावला आणि विजापूर दरबारांत यादवी व स्त्री नायकी झाली. त्या गडबडींत स्वराज्याचा वृक्ष वाढू लागला. महाराज स्वारीवर गेले असले तरी स्वराज्यांतील सरकारी आज्ञापत्रावर ' प्रति शिवाजी राजे ' असा मायना लिहिण्यांत येत असे हें या पत्रांवरून कळून येण्याजोगें आहे.

नकल श्री १५८० आश्वीन शु. १५

मशरुल हजरत कृष्णाजी भास्कर देशाधिकारी व लेखक प्रांत बारा मावळ यांसि. प्रत राजश्री सिवाजी राजे दंडवत. सुा तिसा खमसेन आलफ. मौजे कलबोली ताा पौनमावळ व मौजे रावडे ताा पौडखोरे या हर दो गांवचा सिवेचा कथला[1] लागला आहे म्हणोन पूर्वीं तुम्हांस आज्ञापत्र सादर केलें होतें. त्यावरून तुम्हीं मौजे मााराम जाऊन कथळा मनास आणिला. त्यासि आरजोजी ढमाला हा म्हणो लागला कीं आपले गांवची सीव खरी. आपण दिव्य करून. त्यावरून सर्व देशक मेळवून दिव्याचा तह दिल्हा. इतकियामध्यें दुसरे दिवसीं आरजोजी ढमाला देशमुख ताा पौडखोरें [ गैरहजर ] जाला. सबब नरहरी दिवाकर देशकुलकर्णी ताा पौनमावळ व हावजी पाा मौजे कलबोली ताा माार याणी हुजूर पुरंदरचे मुकामी [ येऊ ] न विदित केलें. त्यावर साहेब करणाटक प्रांतीं मसलतीस गेले. त्या प्रांतीहून आलियावर जो निवाडा करणें तो करितील. तो परियंत मौजे कलबोली ताा पौवनमाळ व मौजे रावडे ताा पौडखोरे या हरदो गांवांमध्यें टाकियाचे कामेची जमीन आहे. ते अमानत आसो देणें. या पत्राची प्रति घेऊन असल नरहरि दिवाकर देशकुलकर्णी ताा पौवनमाळ याचे हवाला करणें. जाणिजे. छ १३ माहे मोहरम. मोर्तब सुद. रुजु सुरनवीस सुरु सुद बार. बार.

[ चतुर्थ संमेलन वृत्त शके १८३८ पृ.७० ]

---

१ तंटा

# भोसल्यांचें क्षत्रियत्व



येथें दिलेलें पत्र शहाजीनें अल्ली अदिलशाहाला ( शके १५७८ मध्यें अहमद अदिलशाहा वारल्यानंतर ) लिहिलें आहे. ह्यांत शहाजीनें आपला निर्देश **महाराज शहाजी राजे** अशा मायन्यानें केला आहे. राजा हा किताब इतर कित्येक कुलीन मराठ्यांच्या घराण्यांतल्या प्रमाणें भोसल्यांच्या घराण्यांत हि पिढीजाद आहे. प्रस्तुत पत्रांत शहाजीनें अल्ली आदिल-शाहास अशी धमकी घातली आहे कीं अमुक जहागीर तावडतोब द्यावी; नाहींतर आपण पादशाही खिदमत सोडून देऊं. ही धमकी देतांना शहाजी सहज उद्गार काढतो कीं, दोन चार पातशाहींत आपण नोकरी केली पण कोठें हि आपली इज्जत कमी करून घेतली नाहीं. हे इज्जतीचे शब्द काढतांना दुजोरा म्हणून **आपण रजपुत लोक** आहों हें उच्चवंश दर्शक वाक्य शहाजीनें पातशाहाच्या नजरेस आणिलें आहे.

---

खानें[1] अलीशान फैरोजी निशान

अजम अकरम ममलकतमदार दवामयकबालहु व इजललाहु

॥ ऽ ॥ अमारत व अयालत पन्हाह शुजाअत व शाहामत दस्तगाह अजमत व शौकत इतिहाद एकबाल व इजलाल हमराह अलीशान रफी अल कदर खुलदमकान उमदेह वजरायेजमा कुद व उमराय नमरत निशान

अजी बंदिलमाहिद माहाराज शाहाजी राजे सलाम बादज सलाम महबत आंजम महवतमुराय आंकी. पा। कनकगीर पेश अजी दरगाह[2] वंदगसि पेश[3] केली त्याचा मुबादला आपल्यास मन्हमत जाला. या वरी पा। आनागोंदी हि पेश केली. ( पाचा ) महिना जाला. हनोज[4] मुबादलियाचा सरंजाम जाला नाहीं. जमेयतीचा हि दिलासा जाला पाहिजे. कुंदगोलकार

---

१ येथून पांच सहा ओळी मजकूर मायन्या दाखल आहे. २ बादशाही सेवेस. ३ अर्पण केला. ४ तथापि

मनेवारे आपले जागी व तामगौड तर्फेस तसवीस देउनु फसाद केली आहे. त्यास गोशमाल द्यावयाबद्दल हजरत जान्हपन्हा साहेबी आपल्यास रजा दिल्ही. ते तर्फेस मैसूरकराची हि सरहद नजदीक आहे. बगैर मंगीनात मुर्राई * दफे होऊनु पातशाही नामोश राहत नाही. आजी वास्ते हजार दीड हजार जाजती कामाचे लोक टेविले आहेती. बगैर जागीर लोकांची समजावीस होत नाहीं. तरी दर बंदगीस अर्ज करुनु अनेगोंदीच्या मुबादलियाचा सरंजाम केला पाहिजे. यास ऐवज ए. तर्फेस कर्यात अकोलोज व तपे टभुरणी व भतग्राम अगर पेडणे हे कदीम मुलकात देणे. मदरहु देणं नसेल तरी व मामले पादशाहबादेखाले जागा नसेल तरी पा। वडेरु या मामले मजकुराखाले चंजाऊरकरास दिधले आहे ते तऱ्ही मुबादलियास दिधले पाहिजे. आपण हरामखोर मनेवार चंजाऊरकरास गोशमाल देउनु सोडउनु घेउनु. हरामखोर मनेवारास दिधल्यात काय फायदा ? कुल मनेवाराचे हेजीब मीर जुमला बराबरी गेले आहेती व पा। मुसलकल आपली जागीर पेशजी भिस्त रोजी रुस्तुमजमा बराबरी माहोलीहून हुजूर आलों ते वख्तीं चौ लाखाची जागीर दिधली. त्यामध्यें मुसलकलचा फर्मान आपले नांवें दिधला. या वरी दुसरे वख्तीं मरहुमी खाने अजम असदखानाचे गुजारतीने लक्ष्मेश्वराचे वख्ती मोकरर आली ते हि वख्तीं व तिसारियाने हि मरहुमी खा। अहमदखान याचे वख्ती मोकरर फर्मान दिधले ते हि वख्ती मुसलकलचा फर्मान आपले च नावें आहे. ऐसे तीन वख्त आपले नावे फर्मान पा। मा। चे आपले नावें आहेती. या फर्मानाच्या नकला पादशाही दफतरी असतील त्या काहाडून पाहिल्या पाहिजेत. आपले भाई व फर्जंद याचे दिलासिया बा। क + + + + विले व फर्मान त्याचे नांव करूनु दिधले. तरी ते




---

५ बंडखोर ६ शिक्षा, कानउघडणी. ७ आज्ञा ८ बंडखोर * हकाल पट्टी ९ कीर्ती

काय मसमुबाली हरकसीने गलथ. हुजूर मा + + करणारी करुनु मुमल-कलचा मुबादला पंधरा खेडी कर्याती कारवे आपली जागीर त्रिंबकजीस द्यावया काय निसबत धरिते. हजरत साहेबाचा तरी कौल करारदाद आपल्याम आहे कीं तुमचे जागीर पैकी एक चावर कमीदगी करणें नाहीं. जरूर एक वख्त पादशाही कामा बा कांही कसीदगी केले तरी अवलसवाइन मुबादला देउनु बाजद कमीद करावे. आमीं अकार्तुकाचे बोले करुनु आपले जागिरींत नाहक गैराहिसाबी पादशाह खलेल करावितातीं. तरी आपण रजपूत लोक अजी तलग पेशजी हि दोघा चौ पादशाहीत खिदमत केली. आंमा गैराहिसाबी जाजती सोसुनु कम इजतीन व गैरमेहेरबानीन पेशजी हि खिदमत केली नाही व पुढे हि न करू. उमेदीने आपण आजी दीड वर्ष जाजती सोसिली ते या च दमा कीं थोरले हजरत साहेबाचे नवाजीस व हजरत साहेबी हि जहांबक्षी केली आहे व वख्त हि एकजवाचा समजोनु आपण सबूरी करुनु तहमुले[12] करावयास तकसीर[13] केली नाही. पेस्तर हजरत साहेबास आपली दरकार असेल तरी हिसाबी आपला सरंजाम सदरहु केला पाहिजे आणि दरकार नमेल तरी खुसनुदीन[14] रजा दिधली पाहिजे. आपल्यास असलाद पुन्याई मामल्याची हि हवस काही राहिली नाही. एखादे आपले हिंदूचे तीर्थी बसौनु हक[15] तालाची बंदगी[16] करुनु हजरत साहेबास द्वा देउनु, फर्जद भाई आहेती यां पासुनु खिदमत घेतली पाहिजे. अगर त्या हि पासुनु खिदमत घेणे नसेल तरी त्यास हि रजा द्यावी. बाजे भाइबंद जेथे आपली पोटे भरितातीं तेथे हे हि भरितील. अमा नाहक आपल्यास बदनाम केलें न पाहिजे. दरी बाब हजरत बंदगीस हाली अर्ज-दास्त पाठविली आहे. तरी बडे भाईने हि हजरत बंदगीस अर्ज करुनु सदरहु प्रमाणें अनागोदीच्या मुबादलियाचा सरजाम व पंधरा खेडियाचा फर्मान आपल्याच नावे देविला पाहिजे अगर आपल्याम खुषनुदीन रजा दिधली पाहिजे. व पा कनकगीर व अनागोदी हि दरगाह बंदगीस पेश

---

१० परंतु ११ मेहेरबानीतले १२ सहन १३ कमी १४ संतोषानें १५ परमे-श्वराची १६ सेवा.

केली. एक कपली खेडे दिढा दो हजाराचे तेथे आपण राहिलों होतो. तेव्हडे आपल्यास असो दिधले पाहिजे. तेथे बाग आपण केले. हवासीर जागा आहे. तरी दरगाहबंदगीम अर्ज करुनु मोकरर करनु देणे म्हणौनु मसुरलदौलत सावंतराउ यांस लिहिले होते. सावंतराउ माइलेनें अर्ज केला. अमा हजरत साहेबी हुकूम फर्माविला कीं अनेगोदीच्या मेहतानास कपली पाहिजे; सोडून देणे, म्हणौनु राऊ माइलेने लिहिले. यावरी आपल्यास राहावयास जागा हि नव्हती; व तामगौड तर्फेहून हि ताजी खबर आली की कुंदगोलकरास आपले लोकांनी शिकस्त दिधली होती. अमा तो मागती सवारौनु कोटास एउनु दिलगोव्याची फिकीर करितो. मदत नव्हता जागा राहणार नाही. अजी वास्ता हुजरत साहेबी हि पेशजी च रजा दिधली होती. म्हणौनु छ ४ माहे सौवाली कपली साहेबाचे लोकाचे व कनकवेलीकराचे लोकाचे हवाले करुनु आपण स्वार जालों. एक मजली आलियाबरी आनेगोदीकार व हलालखोर हे दूर गलथ मालूम करणाराचे बले करुनु आले आहेती. ते हि पादशाही लोकावरी हिसा करुनु कपली त्याजपासुनु घेतली हे खबर आपण कपलीस आलियावरी पाहरा रात्री आपल्यास आली होती. ते पेशजी च लिहिली आहे. पेशजी सिदी अजम सिदी संबूल आलियावरी आनागोदीस व कपलीस व बाजे विलायतीस दखल होऊ देतील की ने दितील हे दि पेस्तर रोशन होईल. सेंभरा वर्षांचे मुठमर्द त्यास गोशमाल देउनु मुठमर्द हरामखोरास जेही देविले असतील त्यास याचा जबाब पुसिला पाहिजे. साहेब अजी सबा जमजम स्वार होउनु येतील म्हणौनु सबूरी करुनु दीढ महिना राह साहेबाचे यावयाची पाहिली. आमा साहेबाचे यावयास मातल जाले. मग आपण पादशहाचे रजेवरुनु स्वार होउनु बन्दारी नजदीक आलो पुढे हि मजली दरमजली तामगौड-तर्फेस जात आहो इत्यादि.

---

१ या पत्रांत आलेला ‘ रजपूत ’ शब्द मराठा या अर्थी आहे असें ठाण्याचे संशोधक रा. वि ल. भावे यांचें मत आहे.



औरंगजेब व दारा शिकोचें शिर [पृ. ३८ अ.

# अफजलखानाची भेट व त्याचा मृत्यु



१

अफजलखान व शिवाजी महाराज यांच्या भेटीचें वर्णन शिवदिग्विजय-कारानें ( पृ. १६८ ) असें दिलें आहे:—

खान पालखीतून उतरोन आपले लोकांत उभे राहिले. परस्पर लोकांच्या भेटी दहापांचांच्या कार्याकारण अगत्या अगत्य कराविल्या. कृष्णाजीपंत खानाकडून नांवें सांगण्यास महाराजाकडे आले होते. महाराजा-कडून पंताजीपंत व विठ्ठलपंत मरढेकर उभयता खानाकडे होते. लोकांची भेट होतांच खानाची व महाराजांची भेट व्हावी, ते समयीं खानांनीं पंताजीस विचारिलें कीं " राजे हेच काय ? " पंताजीनीं " होय " म्हटलें. राजांनीं कृष्णाजीपंतांस विचारिलें. त्याणीं हि " खान हेच " म्हणोन सांगितलें. शब्द ऐकतांच महाराजांची सुरत उंच सडपातळ होती; त्यास भेटीस घातला त्या हातें खानांनीं मल्लयुद्धाचा पेंच धरून, बगलेंत दाबून, कट्यार चालविली. महाराज पराक्रमी, धैर्यवंत; अंगांत बख्तर होतें. त्यांत अंग चोरून कट्यार लागू पडूं दिली नाहीं. हत्यार कारेगार न जालें. हें कळोन दुसरा पेच लावावा, तों महाराजांनीं चपळता करून डावा हात पाठीकडून घालून डावे कुशीवरी नखाचा हात मारिला. त्या योगें पोटला बाहेर तत्काल निघाला. तो खानांनीं दडपून धरून दुसरा हात चालाविला. त्याचे पूर्वीच उजवे हातांतील पट्याचे हातानें, वार पायांचे लवणीस लावितांच महाराज त्याचे हातांतून सुटले व खानानीं हि ढकलले. तेणेंकरून खानाचा वार निर्फळ जाला. ' शिवाजीनें मारा ' ऐसा शब्द खानांनीं गर्जून, मोठ्या घोषें केला. नंतर कोथळा सावरून, समसेर काढून, महाराजांचे डोईवर वार चालविला. तो जिरें डोईस व पागोटें थोर होतें; त्यामुळें तोहि हात कारेगार जाला नाहीं. गव्हाइतकी माथा जखम लागली. महाराजांनीं पट्याचा हात चालविला तो उजवे

बाहुस्यावरून उरापर्यंत शरीराचे दोन भाग केले. त्या वारानें खान तत्काळ भूमि धरून गतप्राण जाले.

---

२

अफजलखानाच्या वधाची हकीगत जेधे-शकावलींत दिली आहे तीं अशी:--

[ शके १५८१ च्या ] वैशाख मासीं अदलशाहा पादशाहा यांचे फरमान मावळच्या देशमुखास आले कीं ' अफजलखानास सामील होणें'. त्यास केदारजी खोपडे अफजलखानाजवळ होते. खंडोजी बिन धर्मोजी खोपडे देशमुख ताा उत्रोली हे अफजलखानाकडे गेले. कान्होजी नाईक जेधे यास मावळच्या देशमुखाबराबरी फरमान आला होता. तो घेऊन व आपले पांच जण पुत्र घेऊन राजश्री स्वामीच्या दर्शनास राजगडास गेले. राजश्री स्वामीस परवाना दाखविला. तेव्हां राजश्री स्वामी बोलिले कीं " तुमचे मेजारी केदारजी व खंडोजी खोपडे देशमुख ताा उत्रोली हे अफजलखानाकडे गेले. तुम्ही पादशाही हुकूम मोडून राहिले म्हणजे वतनास अपाय होईल. जिवावरी गोष्ट येऊन संकट पडेल. याकारितां तुम्हीहि जाणें. " त्यावरी कान्होजी नाईक बोलिले कीं ' महाराजांनीं आपली क्रिया घेऊन तुमचे हातीं दिल्हे तेच क्रिया व इमान आपला शाबूत आहे. वतन साहेबाच्या पायावरी ठेविले. आपण व आपले मा [ मुलगे ] साहेबापुढे ग्यस्त होऊं. तेव्हां जें होणें तें होईल. ' कान्होजीनें ऐसें बोलोन शफत केली. त्यावरी राजश्री स्वामी बोलिले कीं ' हातावरी पाणी घेउन वतनास घालणें. ' आज्ञप्रमाणें वतनास हातावरी पाणी घेऊन सोडिलें. तेव्हां बोलिले कीं ' आपला कबिला कारीस आहे तो तळेगावाकडे घेऊन जाणें. ते समई दादाजी कृष्ण यांस कल्याणचा हवाला होता त्यास बोलाऊन आणून त्यांचे वडील पुत्र रखमाजी

दादाजी आपणाजवळ ठेऊन कान्होजी नाईकांनीं आपला कबिला व दादाजी पंताचा कबिला राजश्री स्वामींचे आज्ञेप्रमाणें तळेगांवास ढमढेरीयांच्या गांवीं ठेविला. राजश्री स्वामींची व कान्होजी नाईक यांची क्रिया बेल-रोटीवरी हात ठेऊन जाली. त्याउपरि बांदलांचा जमाव व हैबतराव सिलिं-बकर व पासलकर व ढमाले व मरळ, डोघार बोलाऊन आणून अंतस्थ यांच्या विद्यमाने क्रिया घेऊन हाशमाचा जमाव खरा केला.

राजश्री पंताजी गोपिनाथ यांस अफजलखानाकडे हेजिबीस पाठविलें आणि प्रतापगडाखालीं भेटी द्यावी ऐसी बोली केली.

कार्तिकमासी अफजलखानानें प्रतापगडास कृष्णराव हेजीब राजश्री स्वामीकडे पाठविला. त्यांस वस्त्रें देऊन प्रतापगडाखालीं भेटी व्हावी हा निश्चय करून मागते पाठविले. तेव्हां अंतस्थे विचार कान्होजी जेधे व सर-कारकून बैसोन राजश्री स्वामींनीं विचार केला कीं, 'मुसलमान बेमान आहे. बांदलाचा जमाव जाउलीस व दराच्या रानांत रहाणें. कदाचित् भेटीचे समयीं त्यानें बेइमानी केली तरी त्याचें लष्कर *पारांत आहे तें डोंगरास चढू न देणें. आणि निवडक माणूस घेऊन आपली मदत करणें. कदाचित श्रीअंबेच्या वरदें अफजलखान मृत्यु पावला तरी इशारतीचे आवाज गडा-वरी होतील. तेव्हां पारावरी चालून घेऊन अगदीं लष्कर बुडविणें. हैबत-राऊ व बाळाजी नाईक सिलीमकर जमावानिसी बोचेघोळीचेऽ घाटीं ठेविले आहेत. ते लष्करास घाट चढूं देणार नाहींत' ऐसा अंतस्थे विचार जाला आणि बंदोबस्ती केली.

मार्गशीर्षमासीं शुद्धपक्षीं सप्तमीस गुरुवारीं प्रतापगडाचे माचीस अफजल-खान बराबर पालखी व हेजीब घेऊन हुदकरासमवेत भेटीस आले. राजश्री स्वामी किल्ल्यावरून उतरून भेटीसि आले. भेटीचे समई येकांगी करून अफजल-

---

* प्रतापगडच्या पायथ्यास पार नांवाचे खेडें आहे.

ऽ हा घाट चढणें फार त्रासदायक असून तो चढतांना ठिकठिकाणीं बसून सरपटत जावें लागतें.

खान जिवे मारला. सीर कापिले. जिवा माहाला व लोक कान्होजी नाईक यांचे पुत्र बाजी सरजाराऊ यांणीं युद्धाची शर्त केली. इशारती आवाज प्रतापगडावरी जाला. तेव्हां कान्होजी नाईक जेधे जमावानिशी व बांदल देखील यांणीं पारावरी चालोन घेऊन ‡ लष्करांत मारामारी केली. लष्कर अगदीं बुडविलें. कांहीं पळोन गेले. तेव्हां खंडोजी खोपडा पाडाव जाला. त्यास राजश्री स्वामींनीं शास्त केली. कान्होजी नाईक जेधे व लोक निष्ठा धरून राहिले त्यांची नवाजीस केली ........पवाडा केला त्यामध्यें आहे कीं "हनुमंत अंगद रघुनाथाला जेधे बांदल सिवाजीला."

---

# मोगलांची स्वराज्यावर धाड



पाइस्तेखानानें चाकणचा किल्ला हस्तगत करून पुण्यास मुक्काम केला; तेव्हांपासून मोगली सैन्यानें शिवाजी महाराजांच्या ताब्यांतील मुलखांत वारंवार हल्ले करून तेथील लोकांची दुर्दशा करून सोडली. याप्रसंगीं ठिकठिकाणच्या लोकांनीं बायकापोरांना सुरक्षित स्थळीं घाटाखालीं पोहोचवून आपण सावधगिरीनें रहावें, व असें न केल्यास ज्या लोकांना मोगलाच्या कैदेंत जाण्याचा प्रसंग येईल त्यांच्या यातनांचें पाप चुकार अधिकाऱ्यांच्या शिरावर येईल असें या पत्रांत समजाऊन सांगितलें आहे.

[ खंड १५ ले २७६ ]  [ १५८४ कार्तिक वद्य ७ ]

मा॥ अनाम सर्जाराऊ जेधे देशमुख ता॥ रोहिडखोरे. राजश्री सिवाजी राजे सु॥ सलास सितैन व अलफ. मोगल प्रस्तुत तुमच्या तपियांत धावणीस येताती; म्हणौन जासुदांनीं समाचार आणिला आहे. तरी तुम्हांस रोखा अहडता च तुम्ही तमाम तपियांत गावाचा गाव ताकीद करून माणसें, लेकरें

---

‡ हल्ला करून

बाळें, समत तमाम रयेती लोकांस घाटाखाले बांका जागा असेल तेथें पाठविणें. जेथें गनीमाचा आजार पहुचेना ऐशा जागियासी त्यासी पाठवणें. ये कामास है गै न करणें. रोखा अहडताच सदरहु लिहिणें प्रमाणें अमल करणें. ऐसियासि तुम्हांपासून अंतर पडिलियावरी मोंगल जे बांद धरून नेतील त्यांचें पाप तुमचा माथा बैसेल. ऐसे समजोन गांवाचा गांव हिंडोनु रात्रीचा दिवस करून लोकांची माणसें घाटाखाले जागा असेल तेथें पाठवणें. या कामास एक घडीचा दिरंग न करणें. तुम्ही आपली जागा हुशार असणें. गांवगना हि सडेकडील सेतपोत जतन करावया जे असतील त्यास हि तुम्ही सांगणें कीं डोंगरवर आसिरा कुबल जागा आसरे ऐम त्यासि सांगणें व गनीम दुरून नजरेस पडतां च त्याचे धावणीची वाट चुकवून पलोन जाणें, तुम्ही आपले जागा हुशार असणें. मोर्तब सुद

तेरीख २० माहे रबिलोवल रुजु सुरनिवीस

रबिलावल सुरु सुद

---

# आपल्या मायभूमीचे संरक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे



शाइस्तेखानाचा पराभव केल्यानंतर नीलप्रभूच्या हस्तें शिवाजी महाराजांनीं दक्षिणेंतील मोंगल अधिकाऱ्यास लिहिलेले पत्र मॉडर्न रिव्ह्यूत प्रो. जदुनाथ सरकार यानीं इंग्रजींत भाषांतररूपानें छापलें आहे. त्याचा सारांश असा आहे:—

आज तीन वर्षे बादशहाचे मोठमोठे सल्लागार व योद्धे आमचा प्रदेश काबीज करण्यासाठीं चालून येत आहेत, हे तुम्हां सर्वांस माहीत आहेच. बादशहा हुकूम फर्मावितात ‘ शिवाजीचे किल्ले व मूलूख काबीज करा. ’

तुम्ही जबाब पाठविता ' आम्ही लौकरच काबीज करितों. ' आमच्या ह्या कठिण प्रदेशांत नुमता कल्पनेचा घोडा सुद्धां नाचाविणें कठिण आहे. मग तो प्रदेश काबीज करण्याची गोष्ट कशाला ! भलत्याच खोट्या बातम्या बादशाहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हांस लाज कशी वाटत नाहीं ! कल्याणी बेदरचे किल्ले उघड्या मैदानांत होते ते तुम्हीं काबीज केले. आमचा प्रदेश अवघड व डोंगराळ आहे. नदीनाले उतरून जाण्यास वाट नाहीं. अत्यंत मजबूत असे साठ किल्ले आज माझे तयार आहेत. पैकीं कांहीं समुद्रकिनाऱ्यावर आहेत. बिचारा अफजलखान जावळीवर फौज घेऊन आला आणि नाहक मृत्युमुखीं पडला. हा सर्व प्रकार आपल्या बादशहास कां कळवीत नाहीं. ( अमीरूल उमराव शाइस्तेखान आमच्या या गगनचुंबित डोंगरांत व पाताळास पोचणाऱ्या खोऱ्यांत तीन वर्षे मारखा खपत होता. ' शिवाजीचा पाडाव करून लौकरच त्याचा प्रदेश काबीज करितो ' असें बादशहाकडे लिहून लिहून थकला. ह्या खोडसाळ वर्तनाचा परिणाम त्याला भोवला. तो परिणाम सूर्यास्तासारखा स्वच्छ सर्वांच्या समोर आहे. आपल्या भूमीचें संरक्षण करणें माझें कर्तव्य आहे. आणि तुम्ही कितीहि बादशहाकडे खोट्या बातम्या लिहून पाठविल्या तरी मी आपले कर्तव्य बजावण्यास कधीं चुकणार नाहीं.

---

# तळकोंकणाची कबजादत व वतन-दारांची व्यवस्था



वतनदार मंडळीवर महाराजांचा बराच कटाक्ष असे. परंतु कित्येक वेळा यांना अनुकूल करून घेण्यापासून बराच फायदा होण्याचा संभव दिसला तेथें त्यांची वतनें कायम ठेवण्याची पद्धति महाराजांनीं अंगिकारिली होती

हें तळकोकणांतील प्रांताची व्यवस्था लावतांना जें धोरण स्वीकारण्यांत आलें त्यावरून व्यक्त होतें. या खेरीज शृंगारपूरचे सुर्वे यांचा बंदोबस्त कोणत्या साली झाला याचा निर्णय या पत्रावरून होण्याजोगा आहे.

खंड २१ पृ, ४ लेखांक ३ श्री १५८४ वैशाख शु. १४

मसुरल हजरत राजश्री पिलाजी नीलकंठराव सुभेदार नामजाद मामले प्रभावली यामी. सिवाजी राजे दंडवत सुहूरसन इसने सितैन अलफ.माल गुदस्त तळकोकण मुलकाची कबजादत बदल खामा स्वारी तलकोकणांत होऊनु मुल्क कबज जाहला ते वक्तीं शृंगारपूरकर सुर्वे व कोकणांतील पातशाई अमलदार यार्णी बेमानी कली ते नतीजा पोहचोन उधलोन गेले. मुलकांतील रयतीस सरंजामबद्दल वतनदार व रयत यांस सरकारांतून कौल सादर जाहालेवर केसो नायक बिन राघो नाईक मावलंगकर व सारे वतनदार मामले मजकूर सरकारी खिजमतीस हजीर जाहाले. साल मजकुरीं रंगोनाईक बिन केसो नाइक मावलंगकर सरदेसाई मामले मा। यार्णी किले राजगडच्या मुकामीं हुजूर येऊन अर्ज केला जे आपले सरदेशमुखीचें वतन मामले मा। व मामले दाभोले पिडी दर पिडी मातकदम इस्तकबिल पासून ता। सालगुदस्त पावेतों चालत आलें. हालीं तलकोकण साहेबांस अर्जानी जाले वर साहेबीं सेवकावर मेहरवान होऊन कौल सादर केले यावर आ + + वतनाचे बाबे खिजमतीस हाजीर जाहालों. हालीं दिवाणांतून सारी वतनें अमानत जाली. आपले कबिजा हक व लवाजिमा व इनामती अमानत जाल्या. आपण तों साहेबाचे खिजमतीस एकसान असो. साहेबीं मेहरबान होऊन सेवकाची वतनावर स्थापना केलिया व कुटुंबास अन देऊन उस्तवारी केलिया उमेद धरून एकसान चाकरी करू; व ये बाबे तुझी इलतिमास लिहिली. बा। इलतिमास खातरेस आणून व रयत मामुरीवर नदर देऊन बेकदीम वतनदार याबद्दल नायक मा। यास दोनी मामले मा। सरदेशमुखी वंशपरंपरेनें करार करून नाईक मा। यांस मामले प्रभावलीचे जमाबंदीवर पटीपछोडी हक लारी २००० दोन हजार रयतानिसबत करार केली असे.

तरी तुम्ही मा मा जमाबंदीवर रयत निसबत सदरहु लारी २००० दोन हजारची सीस्त बसऊन दरसाल नाईक मा देवीत जाणें. दरसाल ताजा सनदचा उजूर न धरणें. मामले दाभोलची पटी पिछाडी हक याची सिस्त होणें. त्यास मामले माचे अमलदार व वतनदार हुजूर आणविले आहेत ते आलेयावर होईल. या पत्राची नकल घेऊन असल नाईक माजवळ परतून देणें. जाणिजे मोर्तब सूद.

तेरीक १२ माहे रमजान सुरु सूद

---

# मोकासेदाराचें नातें संपलें



[ खंड ८, ले ११ ] [ १५८२ मार्गशीर्ष वद्य ११ ]

सरंजामी. छ २४ रबिलाखर, सन इहिदे सितैन अलफ. पुणें व इंदापूर व चाकण, सुपें, बारामती ऐसें इनाम हिंदु व मुसलमान यांसी इनामें आहेत. त्यास पेशजी आपणास मुकासा* असतां अफजलखाना आर्धी जेणें-प्रमाणें तसलमती ज्यास जें पावत असेल त्यास तेणेंप्रमाणें देणें, ऐसा तह † केला असे. मोर्तब सुद. मर्यादेयं विराजते.

---

* महाराजांना पुणें, इंदापूर वगैरे परगण्याचे मोकासे होते व अफजलखा-नाच्या वधानंतर मोकासेपणाचें नातें विजापूरकराशीं राहिलें नसले तरी इनाम-दारांना ज्या रकमा पूर्वी पावत होत्या त्या चालू राहतील असें या जाहीरना-म्याच्या द्वारें कळविण्यांत आलें आहे. षाइस्तेखान पुणें प्रांतांत दाखल झाल्या-वेळीं हा निर्णय महाराजांनीं केला आहे. † निर्णय, ठराव.

# बाजी घोरपडे व शहाजी



शके १५७० सालीं मुस्तफाखानानें शहाजीस कैद केलें त्या वेळीं बाजी घोरपड्यानें मुस्तफास मनोभावानें मदत केली होती. यामुळे घोरपडे व भोसले घराण्यांत तेव्हांपासून वांकडें आलें; व ते एकमेकांच्या नाशासाटीं झटत असत. पुढें विजापूराहून खवासखान रवाना झाला व त्यास बाजी घोरपडे व वाडीचे सांवत हे मदत करणार ही बातमी शहाजीस कळतांच त्यानें ती आपल्या पराक्रमी मुलास कळविली. आणि घोरपड्यांचें शासन करावें असें सुचविलें. त्याप्रमाणें शिवाजी महाराजांनीं बाजीस धुळीस मिळवून वडिलांची इच्छा पूर्ण केली असें या पत्रावरून दिसतें. तथापि पत्रांतील भाषा कांहीं ठिकाणीं अर्वाचीन भासते व सांवताचा वं पोर्तुगीजांचा पराभव झाला तेव्हां शहाजी हयात नव्हता. यामुळें या पत्राच्या खरेपणाची शंका येते. कदाचित हें पत्र शिवाजीनें जिजाबाईस लिहिलें असल्यास बऱ्याच गोष्टींची संगति लागते.

( सावंतवाडी संस्थानचा इतिहास पृ. ७ )

श्री

वडिलांचे शेवेसी शिवाजी राजे याणीं चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना ऐसीजे. ' बाजी घोरपडे मुधोळकर याणीं स्वधर्म साधणता सोडून यवन दुष्ट तुरुक ह्याचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुनरे करून विज्यापुरास येणें घडलें तेथें गुजरला प्रकार निर्वाणचा तो तुम्हीं समजलां च आहां. तो हि प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धीस नेणें व स्वधर्म राज्यवृद्धि करणें म्हणोन पार पडलां. सांप्रत पुन्हा दुर्बुद्धि धरून खवासखान विजापुराहून फौजसुद्धा रवाना जाहले. त्याचीं हरोळी बाजी याणीं व लखम सावंत व खेम सावंत ५ाणीं प्रतिज्ञापूर्वक जत करून सेना समवेत निघाले, ते तिकडे

---

१ येथपासून ' सुपुत्र निर्माण आहां ' पर्यंत शहाजीच्या पत्रांतलि सारांश.

येत आहेत. तुम्हांस श्रीसांब व अंबा यश देणार पूर्ण आहे. येसमयीं त्यांचे वेढे घ्यावे आण आमचे मनोदय सेवटास नेणार तुह्मी सुपुत्र निर्माण आहां' म्हणोन आज्ञा केली. त्यास बाजी घोरपडे पुढे मुधोळास घरीं कांहीं जमेतनसीं आले हें कळतांच फौजेनसी आह्मी तेंचक्षणीं स्वारी केली. त्यांचा प्रांत लुटून तळपट जान करून ठाणियास जेरदस्तींत आणिलें. हें जाणोन त्यांणीं सर्व जमेतनसीं लढाईस निघाले. युद्ध तारफेचें जाहाले. बाजी मारिले व कितक खास लोक पडले. या प्रकारे तो प्रसंग करून लुटून फस्त केले. मत्ता बहुत लागली. पुन्हा आपलेस करून मुधोळ पंचमहाल आपला करून स्थापिले. यानंतर खवासखान पुढे आला पाहून त्याजवर चाल केली. ते मारीत लुटींत गर्दी केली. खटा होऊन पळू लागले, ते विजापुरास पावविले. यानंतर सावंताचा निशाच करावा म्हणोन त्या प्रांतांत शिरलों तेहि येऊन पावले. मुलूख तळपट करीत चालिलों. ठाणीं व किल्ले तमाम घेतले. सावंत दमान गेले. गोमंतकराचा आश्रय निघोन फोंड्याचा किल्ला भाडूं लागला. त्यास सुरंग लावून बुरूज उडवून बळयानें घेतला. याप्रमाणें एकंदर तें सवस्थान घेतलें. यानंतर फिरंगी याजवर शह देऊन त्याचा प्रांत मारीत चाललों. त्याणीं तह करून तोफा नजराणा पाठविला. सावंत यास तेथें दम न निघे. टोपीकर यास धीर न पडे. त्यांजवरून पितांबर शेणवी कारभारी वकील पाठविले. " आपण सावंत भोसले कुळींचे आपले पुत्र आहों. सर्फराज करून देसगतीच्या वतनाची सेवा घेऊन, प्रांताचा ठराव निमे ऐवज व निमे ऐवज सरकारांत वसूल घ्यावा " ऐसें करून घेतलें. त्याप्रमाणे स्वामींचे पुण्यप्रतापे करून आज्ञेप्रमाणे घडोन आलें. तें कळावें म्हणोन लि।। हे विज्ञापना मोर्तब

———o———



# संरक्षण व संपादन यांचें महत्व एकसारखें



[ खं. ८ ले. १० ] श्रीवरदमूर्तिर्जयति [ १५९२ भाद्रपद

सरंजामी छ रबिलाखर सुा इहिदे सबैन * अलफ राजश्री निळोपंत मजमूदार यास वतनीचा कारभार करावयास ठेविलें. माहोली-पासून भिवंडीपावेतो व इंदापूर, पुणें, चाकण कदीम वतनीचा कारभार करावा. यासी पंडित माइलेनें साहेबासी अर्ज केला कीं " आजी कामाचे दिवस आहेत. वतनीचा कारभार आणिक कोण्हास सांगावा. आपण बराबरी येऊनं दाहा लोक कामें करितील तैसी करून देऊनं. गड घेणें पडिलें तरी घेऊन देऊनं " ऐसा अर्ज केला. त्यास साहेबीं उत्तर दिधलें कीं " वतनीं राहाणें हें हि काम थोर आहे. वतनीं राहणें. येथें तुम्हांस बकशीस इमारतीस पैके पावतील त्यास दरसदे २ दोनीप्रमाणें पावतील " ऐसे साहेब बोलिलियावरी पंडित माइले बोलिले कीं " जरी वतनीचें हि काम थोर आहे तरी बहुत बरें. एकानें सिद्ध संरक्षण करावें. एकानें साध्य करावें. दोन्ही कामें साहेब बराबरीनें मानिताती तरी आपण वतनीं राहेन. परंतु इमारतीचे पैके पाववून बकशीस घेणार नाहीं. मोरोपंत त्रिंबक व शिवनेर येथे पाठविले आहेत ते गड घेतील व मुलूख घेतील, कामें करितील. साहेब थोर कामास जातातीं. तें काम श्रीचे कृपेनें होऊन येईल. त्यास राजश्री मोरोपंतांस मेहेरबानीनें पंचवीस फुलें दिधलीं तरी आम्हांस हि वीस फुलें द्यावी. ऐसा साहेबीं निश्चय केला पाहिजे. " त्यावरी साहेबीं ऐसाच तह दिधला.

---

* येथें खंड ८ मध्ये सितैन असें छापलें गेलें आहे. परंतु सितैन ऐवजीं सबैन पाहिजे, असें आंतील मजकुरावरून ठरतें. १ येऊं २ देऊं ३ हें राज-नीतिविषयक मत शिवाजी महाराजांच्या तोंडचें आहे; व या वाक्याची निळो-पंतानें केलेली फोड चांगली मार्मिकपणाची आहे. नवीन संपादणें व जुनें राखणें या दोहींची महती महाराज एकसारखी मानीत. ४ शिवाजी महाराज ५ निर्णय

# चाकरी करणार नाहीं मदत देऊं



शहाजीच्या हयातींत शिवाजी महाराजानीं विजापूरकराशीं बरोबरीच्या नात्यानें तह केला होता व त्यांत ‘ आम्ही चाकरी करणार नाहीं, वक्त-शीर मदत देऊं ’ असें ठरलें होतें. रघुनाथ पंडितास तंजावरच्या स्वारींत लिहिलेल्या पत्रांत महाराजांनींच व्यंकोजीशीं ठरविलेल्या कलमबंदींत या गोष्टीचा उल्लेख केला आहे. ( शिवदिग्विजय पृ. ३३० ) तो असा:—

१ विजापुराकडून सनदी अम्मल आहे. कांहीं दौलताबादेकडून इकडे येतां त्यांचा अंमल तहांत घेतला. त्याखेरीज जरबेनीं कित्येक पाळेगार बसांत आणून, खास अंमल केला. त्यांत इजमायली जमेत कमकसर आहे. तशी विजापूरकराकडे पांच हजार फौजेनिशीं चाकरी करावी लागते. त्यास पांच हजार फौजिनीं चाकरीचें कलम. आमचा त्यांचा तह झाला त्यांत आम्हीं चाकरी करणार नाहीं, वख्तशीर मदत देऊं, इमानें इतबारें मेहनत करूं असें तीर्थरूप असतां ठरलें आहे. त्यास चाकरी तुम्हांकडे नाहीं. सबब चाकरी बद्दल वख्तशीर काम लागेल त्यासमयीं तुम्ही फौज देत जावी. न दिल्यास त्याचा जाब तुम्हांस विचारूं. खर्च पडेल त्याचा पैसा घेऊं.

१ वरघाटीं, हिंगणी बेरडी, देऊळगांव वगैरे पाटिलक्या व देशमुख्या व नाडगौड्या वगैरे वडिलार्जित वतनें आहेत. त्याविशीं तुम्हीं बोलूं नये. आम्हीं वाहिवाटूं.

---

# दाहाचा मागणी पण मिळाला एक



* आपले बरोबरीचे राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, काबील कुल महत्कृपेचें पात्र, मुसलमानी धर्मरक्षक, शिवाजी राजे यांणीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं:—

---

* औरंगजेबाचे शिवाजीस पुरंदरच्या तहानंतर उत्तर.

सांप्रत तुमचें पत्र बहुत नरमाईचें राजे जैसिंग यांचे भेटीबद्दल कळलें. कृत्य माफ व्हावें म्हणोन घेतलेयाचे पाहून गोड ( १ ) ध्यानास आला. यापूर्वी तुमचें मनांतील हाशलि सरकार कामगारांनीं समजाविलें होतें कीं, " तुम्हीं आपले कृत्यांचा पश्चात्ताप करून, या दौलतीचे आश्रयास येउन तीस किल्ले आपणाकडील इकडील कामगारांचे स्वाधीन करून बारा किल्ले व त्याजखालील एक लक्ष होनांचा मुलुख-निजामशाहीचे किल्ले व मुलुख-पैकीं-त्याच प्रकारें आणखी चार लक्ष होनांचा मुल्रूक, तळकोकणांतलि विजापूरकरांचे इलाख्याचा, जो हालीं तुम्हांकडे चालू आहे व पांच लक्ष होनांचा मुल्रूख बालेघाटपैकीं, विजापूरचे इलाख्यापैकीं, येणेंप्रमाणें एकं-दराचा फर्मान बादशाही मागता व चाळीस लक्ष होन-दरसाल तीन लक्ष प्रमाणें-पेशकशीबद्दल देऊं " म्हणतां. ऐशीयास तुमच्या गोष्टी-ज्या तुम्ही तूट अंदेशा न पाहतां केल्या त्या-माफीजोग्या नाहींत. तथापि राजे जैसिंग याणीं लिहिल्यावरून तें सर्व माफ करून तुमच्या मनोरथाप्रमाणें बारा किल्ले देतो. त्याचा तपशील खाली लिहिला आहे. व त्यांच्या खालचा मुल्रूक देउन आणखी हुकूम केला आहे कीं जो मुल्रूक नऊ लक्ष होनांचा त्यापैकीं चार लक्ष होनाचा तळकोकणपैकीं विजापूरकरांचें इलाख्यापैकीं हालीं तुम्हांकडे चालत आहे तो बंदोबस्ताकरिता इकडील सरकारांत आला; सबब बालेघाटीं पांच लक्षांचा मुल्रूख, विजापूर आमचे हातीं येईल त्या आधीं तुम्हीं त्यांजकडून घेतल्यास व चांगलें फौजेसुद्धा राजे जैसिंग यांस मिळोन बादशाही कामांत यांचे मर्जीप्रमाणे कोशीस केल्यास, विजापूर फत्ते झाल्यानंतर तुम्ही पेशकशीचे ऐवजाचा भरणा केल्यानंतर, तुम्हांकडे बहाल ठेऊं. हली आमचे ( आपले ३ ) चिरंजीवास पांच हजारी मनसब

---

१ नजराणा २ येथपर्यंत महाराजांनीं पुरंदरच्या तहानंतर जैसिंगामार्फत औरंगजेबाकडे पाठविलेल्या अर्जाचा सारांश झाला. यापुढें अर्जाचें उत्तर

३ यावरून महाराजांनीं दाहा लाखाचा मुलख मागितला होता. पैकी फक्त एक लाखाची मान्यता दिली; चारास साफ अमान्यता दिली आणि पांचाचे नुसतें अभिवचन मिळाले.

व पांच हजार स्वार—कीं एकएकाचीं दोन दोन तीन तीन घोडीं असावीं—याप्रमाणें देऊन, तुम्हांकरितां पोषाख पाठवून, हा फरमान आपले पंजाच्या चिन्हासुद्धां पाठविला आहे. तरी तुम्ही इकडील लक्षांत वागोन बादशाही काम लहान मोठें सुद्धां करून हें सर्व आपले ऊर्जिताचीच गोष्ट असें समजत जावें. छ ५ रबिलावल सन ८ जुलूस मुा सन १०७७ हिजरी.

---

# औरंगजेबाशीं तह



[ खंड २० पृष्ठ ४८ ]

उपरि हजरत पातशाहा जादेसाहेब अलम औरंगाबादेस साहेबसुबा जाला ते वख्ती माहाराज राजश्री सीवाजी राजे यांचा सलाह जाला. आनंदराऊ व प्रतापराऊ दाहा हजारा स्वारांनिशीं चाकरीस दिधले * नीराजी राहूजी वकील हजूर औरंगाबादेस राहिले ते वख्तीं अंबाजी तुराफ वादिया यानें पंताजीपंत सरकारकुन यांजवळ भीड देखोन त्यांस सटाबटा करून राजश्रीजवळ पंताजीपंतानीं जाहीर केलें कीं ' सुपाचें देशपांडेपण आपलें आहे. साहेबीं आपणास तें वतन दिधलें पाहिजे. त्यावरी राजश्री

---

४ औरंगजेबानें शिवाजीस पाठविलेलें हें पत्र व मागें दिलेलीं दोन पत्रें अस्सल नसून भाषांतर आहेत. मूळ पत्रें फारशीं आहेत. त्यांचीं हीं भाषांतरें शंभर वर्षांपूर्वीं कोणीतरी केलीं असावीं.

* आग्रा येथील कैदेंतून सुटून देशीं परत आल्यावर महाराजांनीं दोन वर्षे समेटाचें बोलणें कायम ठेवलें; व दाहा हजार स्वार बादशाहाच्या तैनातीस देण्याचें कबूल केलें. या कराराप्रमाणें आनंदराव, प्रतापराव व संभाजी यांची रवानगी औरंगाबादेस शाहाजाद्याकडे झाली होती.

राजेसाहेब बोलिलें कीं ' आपण वतनाता कजिया मनास आणीत नाहीं. हें काम औरंगाबादेस साहेबसुबा हजरत बाहादूरशा आहेत तेथें जाऊन कजिया करून तेथें जो कजिया फईसल तो आपणास मंजूर आहे. ' त्यावरून पंताजीपंतीं अंबाजी तुराफ औरंगाबादेस पाठविला. तेथें अमानताचा परवानों चाली लाविला. तों खबर औरंगाबादेहून मल्हार विठ्ठल गुमास्ता याणें लिहिली. मग कासीद सुपियासि आला तों गंगाजी मुद्गल हवालदार यांचे कचेरीस विठ्ठल महादेऊ व त्रिंबक गोमदेऊ व रामाजी बाबाजी व तिमाजी मल्हार कुळकर्णी कसबाचे करीत होते ते ही बैसले होते तों खबर एकाएकी च आली. मग गंगाजीपंतीं कागद पाहोंन बहुत कष्टी जाले.

---

# लष्करास शिस्तीचा उपदेश



" ह्या लेखांकांतील सर्व शब्द शिवाजीच्या तोंडचे आहेत. हें पत्र शिवाजीनें सांगितलें व बाळाजी आवजीनें लिहिलें. ह्या पत्राची भाषा कारकुनी नसून साहेबी आहे. शिपाई लोकांनीं अमुक रीतीनें कां वागावें व अमुक रीतीनें कां वागू नये ह्याची फोड शिवाजीनें शिपायास करून दाखविली आहे. हें पत्र केवळ आज्ञापत्र नाहीं. पत्रांत जरब अतोनात दाखविली आहे. परंतु ती शिपायांच्या हिताची आहे असें आंतील मजकूर वाचून शिपायांना हि वाटावें असा ह्या पत्रांत रोख आहे. हा हुकूम कारकुनाचा नसून खुद्द साहेबाचा म्हणजे शिवाजीचा असल्यामुळें सैनिकांच्या आदरास तो विशेष पात्र झाला असेल हें उघड आहे. ह्या पत्रांत मराठा व कुणबी असा भेद केला आहे " असा इ० संशोधक राजवाडे यांचा अभिप्राय आहे.

श्रीभवानी शंकर

खं. ८ पृ. २३ १५९६ वैशाख शुद्ध १५

मशरुल अनाम राजश्री जुमलेदारानी व हवालदारानी व कारकुनानी दिमत पायगो मुक्काम मौजे हलवर्ण ता। चिपळूण मामले दाभोळ प्रति राजेश्री शिवाजी राजे सु॥ अर्बा सबैन व अलफ. कसबे चिपळुणीं साहेबीं लष्कराची विले केली आणि याउपरि घाटावरी कटक जावें ऐसा मान नाहीं. म्हणून एव्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळुणी कटकाचा मुक्काम होता याकरितां दाभोळच्या सुबेयांत पावसाळ्याकारणें पागेस सामा व दाणा व वरकड केला होता तो कितेक खर्च होऊन गेला. व चिपळुणाआसपास विलातींत लष्कराची तसवीस व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां हाल कांहीं उरला नाहीं. ऐसें असतां वैशाखाचे वीस दिवस, उनाळा, हे ही पागेस अधिक. बैठी पडली. परंतु जरूर जालें त्या करितां कारकुनाकडून व गडोगडीं गल्ला असेल तो देवऊन जैसी तैसी पागेची बेगमी केली आहे. त्यास तुम्हीं मनास माने ऐसा दाणा, रातबि, गवत मागाल. असेल तोंवरी धुंदी करून चाराल. नाहींसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं. उपास पडतील. घोडी मरावयास लागतील. म्हणजे घोडीं तुम्ही च मारिलीं ऐसें होईल, व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास, लोक जातील, कोण्ही कुणब्याचेथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटे, कोण्ही भाजी, कोण्ही पाले, ऐसें करूं लागलेंत म्हणजे जीं कुणबीं घर धरून जीव मात्र घेऊन राहिले आहेत ते हि जाऊं लागतील. कितेक उपाशीं मरायला लागतील म्हणजे त्याला ऐसें होईल कीं मोगल मुलकांत आले त्याहून हि अधिक तुम्हीं! ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतीची व घोडियांची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हें तुम्हीं बरें जाणून, सिपाई हो अगर पावखलक हो, बहुत यादी धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिले असाल त्याणीं रयतेस काडीचा अजार द्यावयाची गरज नाहीं. आपल्या राहिल्या जागांतून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबीं खजानांतून वाटाणिया पदरीं घातलिया आहेती. ज्याला

जें पाहिजे, दाणा हो अगर गुरें ढोरें बागवीत असाल त्यांस गवत हा, अगर फाटें, भाजीपाले व वरकड विकावया येईल तें, रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजवीजीनें दाणा रातीब कारकून देत जातील तेणें-प्रमाणें च घेत जाणें; कीं उपास न पडतां रोजबरोज खायला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसती च कारकुनासी धसपस कराया, अगर अमकें च द्या तमकें च द्या ऐसें म्हणाया, धुंदी करून खासदारकोठींत, कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हालीं उनाळ्याला आहे तइसें खलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहातील, कोण्ही आगट्या करितील, कोण्ही भलते च जागा चुली रंधनाळा करितील, कोण्ही तंबाकूला आगी घेतील, गवत पडिल आहे ऐसे अगर वारें लागलें आहे ऐसें मनास ना आणिता म्हणजे अविस्राच एखादा दगा होईल, एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लहळ्यास कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळ्या आहेत तितक्या एकेएक जाळों जातील. तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनांस ताकीद करावी तैसी केली, तऱ्ही कांहीं खण कराया एक लाकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं; हें तो अवघियाला कळते. या कारणें, बरी ताकीद करून, खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधनें करिता, आगट्या जाळिता, अगर रातीस दिवा घरांत असेल, अविस्रा च उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो. आगीचा दगा न हो. खण, गवत वांचेल तें करणें. म्हणजे पाव-साळा घोडीं वाचलीं. नाहीं तर मग, घोडीं बांधावीं नलगेत, खायास घालावें नलगे, पागा च बुडाली ! ! ! तुम्हीं निसूर जालेत ! ! ! ऐसें होईल. याकारणें तपशिलें तुम्हांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमले-वार, हवालदार, कारकून आहा तितके हा रोखा तपशिलें ऐकणें, आण हुशार राहणें. वरचेवरी, रोजाचारोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणें-प्रमाणें वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल,

बदनामी ज्यावर येईल, त्यास,—मराठियाची तो· इज्जत वाचणार नाहीं, मग रोजगार कैसा ?—खळक समजों जास्ती केल्याविगळ सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें. छ १२ सफर.

---

# अष्टप्रधानांची व मुख्याधिकाऱ्यांची कामें



श्री

कानूजाबतो राज्याभिषेक शके १ आनंद नाम संवत्सरे ज्येष्ट वद्य १३ त्रयोदशी भोमवासरे.

मुख्य प्रधान यांणीं सर्व राजकार्य करावें. राजपत्रावर शिक्का करावा. सेना घेऊन युद्धप्रसंग व स्वारी करावी व तालुका ताबीनांतें स्वाधीन होईल त्याचा रक्षून बंदोबस्त करून आज्ञेंत वर्तावें. सर्व सरदार सेना [ यांणीं ] याजबरोबर जावें. त्यांणीं सर्वांसमेत चालावें. येणेंप्रमाणें मोर्तब कलम १.

सेनापती यांणीं सर्व सैन्य संरक्षण करून युद्धप्रसंग स्वारी करावी. तालुका स्वाधील होईल तो रक्षून हिशेब रुजू करून आज्ञेनें वर्तावें. फौजेच्या लोकांचें बोलणें बोलावें. सर्व फौजेचे सरदार यांणीं त्यांजबरोबर चालावें. मोर्तब कलम १.

अमात्य यांणीं सर्व राज्यांतील जमाखर्च चौकशी करून दप्तरदार, फडणीस [ हे ] यांचे स्वाधीन असावे. लिहिणें चौकशीनें आकारावें. फडणिसी चिटणिसी पत्रांवर निशाणें करावें. युद्धप्रसंग करावे. तालुका जतन करून आज्ञेंत चालावें. मोर्तब. कलम १.

पंडितराव यांणीं सर्व धर्माधिकार, धर्म, अधर्म पाहून शिक्षा करावी.

---

१ नियमावली २ अमलांत, अधिकारांतील ३ निशाणी, चिन्ह

शिष्टांचें सत्कार करावे. आचार, व्यवहार, प्रायश्चितपत्रें होतील त्यांजवर संमत चिन्ह करावें. दानप्रसंग, शांति, अनुष्ठान तात्काळ करावें. मोर्तब कलम १.

सचिव यांणीं राजपत्रें शोध करून अधिक, उणें अक्षर मजकूर शुद्ध करावा. युद्धप्रसंग करून तालुका स्वाधीन होईल तो रक्षून आज्ञेंत वर्तावें. राजपत्रांवर चिन्ह संमत करावें. मोर्तब कलम १.

न्यायाधीश यांणीं सर्व राज्यांतील न्याय, अन्याय मनास आणून बहुत धर्म करून न्याय करावे. न्यायाचीं निवाडपत्रें यांजवर संमत चिन्ह करावें. मोर्तब. १.

मंत्री यांणीं सर्व मंत्रविचार राज्यकारणें यांतील सावधतेनें विचार करावे. आमंत्रण, वांकनिसी त्यांच्या स्वाधीन. तालुका जतन करून युद्धादि प्रसंग करावे. राजपत्रांवर संमत चिन्ह करावें. मोर्तब कलम १.

सुमंत यांणीं परराज्यांतीलें विचार करावा. त्यांचे वकील येतील त्यांचे सत्कार करावे. युद्धादि प्रसंग करावे राजपत्रांवर संमत चिन्ह करावें. मोर्तब कलम १.

चिटणीस यांणीं सर्व राज्यांतील राजपत्रें लिहावीं. राजकारणपत्रें, उत्तरें लिहावीं. सनदा, दानपत्रें वगैरे महालीं हुकुमी यांचा जाबता फडणिसी अलाहिदा त्याप्रमाणें लिहावीं. हातरोखे, नाजूकपत्रे, यांजवर मोर्तब अथवा खास दस्तक मात्र; वरकडांचा दाखला चिन्ह नाहीं. चिटणीसानींच करावें मोर्तब. कलम १.

फौजेचे सबनीस बक्षी यांणी सर्व फौजेची हजेरी चौकशी करावी. यादी करून समजवावें. रोजमुरा वाटणें, सत्कार करावा, युद्धादि प्रसंग करावा. मोर्तब. कलम १.

सेनाधुरंधर यांणीं बिनी करावी, आघाडीस जावें, फडफर्मास करावी, लूट करणें, मना करणें, चौकशी, ताकीद त्यांजकडे. पुढें असून सेना रक्षण करावी. मोर्तब. कलम १.

किल्ले, कोट, ठाणीं, जंजिरे येथील कायदे करून दिले त्याप्रमाणें हवालदार, सुभेदार, कारखानीस, सबनीस, सरनोबत, तटसरनोबत, लोक यांचे

जाब्रते करून दिले त्याप्रमाणें चालून सावधतेनें स्थळें रक्षावींत. तोंगिरी बदली हुजुरून व्हावी. बेजमी नेमणूक तालुकेदार यांजकडे. दरवाजा, किल्या [ यांजवर ] हवालदार याचा हुकूम, शिक्के त्याच्या नांवचे. कारखानिसी, सबनिसी, जाबता अलाहिदा असे. मोर्तब. कलम १

सुभे मामले तालुकदार यांस ज्याजकडे जें नेमलें तें त्याणी जाब्त्याप्रमाणें चालावें. हुजूरचे दरखदार चिटणीस, फडणीस, मुजूमदार यांच्या इतल्यानें चालून हिशेब गुजराव. मोर्तब कलम १.

बारामहालचे अधिकारी यांणीं आपापलें काम दुरुस्त राखून हिशेब आकारून दफतरांत गुजरावें. मोर्तब. कलम १.

देरूणी महालचें कामकाज दिवाण नेमून दिले त्याणीं सर्व पाहून करावें. चिटणीस, फडणीस यांणीं आपलाले दरखाचे कागद लिहावे. त्यांजवर निशाणाचिन्ह दिवाणांनीं करून त्यास समजून मोर्तब समक्ष करावे. मोर्तब. कलम १

आठरा कारखान्यांचे अधिकारी यांणीं खासगीचे अधिकारी यांच्या इतल्यांत चालून दफतरीं हिशेब गुजरावे. मोर्तब कलम १.

आबादारखाना चिटणीस यांजकडे सरफखाना सुद्धां अधिकार सांगितला. मजालसी, विडे, अत्तरगुलाब व हारतुरे, फळफळावळ, खुपबई खरेदी जमाखर्च याणीं करून हिशेब दफतरीं गुजरावा. मोर्तब. कलम १.

पोतनीस याणीं पोते जमाखर्च लिहिणें करावें. नजरपेशकसी जमा करावी. पोतदार याणीं पारख करावी. मोर्तब. कलम १

पागा जुमलेदार, सरदार यांणीं कैद करून दिली त्याप्रमाणें चालून सेनापति व प्रधान यांच्या समागमें कामकाजें करावीं. मोर्तब. कलम १.

अष्टप्रधान यांजकडे पेटे व तालुके व स्वारीस जाणें त्यांस दरखदार सर्व

---

४ दूर करणें, काढून टाकणे ५ बारामहाल: पोते, कोठी, पागा. दरजी, टंकसाळ सौदागिरी, इमारत, हवेली, पालखी, थट्टी, चौबीना, शेरी महाल ६ अंत:पुर जनानखाना ७ जलस्थान, येथें स्वच्छ पाणी गार व सुवासिक करून ठेवावयाचें ८ विड्याचें साहित्य ठेवावयाचें स्थळ

हुजूरच्या नांवें, त्यांच्या दाखल्यांनीं पत्रव्यवहार करावा. स्वारीस जावें त्यांस मुतालीक करून दिले त्यांणीं सर्व व्यवहार चालवावा. हुजूर राहावें. कलम मोर्तब. १.

एकुण कलमें वीस. मोर्तब.

---

# ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करतो ?



[ खंड ८ ] श्री शंकर प्रसन्न १५९६ माघ शु० ३
पृ. २७

मशहुरुल हजरत राजश्री शिवाजी विनायक सुबेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी. प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. सुहुरसन खमस सबैन व अलफ. दौलताखान व दरिया सारंग यांस ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता सुभे मजकुरावरी दिधल्या. त्यांस तुम्हीं कांहीं पावले नाहीं, म्हणोन कळों आलें. त्यावरून अजब वाटले कीं ऐसे नादान थोडे असतील ! ! ! तुम्हांस समजलें असेल कीं याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणीं फाटीं आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार बेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील. आणि तुम्हीं ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल ! एवढी हरामखोरी तुम्हीं कराल. आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाल, त्यावरी साहेब रिझतील कीं काय ? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय न कळे कीं हबाशियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील ! त्या करितां ऐसी बुद्धी केली असेल ! तरी ऐशा चाकरांस ठीकेठीक केले

पाहिजेत ! ब्राह्मण म्हणून काण मुलाहिजा करूं पाहतो ? याउपरि तऱ्ही त्यांला ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंतीं देविला असे तो देवितलि. तो खजाना रसद पावलियाहून अधिक जाणून तेणेंप्रमाणें आदा करणें कीं ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्म-दुर्गाचे मदतसि राहात तें करणें. याउपरि बोभाट आलियाउपरी तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनीमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल. ताकीद असे. रवाना छ २ जिल्काद.

---

# सनातनधर्म व महाराष्ट्रधर्म



सनातनधर्माच्या विरुद्ध भक्तिमार्गाचा उदय होऊन मराठ्यांच्या मनाचा कोतेपणा नाहींसा झाला व तेणेंकरून चोहोबाजूनें स्वतंत्र होण्याची उत्कट इच्छा मराठ्यांच्या मनांत बाणली व मराठ्यांनीं स्वराज्य स्थापिलें अशी कार्यकारणपरंपरा कैलासवासी महादेव गोविंद रानडे यांनीं आपल्या " मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष " या ग्रंथांत लाऊन दाखविली आहे. तिचें खंडन करतांना रा. राजवाडे ह्मणतात [खं. ४ प्रस्तावना पृ. ११५–११६]:—

बौद्धधर्माचें प्राबल्य उत्कट होऊन सर्व भारतवर्ष त्या धर्माच्या आवरणानें गुरफटून जात असतां श्रीमच्छंकराचार्यांचा उदय होऊन सनातन धर्माची स्थापना इसवी सनाच्या सहाव्या, सातव्या व आठव्या शतकांत हिंदुस्थानाच्या व महाराष्ट्राच्या बऱ्याच भागांत झाली. ह्या तीन शतकांत भारत वर्षांतून बौद्धधर्माचें निष्कासन यद्यपि बहुतेक झालें तत्रापि बौद्ध-धर्मासारखाच जो जैनधर्म तो गुजराथेच्या उत्तरेस व महाराष्ट्राच्या दक्षिणेकडील कोल्हापूर वगैरे प्रांतांत दहाव्या व अकराव्या शतकापर्यंत प्रबल होता. बाराव्या शतकाच्या सुमारास जैनधर्माच्या विरुद्ध लिंगायतांचा पंथ

व मानभावांचा पंथ महाराष्ट्रांत सुरु झाला. जैनांच्या, लिंगायतांच्या व मानभावांच्या संसर्गानें सनातन धर्माच्या गोटांतील लोकांच्या हि मनांवर कांहीं परिणाम झाले व त्यापैकीं कांहींनीं भक्तिमार्ग, उपासनामार्ग ह्या नांवाखालीं मोडणारी सनातनधर्माची एक निराळीच शाखा स्थापिली. ह्याच शाखेला संतमडळींचा अथवा संताळ्याचा भक्तिपंथ म्हणून म्हणतात. जैन, लिंगायत व मानभाव ह्यांच्यांत कमजास्त प्रमाणानें जातिभेद व्यवहारांत मानीत नाहींत. संताळ्यांत विठोबाच्या मंदिरांत तेवढा जातिभेद मानीत नाहींत. व्यवहारांत मानतात. ह्या भक्तिपंथाची स्थापना महाराष्ट्रांत तेराव्या शतकांत झाली. संताळ्याची ही स्थापना झाल्यावर कांहीं कालानें देवगिरी येथील मराठ्यांचें राज्य नष्ट झालें व यवनांची सत्ता महाराष्ट्रांत तीनशे वर्षे म्हणजे १३१८ त देवगिरी घेतल्यापासून १६१९ त अहमदनगरची मनसबगिरी शहाजीला मिळे तों पर्यंत बहुतेक अव्याहत चालली. ह्या तीन शतकांत संताळ्यांचेंच प्राबल्य महाराष्ट्रांत फार होतें. संत ह्मटला ह्मणजे अत्यंत पंगुपणाचा केवळ मूर्तिमंत पुतळाच होय.······ इहलोक हा संताचा नव्हेच. राजा कोणी असो, सारा कोणी घेवो, संताला त्याचें कांहीं नाहीं. असल्या ह्या संत मंडळीच्या हातीं विचाराची दिशा जाऊन महाराष्ट्र तीन शतकें पंगु बनून राहिलें. सनातनधर्माला त्रासून महाराष्ट्रांतील लोकांनीं जी धर्मक्रांति केली तिचें स्वरूप हें असें होतें. ह्या धर्मक्रांतीनें धर्मोन्नति व राष्ट्रोन्नति होण्याचें एकीकडेच राहून उलटी धर्मावनती व राष्ट्रावनती मात्र झाली. कालांतरानें यवनांच्या अमलाखालीं पायमल्ली झालेली पाहून मराठ्यांचे डोळे उघडले. ह्या पंगु संताळ्याचा त्यांना वीट आला आणि सनातनधर्माकडे, गोब्राह्मण प्रतिपालनाकडे व चातुर्वर्ण्याकडे त्यांनीं पुनः धाव घेतली. ह्या उपरतीच्या वेळीं रामदासस्वामीं, रंगनाथस्वामी, मोरयादेव वगैरे सनातनधर्माभिमानी विचारी साधु पुरुष उत्पन्न झाले; व महाराष्ट्रांस महाराष्ट्रधर्माचा उपदेश करते झाले.... ......संताळ्याच्या उपदेशानें महाराष्ट्रांत नवीन जोम आला म्हणून न्यायमूर्ति रानडे म्हणतात तो खरा प्रकार नसून समर्थांनीं काढिलेल्या नवीन रामदासी पंथाच्या उपदेशानें तो चमत्कार घडून आलेला आहे.

सहिष्णुता हें संतांचें व्रत पडलें. तेव्हां गाईचा वध झाला, ब्राह्मणाचा छळ झाला, धर्माचा उच्छेद झाला तरी संतांची सहिष्णुता कांहीं चळली नाहीं. सर्वस्वाचा नाश झाला तरी आपलें कांहींच गेलें नाहीं ही संतांची बालंबाल खात्री अशांच्या हातून राष्ट्राची राजकीय उन्नति व्हावी कशी ? तोंच समर्थांचा उदय होण्याच्या सुमारास काय प्रकार झाला तो पहा. आपल्याला कांहीं मिळवावयाचें आहे, गोब्राम्हणाचें प्रतिपालन करावयाचें आहे, सनातन धर्म स्थापावयाचा आहे, स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा करावयाची आहे असे प्रवृत्तिपर विचार लोकांचे मनांत उत्कटत्वेंकरून बाणू लागले व राजकीय उन्नति होण्यास प्रारंभ झाला. ह्या राज्यक्रांतीला समर्थांनीं उपदेशिलेला महाराष्ट्रधर्म कारण झाला, संतांचा निवृत्तिमार्ग कारण झाला नाहीं.

---

# श्रीसमर्थांनीं स्वहस्तें लिहिलेलें पत्र



श्रीरामसमर्थ

श्री संप्रदायाचीं कागदपत्रें
पृ. १

उत्तमगुणाळंकृत रघुनाथभक्तिपरायेण परोपकार राजमान्य राजश्री रघुनाथभट[1] गोसांवी यांसी. स्नेहपूर्वक सूचना. तुमचा निरोप घेउनु हेलवाकीहून स्वार जालों ते सुखरूप चाफलास पावलों. संकल्पाची समाराधना हि जाली. पुढे शरीराचा उपचार[2] हि हलु हलु होतो. तुमचें मन मजवरी

---

१ रघुनाथभट हे श्रीसमर्थांचे उपाध्ये होते.

२ या वेळीं समर्थांचे वय ६७ वर्षांचे होते. त्यांना हेळवाकच्या घळींत हिंवताप जडला होता व ते अद्याप पूर्णपणें त्यांतून बरे झाले नव्हते असें दिसतें.

बहुत आहे ते तुमचे आवडीच्या गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें. आपणे ते कर्कप सीतलाईमध्यें बहुत चि श्रम पावलों तों माझा सकळ श्रम घेउनु मज निरोप दिधला तो उपकार देव जाणें. यविसी चीत चमत्कारलें ते पत्री किती म्हणौनु लिहावं ? माझे अरिष्ट तुम्ही घेऊन मज उष्ण देशासी पाठविलं, हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला. मज रघुनाथजी वेगले कोण्ही जिवलग नाही. आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला. याउपरी माझे ठायी तुम्ही आहा. रघुनाथ कृपचा प्रत्यये तुम्हास आलियावरी प्रचीतीसीं कलों येईल, बहुत काये लेहावें ? वेदमूर्ती दिवाकर भट गोसांवी तेथे आलियावरी तुम्ही माझा समाचार घेयासी ये प्रांतास आले पाहिजे. स्नेह बहुत असों दीजे. हा पत्तार्थ हे इतुके म्या आवडीच्या कळवळ्यानें लिहिलें आहे. मनेमन साक्ष असेल. परंतु तुम्हास उपचारसा वाटोन रजीस होल तरी न होणें. जैसा दिवाकरभट तैसे तुम्ही, हा इत्यर्थ आहे. बरें कललें पाहिजे. तुमचा आमचा येकांत प्रसंग जालियावरी मग ऐसें लिहिता न ये, म्हणोनि य सर्वामधे प्रसंग फावला पुढें फावेना म्हणोनि लांब करूनें लिहिलें. वरकड इतर भाव मनामधें असेल तरी रघुनाथ साक्ष असे. तुम्ही रंजीस न होणें आणि जें आहे तें लिहिलं यामधे मिथ्या स्तुती नाही. तुम्ही सर्वज्ञ आहा. तुमचे जे काही आहे ते सकल माझें चि आहे. म्या मज माझ्या मनास येईल तैसें लिहिलें येथें तुमचें काये गेलें ? कांहीं चिंता न कीजे. तुम्ही आमचे चि आहा, तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों. शरीरभेदावरी न जाणे. अंतरस्थिति पाहिल्या उपरी कलो येईल.

---

३ दिवाकर भट रघुनाथभटाचे व्याही ४ विस्तारानें किंवा सुद्दाम जासुदाबरोबर



# समर्थ-शिवाजी परिचय



श्रीगुरुभक्तपरायण मोक्षश्रिया विराजित दिवाकर गोसावी या प्रति भास्कर गोसावी नमस्कार विनंति. उपरि श्रींचे उछाहास होनु पनास भिक्षेस मिळाले ते भानजी गोसावी बराबर पाठविले. पावतील. शिवाजी राजे याजकडे भिक्षेस गेलों. त्यानीं विचारिलें " तुम्ही कोठील ? कोण ? कोणाठिकाणीं असतां ? " त्यावरून आम्हीं बोललों कीं " आम्ही रामदासी. श्रीसमर्थांचे शिष्य. चाफळास हों. " मग ते बोलले कीं " ते कोठे राहतात ? व मूळ गांव कोण ? " त्यावरून मीं सांगितलें कीं " गंगातीरचे जांबचे राहणों. प्रस्तुत चाफळास मठ करून श्री देवाची स्थापना करून उछाह मोहोछव चालू करून आम्हा सर्वास आज्ञा कीं " तुम्ही भिक्षा करून उछाह करीत जावा. " सागितल्यावरून आम्ही हिंडत आहों " असें बोलतां राजेश्रीनीं दत्ताजीपंत वाकेनिवीस यास ' प्रतिवर्षी श्रीउछाहास दोनशे होनु देत जाणे ' ह्मणून पत्र पाठविलें तें हो + + स येतील. कलावे फाल्गुन शुा २ शके १५८० * हे विनंति.

[ सज्जनगड व समर्थ रामदास पृ. ११० ]

# समर्थ-शिवाजी भेट



श्रीराम

श्रीरामदासस्वामी

श्रीगुरुभक्त परायण राजमान्य राजेश्री दिवाकर गोसावी यांसी. प्रतिपूर्वक केशव गोसावी नमस्कार उपरि येथील कुशल. आपण पत्र पाठ-

---

* शके १५७६ पासून दहावर्षें शिवथरच्या घळींत दासबोध लिहिण्यासाठीं श्रीसमर्थांनीं बसण्याचा संकल्प केल्यानंतर दिवाकर गोसावी चाफळच्या मठासाठीं भिक्षामागण्यास शिवाजी महाराजाकडे गेला होता त्याची हकीगत या पत्रांत आहे.

विलें तें पावलें मजकूर समजला. राजेश्री शिवाजीराजे भोसले हे समर्थांचे भेटीस येणार ह्मणोन लिहिलें तें समजलें. मी येणार होतों. परंतु माझी प्रकृति फार बिघडली. येणें होत नाहीं. मी इकडून अकास येणेंसाठी लिहिलें. परंतु अकाचे हि येणें व्हावयाचे नाहीं. गांवीं भानजी गोसावी तेथे असतील. राजे यांची पहिलीच भेट * आहे. वाडीचे लोकांस खटपटेस आणावें. उपयोग होईल. झाडी बहुत आहे इकडून उदईक त्रिंबक गोसावी व विठ्ठल गोसावी व दत्तात्रय गोसावी उदइक पाठवून देतो. श्रींचे उत्साहास भिक्षेचे धान्य जें मिळालें तें अश्वत्थ भट मसुरकर या समागमे पाठविलें. दत्ताजी पंताकडून दोन शे होनु उत्साहास पाठविले. ते आले असतील लोभ करावा. मिती चैत्र वद्य १ शके १५९४ हे विज्ञापि. [ सज्जनगड व समर्थ रामदास पृ. ११२ ]

---

# चाफळ संस्थानास मिळालेली छत्रपतींची सनद.



श्री. १६०० अश्वीन शु० १०

श्रीसद्गुरुवर्य, सकळतीर्थरूप, श्रीकैवल्यधाम, श्रीमहाराज, श्रीस्वामींचे सेवेसी. चरणरज शिवाजीराजे यांनीं चरणावर मस्तक ठेऊन विज्ञापना जे-मजवर कृपाकरून सनाथ केले. आज्ञा केली कीं, तुमचा मुख्यधर्म, राज्य-साधन करून, धर्म स्थापना, देवब्राम्हणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून, पाळण, रक्षण करावें; हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्हीं जें मनीं

---

* ' पहिलीच भेट ' या शब्दावरून श्रीसमर्थ व शिवाजी महाराज यांची यापूर्वी गांठ पडली नसावी असा तर्क प्रो. गो. चि. भाटे यांनीं केला आहे परंतु या मठास महाराजानीं दिलेली ही पहिली भेट असा अर्थ करणेंच जास्त सयुक्तिक दिसतें.

धराल तें श्री सिद्धीस पावील. त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरूख लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करून राज्यपरंपरा अक्षय चालें ऐसीं स्थळें दूर्घट करावीं, ऐसें जें जें मनीं धरिलें तें तें स्वामीनीं आशीर्वादाप्रमाणें मनोरथ पूर्ण केलें. याउपारि राज्य सर्व संपादिलें. तें चरणीं अर्पण करून सर्व काळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला. तेव्हां आज्ञा जाली कीं, " तुम्हांस पूर्वी धर्म सांगितले तेच करावें. तीच सेवा होय. " ऐसे आज्ञापिलें. यावरून निकट वास घडून, वारंवार दर्शन घडावें; श्रीची स्थापना कोठें तरी होऊन सांप्रदाय, शिष्य-भक्ती विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात् गिरिगव्हरी वास करून, चाफळीं श्रीची स्थापना करून सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली. त्यास चाफळीं श्रीची पूजा, महोत्सव, ब्राह्मणभोजन, अतिथि, इमारत सर्व यथासांग घडावें. जेथें जेथें श्रीच्या मूर्ति स्थापन जाहल्या तेथें उत्सव, पूजा घडावी. यास राज्य संपादिलें त्यांतील ग्रामभूमी कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी. तेव्हां आज्ञा जाली कीं, ' विशेष उपाधीचें कारण काय ? तथापि तुमचे मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय जाहला. त्यास यथावकाशें जेथें जें नेमावेसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याच्या वंशाचा विस्तार होईल तसें करीत जावें. " या प्रकारें आज्ञा जाहली. यावरून देशांतरी सांप्रदाय व श्रीच्या स्थापना जाहल्या त्यास ग्रामभूमीची पत्रें करून पाठाविलीं. श्रीसंनिध चाफळीं एकशे एकवीस गांव सर्वमान्य व एकशे एकवसि गांवीं आकरा विटे प्रमाणें भूमी व आकरा स्थळीं श्रीची स्थापना जाहली. तेथें नैवेद्य, पूजेस भूमी, आकरा बिघेप्रमाणें नेमिली आहे. ऐसा संकल्प केला आहे तो सिद्धीस नेण्याविषयीं विनंति केली. तेव्हां संकल्प केला तो परंपरेनें शेवटास न्यावा ऐसी आज्ञा जाहली. त्यावरून सांप्रत गांव व भूमी नेमिले. तपशीलः—

१ मौजे चाफळ, मौजे नाणेगांव.........वगैरे गांवें ३३.

२ मौजे दहीफळ बुद्रुक, परगणें ढवळी श्रीश्रेष्टाचे समाधीकडे देहे. २

३ गांव गंना जमीन बिघे चारशे एकोणसि.

धान्य, गल्ला हरजिनसी खंडी १२१ एकशें एकवीस एकूण बंदोबस्त सर्वमान्य गांव तेहतीस व जमीन बिघे गांवगन्ना चारशे एकुणीस व कुरण एक श्रीचे पूजा, उत्साहाबद्दल संकल्पांतलि सांप्रत नेमिलें व उत्साहाचे दिवसास व इमारतीस नक्ती ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ठ करीन येणेंकरून अक्षय उत्साहादि चालविण्याविषयीं आज्ञा असावी. राज्याभिषेक शके ५ कालयुक्ताक्षि नांम संवत्सरे अश्विद शुद्ध दशमी, बहुत काय लिहिणें हें विज्ञापना.

---

# मराठे लोकांचें गोमटे व्हावें



हें पत्र मुधोळच्या मालोजी घोरपड्याला शिवाजी महाराजांनीं लिहिलें आहे. शहाजी राजे भोसलें यांना कैद करणारा जो बाजी घोरपडे मुधोळकर त्याचा मुलटा मालोजी घोरपडे. या पत्रांतील " बहुत काय लिहिणें " हें वाक्य समाप्तीस स्वतः शिवाजी महाराजांनीं लिहिलें असावें असें सुप्रसिद्ध इतिहास संशोधक वि. का. राजवाडे यांचें मत आहे. हें पत्र बडोद्यांतील चिटणीसांच्या दप्तरांतलें आहे. [ सरस्वतीमंदीर ]

श्रीमहादेव

१५९८ फाल्गुन.

राजश्री मालोजी राजे घोरपडे यांसीः—

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य प्राति राजश्री शिवाजी राजे जोहार. उपरि. पूर्वी निजामशाहीतून आमचे बाप कैलासवासी महाराज इभराईम आदिलशाहा पादशहाचे कारकीर्दीस इकडे आले. त्यास, ईभराईम आदिलशानें पादशाही कारभाराचा मदार महाराजाचे सिरीं टाकिला. तेव्हां महा-

राजानें हा विचार कीं, पादशाही मदार आपले हातास आला असतां आधीं तों आपले जातीचे लोक मराठे यांला हातीं धरून सरदारकी करून पोटें भारितात ते पादशाही वजीर करावे, पादशाही कामें यांजकडून करऊन नामोर्श[1] होय, इज्जती थोर पावेत तें करावें. म्हणून तुमचे बाप बाजी घोरपडे सरदारकी करून होते ते आणून पादशाहास भेटऊन पादशाही वजीर केले. त्या दिवसापासून तुमच्या बापाच्या हातें व तुमच्या हातें पादशाहीचीं कामें होत आलीं. पादशाहांनीं तुमचें चालविलें. ऐशा तीन पिढ्या पादशाहाच्या, दोनी पिढ्या तुमच्या जाल्या. ऐशियास, महाराजानें तुमच्या बापास इतकें बरें केलें हें स्मरण न धरून, जेव्हां कांहीं मुस्तफाखानानें महाराजास दस्त करविलें तेव्हां तुमचे बाप बाजी घोरपडे हमी होऊन महाराजास दस्त करून मुस्तफाखाचे हातीं दिल्हें. त्या दिवसापासून तुमच्या घराणियाचा व आमच्या घराणियाचा दावा वाढत चालिला. तो कित्येक झगडियांत तुम्हीं आमचे लोक मारिलें व आम्ही तुमचे लोक मारिले. आदिकरून तुमचे बाप बाजी घोरपडे यांला आमचे लोकीं झगडियांत मारिलें. ऐसा परस्पर दावा चालिला होतां. ऐशियास सांप्रति राजकारण वर्तमान तरीः-दक्षणेचे पादशाहा तीन, निजामशाहा, आदिलशाह, कुतुबशाह. त्यामध्यें निजामशाही पादशाही बुडाली ते समईं निजामशाही उमदे वजीर होते त्यांणीं आदिलशाही दरगाहाशीं[3] रुजुवाती करून आपणास रोजगारास जागा केला. हालीं आदिलशाही बहलोलखान पठाणीं घेतली. पादशाहा लहान लेकरूं. नांव मात्र. ते. आपले कैदेंत ठेविले आहेत. आाणि तख्त व छत्र विजापूरचा कोट पठाणानें कबज केला आहे, कांहीं गुबारून मिळाला नाहीं. ऐशियास, दक्षणचे पादशाहीस पठाण जाला, हे गोष्टी बरी नव्हे ! पठाण बळवला म्हणजे एका उपरि एक कुली दाक्षिणियांची घरें बुडवील, कोण्हास तगों देणार नाहीं, ऐसें आम्हीं समजोन हजरत कुतुबशाहा पादशाहा यांसी पहिलेपासून रुजुवात राखिली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशाहांनीं मेहरबानी करून'हुजुर भेटीस'येणें म्हणून दस्तखत मुबारक व

---

१ केंद्र, सत्ता २ प्रसिद्ध ३ दरबाराशीं

दस्तपंजियानसीं फर्मान सादर केला. त्यावरून आम्ही येऊन हजरत कुतुबशाहाची भेटी घेतली. भेटीचे समई पादशाही आदबें आहे कीं शिरभोई धरावी, तसलीम करावी. परंतु आम्ही आपणावरी छत्र धरिलें असें ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन शिरभोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. पादशाहांनीं बहुतच इज्जती होऊन, गळ्यास गळा लाऊन भेटले. आम्हास हातीं धरून नेऊन जवळीं बैसाविलें. कितीएक मेहेरबानी जाहीर केली आणि कुतुबशाहाचा व आपला घटीं बरेपणा करून घेतला. याउपरी राजकारण विषई हजरत कुतुबशाहांनीं महादण्णापंतांस व आम्हांस एकाचित करून ऐसा तह केला कीं, जो काय उभयवर्गी तह द्यावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हावरी टाकिला आहे कीं,' आपली पादशाही जितकी वाढवूं ये तितकी वाढवणें, पठाणाची नस्तनाबूद करणें; दक्षणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें ' म्हणून. त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलियाउपरि आम्हीं हाच विचार केला कीं जे कांहीं आपलें जातीचे मराठे लोक आहेती ते आपले कटांत घेऊन कुतुबशाहासी त्यांची रुजुवात करावी, दौलत देवावी, त्यांचें हातें पादशाही काम घेऊन पादशाहाची पादशाही दराज करावी, आणि तुम्हा लोकांच्या दौलताहि चालेत, घरें राहेत, तें करावें. आपल्या जातीच्या मराठिया लोकांचें बरें करावें हें आपणास उचित आहे ऐसें मनावरी आणून तुमचा आमचा वडिलापासून दावा वाढत आला तो आम्ही मनांतून टाकून, निःकपट होऊन, तुम्ही मराठे लोक, कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून, हजरत कुतुबशाहासी बहुत रीती बोलोन, तुम्हांस हजरत कुतुबशाहाचा कौलाचा फर्मान घेऊन पाठविला आहे. तरी तूम्ही कुलीन, आमचा भरोसा मानून, देखत पत्र, हरएक उपाये, पठाणापासून निघोन मजलदरमजल भागानगरास आम्हांपाशीं येणें. त्यास, तुम्ही तरी स्वार होऊन व मजलदरमजल यालच. परंतु आपला कुली खुलासा, नेमस्त मुद्दा व इतबारी

---

४ दरबारीं पद्धत ५ लऊन सलाम ६ वाढवावी.

हेजीब बहुत सत्वर पुढें पाठवून देणें. कीं, तुम्हांहुन पुढें चार दिवस आम्हांपासीं यावे ऐसा पाठवून देणें. म्हणजे हजरत कुतुबशाहास अर्ज करून दौलतेचे नेमस्त करुन, कौलाचा फर्मान दस्तपंजेमुबारक घेऊन फर्मान व लुगडीं मोहताप तूम्हांस पाठऊन देऊन. ते घेऊन, येऊन, आमचे हातें हजरत कुतुबशाहास भेटणें. ए प्रसंगीं ऐसें तुमचे दौलतीचें काम मजबूत करून देतों कीं, पुढें बहुत बरें केलें ऐसें तुम्हीं आठवावें; तुमचे पुत्रपौत्र आठवीत, व दौलत थोर होए व हजरत कुतुबशाहाचे काम तुमचे हातें होऊन ये ऐसा समय आहे. ऐशियास तुम्ही कदाचित ऐसा विचार कराल कीं आदिलशहाचें आपण दो पिढीचे वजीर आणि आतां विजापुराकडून कुतुबशांहींत राजेयांचे बोले कैसें जावें? तरी, जे समई खवासखान धरिला, विजापूरचा कोट पठाणें घेतला, विजापुरचा पादशाहा धाकटा आहे त्याला कैदेंत ठेविलें तेंच समई पादशाही बुडाली ! विजापूर पठाणाचे हातास गेलें ! आतां आदिलशाही कैची ? आणि उगीच तुम्ही तेथें आपली आदिलशाही आहे म्हणोन गुंतून राहिले आहां ! जरी पठाणाचीच चाकरी करोन राहो म्हणाल, तरी, पठाण कांहीं तुम्हांस थोर दौलत देणार नाहीं. आणि पठाणास तरी हजरती कुतुबशाहा व आम्ही व तमाम दखणी मिळोन चालोन घेऊन बुडवीतच आहों ! तुम्ही मराठे लोक आपले आहा तुमचें गोमटें व्हावें म्हणून पष्टच तुम्हांस लिहिलें असें. जें काय तुम्हास पठाण देतो त्याची दुगुणी आम्ही कुतुबशाहापासून तुम्हास देवीतच असो, किंवा ह्याहून अधिकहि होऊन येईल तरी करून देऊच. सर्वप्रकारें तुमचें गोमटें करून. ए विसीं आम्हापासुन अंतर पडे तरी व मागील दावियाचा किंतु मनांतून टाकिला एविसीं आम्हांस श्री ——देवीची आण असे तुम्हीं निःसंदेह होऊन येणें. हेजीब आपला पुढें पाठाविणें; त्या हातीं, आ-म्हांसी घरोबियानें बरें वर्तावें, मागील दावियाचा किंतु मनांतून टाकिला, ऐसें आपला आराध्य व कुळस्वामी असेल त्याची शपथ लिहून पत्र हेजिबा हातीं पुढे पाठवून देणें. आम्ही सर्व प्रकारें तुमचें गोमटें करावयासी अंतर पडो न देऊन. बहुत काय लिहिणें.

# गृहकलह बरा नव्हे



श्री महादेव कुलस्वामिनी

श्री सहस्त्रायु चिरंजीव अखंडीतलक्ष्मीअलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री व्यंकोजी राजे प्रति राजश्री शिवाजी राजे, आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. उपरि कैलासवासी साहेबी* कैलासवास केला, त्यास आज तेरा वर्षे जाली. महाराजांचे पैके व जडाव व हत्ती व घोडे व मुलूख अवघे ही राजश्री रघुनाथपंतीं तुम्हांला राज्यावर बैसवून संपूर्ण राज्य तुमचें हातीं दिलें. ऐशियास आमचा अर्धा-वांटा तेरा वर्षे तुम्हीं च खादला. आम्हीं जरी तुम्हांजवळीं मागावें, तरी बहुत दूर होतां. बऱ्या बोलें तुम्हीं देणार नव्हां; म्हणून तेरा वर्षे सबुरी केली. मनामध्यें ऐसा विचार केला कीं, बरें, महाराजांचे पुत्र ते ही आहेत, खाती खात मालाचे धनी च आहेत. जे समयीं आम्हाला पावेल, ते समयीं आम्हीं वेव्हार सांगोन घेऊं; असें मनीं धरोन होतों. ऐशियास राजकारणप्रसंगें आम्ही कुतुबशहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजीस आलों. चंजी घेतली व येलूर तर्फेचा मुलूख घेतला, व सदर खानास ( शेरखानास ? ) झगड्यांत मोडून गर्दीत मेळ-विलें. खानाचे हातीं मुलूख होता तेवढा ही घेतला. त्यावरी मजल दर-मजल कावेरीतीरास गेलों. तेथून तुम्हांस पत्रें लिहिलीं कीं, राजश्री गोविंदभट गोसावी व राजश्री काकाजीपंत व राजश्री निळोबा नाईक व राजश्री रंगोबा नाईक व तिमाजी यक्षियार राऊ असे भले लोक आम्हां-पाशीं पाठविणें, म्हणून तुम्हांला बहुतां रीतीं लेहून पाठविलें. त्यावरून सदरहू भले लोक आम्हांपाशीं पाठवून दिले. त्या भल्या लोकांशीं बहुत रीतीं घरोबियाचा व्यवहार सांगून, आमचा अर्धा वांटा आम्हांस बऱ्या

---

* शहाजी

बोलें द्या, म्हणून सांगून पाठविलें. व त्या बराबरी राजश्री बाळंभट गोसावी राजश्री कृष्ण ज्योतिषी, व कृष्णाजी शेखजी असे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हांजवळीं जाऊन बहुतां रीतीं बोलले कीं, गृहकलह करूं नये. आपला अर्धा वाटा मागतात तो द्यावा. असें बोललें. परंतु कपटबुद्धि तुम्हीं ऐसी मनीं धरिली कीं, या समयांत आम्हीं थोर राजे जालों आहों. आम्हांसी आपण खांसा भेटीस येऊन आम्हां जवळ नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपण च खादलें. पुढें ही आपण च सारें राज्य खावें, अशी बुद्धि मनीं धरून, वाटियाचा निवाडियाचा तह न करितां आपण खांसा च आमचे भेटीस आले. यास आमची व तुमची भेट जाहली. त्याउपरी आम्हीं बहुतां रीती तुम्हासी बोलिलों, कीं आमचा अर्धा वाटा द्या. परंतु तुम्हीं वाटां द्यावा हा विचार मनीं धराचना. मग जरूर जाहलें, कीं तुम्ही धाकटे भाऊ, आपण होऊन आमचे भेटीस आल्यास तुम्हांला धरावें आणि मागावा, ही गोष्ट थोरपणाचे इजतींमध्यें लायख नव्हे. यानिमित्त तुम्हाला चंजाउरास जाण्याचा निरोप दिला. तुम्ही चंजाउरास गेलेती. त्याउपरी गृहकलह वाढवूं नये, वाढविल्यानें पहिले युगीं पांडव कौरव बहुत कष्टी जाले, ते सारी भारताची कथा मनांत आणून, गृहकलह वाढविलिशां उभय पक्षीं कष्टी होईजे, ऐसें मनांत जाणून, राजश्री शामजी नाईक व राजश्री कोन्हेरीपंत व शिवाजी शंकर यां हातीं मागतें बहुतां रीतीं सांगून पाठविलें, कीं तुम्ही व आम्हीं वाटे करून घेऊं; परस्परें समाधानें राहूं. परंतु तुम्हीं दुर्योधनासारखी दुष्ट बुद्धि धरून संधि न करावा, युद्ध करावें, ऐसें च मनीं धरिलें. ऐशियास आम्हांला रायगड प्रांतें बहुत कांहीं कार्य होतें. यानिमित्तें चिरंजिव संताजी भोसले, राजश्री रघुनाथपंत व राजश्री हंबीरराव असे ते प्रांतीं ठेऊन आम्ही स्वार होऊन तोरगळ प्रांतास आलों. येथें अशी खबर ऐकिली कीं तुम्हीं तुरुक लोकांच्या बुद्धीस लागून, आमचे लोकांशीं झगडा करावा, ऐसें मनीं धरून, आपली सारी जमेत एकवट करून, आमचे लोकावर पाठवून दिलेती. ते वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालून आल्यावर, तुमचे आमचे लोकांत थोर झगडा जाला. तुमचे

लोक पराजय पावले. प्रतापजी राजे,व भिकाजी राजे व शिवाजी डबीर ऐसे तिघे धरिले, व कितीएक लोक मारिले, कितीएक लोक पळून दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार ऐकिला. हें ऐकून बहुत नवल ऐसें वाटलें कीं कैलासवासी महाराज, त्यांचे तुम्ही पुत्र, बहुत थोर लोक, ऐसें असून कांहीं विचार करीत नाहीं, व धर्माधर्म विचारीत नाहीं. ऐसें असतां कष्टी व्हाल याचें नवल काय ? तुम्ही म्हणाल कीं, कैसा विचार करावा ? तरी ऐसा विचार करावा होता कीं, अधर्मे करून तेरा वर्षे आपण सारें राज्य खादलें तें खादलें; आतां अर्धा वांटा मागतात, तो त्यांचा त्यांला द्यावा, आणि आपण सुखी राहावें. ऐसा विचार करावा होता. दुसरा विचार करावा होता, कीं श्रीदेवाची व श्रीची कृपा त्यांवरी पूर्ण जाली आहे. दुष्ट तुरुकांला ते मारितात. आपल्या सैन्यांत तुरुक लोकच असतां जय कैसा होतो, आणि तुरुक लोक कैसें वाचूं पाहतात. हा विचार करावा होता; आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुद्धि करून युद्ध केले आणि लोक मारविलें तें जाहलें. पुढें तरी हट्ट न करणें. तेरा वर्षे तुम्हीं सारें राज्य खादलें तें खादले. याउपरी कित्येक प्रांत आमचे आम्हीं घेतले असेत. अरमी, बंगरुळ, कोलार, हसकोट, शिराळकोट व किरकोळ जागे व चंजाऊर असे जे जागे तुमचे हातीं उरले आहेती, ते आमचे लोकांचें हाती देणें; आणि जमेत, पैका व जडाव व हत्ती व घोडे यांचा अर्धा वांटा देणें. ऐसा विचार करून आम्हांशीं संधि करणें तुम्हीं, ऐसा निर्मलपणें संधि केलिया, आम्ही आपणापासून तुंगभद्रेअल्याड पन्हाळ प्रांतें तीन लक्ष होनाची दौलत देऊं. अथवा आम्हां जवळील दौलत तुम्हांला मानेना तरी कुतुबशाहास अर्ज करून त्यापासुन तुम्हांस तीन लक्षांची दौलत देऊं.असे दोनही विचार तुम्हांस लिहिले आहेती. यां दोनहीमधील एक मनीं धरून मान्य करावें.दहाचें हातीं न देणें.आपल्या आपल्यांत आपण कलह करावा आणि कष्टी व्हावें यांत कांहीं प्रयोजन नाहीं. याउपरी तरी आमचा आपला संधि व्हावा ऐशी बुद्धि मनीं धरून वांटियाचा व्यवहार निर्गमून टाकणें, आणि सुखीं राहणें. गृहकलह बरा नव्हे. आम्हीं रीतीनें वडीलपणें आजवरी तुम्हांला सांगितलें, आतांही सांगतो.

ऐकाल तरी बरें. तुम्ही सुख पावाल. न ऐकाल तरी तुम्हीच कष्टी व्हाल. आमचें काय चालते ? बहूत काय लिहिणे. " ( मोर्तब )

[ इतिहाससंग्रह. तंजा. राजघराणे. पृ. ३६ ]

---

# उत्तर वयांत वैराग्य धरावें



श्री.

" श्रियासह चिरंजीव अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री महाराज व्यंकोजी राजे प्रती राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन करणें विशेष:—कित्येक दिवस जाले, तुमचें पत्र येत नाहीं. याकरितां समाधान वाटत नाही. सांप्रत राजश्री रघुनाथपंतीं लिहिलें कीं तुम्ही आपले ठायी उदासवृत्ति धरून पाहिले सारखे आपले शरीर संरक्षण करीत नाहीं. सणवार उत्सवादिक हें ही कांहीं करीत नाहीं.सेना बहुत आहे.परंतु उद्योग करून कार्यप्रयोजन करवावें हें ही कांहीं करीत नाहीं. वैराग्य धारिलें आहे. एखादे तीर्थाचे ठायी बसून कालक्रमणा करूं, ऐशा गोष्टी सांगतां म्हणोन विस्तारें लिहिलें होतें. तरी या गोष्टी आम्हांस बहुत अपूर्व वाटल्या कीं, कैलासवासी स्वामींनी कसे कसे प्रसंग पडले ते निर्वाह करून, यवनांच्या सेवा करून, आपल्या पुरुषार्थे बाजी संवारून, उत्कर्ष करून घेतला. शेवट बरा निर्वाह केला. तें सर्व तुम्हीं जाणतां. त्यांच्या साह्यतेस त्यांच्या बुद्धि—युक्ति सर्व ही तुम्हांस उपतिष्ठोन त्यापासून शहाणे जाले आहां. त्याउपरी आम्हीं ही जे जे प्रसंग पडले, तें निर्वाह करून कोणे तऱ्हेनें राज्य मिळविलें, हे जाणतां व देखत आहां. असें असोन तुम्हांला असा कोणता प्रसंग पडला जे इतक्याच्याचमध्यें आपल्या संसाराची कृतकृत्यता मानून, नसतें वैराग्य मनावरी आणून, कार्यप्रयोजनाचा उद्योग सोडोन, लोकांहातीं रिकामेपणीं द्रव्य लाऊन, नाश

करवणें व आपल्या शरीराची उपेक्षा करणें: हें कोण शहाणपण व कोणती नीति ? व आम्ही तुम्हांस वडील मस्तकीं असतां चिंता कोणे गोष्टीची आहे ? याउपरी सहसा वैराग्य न धरितां मनांतून विषण्णता ( काढून ) कालक्रमणा करित जाणें. मणवार, उत्साह पूर्ववत करीत जाऊन तुम्हीं आपलें शरीरसंरक्षण बरें करीत जाणें. जेमती सेवक लोकांनां रिकामे न ठेऊन, कार्यप्रयोजनाचा उद्योग करून, त्यांपासून सेवा करून, पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. तुम्ही त्या प्रांतें पुरुषार्थ करून मनोषरूप अमलिया, आम्हांस समाधान व श्लाघ्य आहे कीं कनिष्ट बंधु असे पुरुषार्थी आहेती. रा॥ रघुनाथ पंडित त्या प्रांतीं आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आपले पुरातन. तुम्हांसीं कोणे रीतीनें वर्तावें हें निपुण जाणतात. आम्हांस मानितात तैसें तुम्हांस मानितात. आम्हीं त्यांचे ठायीं विश्वास ठेविला आहे. तैसा विश्वास तुम्ही ही ठेवून, कार्यप्रयोजनास परस्पर अनकूल व साह्य होऊन वर्तत जाणें. पुरुषार्थ व कीर्ति अर्जणे. रिकामे बैसोन, लोकांहाती नाचीज खाववून काल व्यर्थ न गमावणें. कार्यप्रयोजनाचे दिवस हे आहेती. वैराग्य उत्तरवयीं कराल तें थोडे. आज उद्योग करून आम्हांस ही तमासे दाखविणें. बहुत काय लिहिणें. तुम्ही सुज्ञ असा. '' ( मोर्तब. मर्यादेयं विराजते. )

[ इतिहाससंग्रह—तंजावरचें राजघराणें. पृ. ४२ ]

---

# जिजियापट्टीच्या निषेधार्थ औरंगजेबास पत्र



अकबरानें बंद केलेली जिजियापट्टी औरंगजेबानें पुनः सुरू केली याबद्दल औरंगजेबास निषेधप्रदर्शक व झणझणीत भाषेंत लिहिलेलें असे एक पत्र पाठविण्यांत आलें. या पत्राचा लेखक कोण यासंबंधीं ऑर्म, टॉड, प्रो. सरकार वगैरे ग्रंथकारांनीं मेवाडचा राणा यशवंतसिंग, उदेपूरचा राणा राज-

सिंग, शिवाजी महाराज आणि संभाजी अशीं निरनिराळीं नांवें सुचविलीं आहेत. परंतु 'सातारकर महाराजांच्या बखरींत दिलेल्या या फारशी पत्राच्या विस्तृत गोषवाऱ्यावरून हें पत्र शिवाजी महाराजांनीं लिहिलें असावें असें दिसतें. ' मआसिर-इ-अलमगिरी ' नांवाच्या फारशी ग्रंथांत दिलेल्या तारखेवरून जिजियापट्टी शके १६०१ च्या वैशाखांत सुरु केली असें ठरतें. तेव्हां त्यानंतर लौकरच हें पत्र लिहिलें गेलें असावें:—

नेकीची इच्छा करणाऱ्या, सत्यवचनी शिवाजीस ईश्वराची कृपा व पादशाहाची मेहेरबानी हे सूर्याप्रमाणें प्रसिद्ध आहे. त्याचा धन्यपणा मानून नंतर पत्र लिहितों कीं प्रालब्धयोगानें हुजुरून निरोपाशिवाय आलों परंतु. यथायोग्य आहे. सेवेसि हजर आहे. ही चांगली सेवा उत्तम प्रकारें हिंदुस्तान व इराण व तुराण व रूम व शाम येथील पादशहास व उमराव व मोंगल व राजे व राणे यास वगैरे लोकांस जाहीर आहे. त्यापेक्षा आपलें अंतःकरण समुद्राप्रमाणें आहे. त्यास हें विदितच जाहालें असेल. याजकरितां किती गोष्टी आबालवृद्धाच्या कल्याणास्तव लिहिल्या जातात. आम्ही इकडे आल्यावर पादशाई खजिना रिकामा जाहाला व सारें द्रव्य खर्च जाहालें. याजकरितां हिंदु लोकांपासून जेजिया पट्टीचें द्रव्य उत्पन्न करून पादशाईचा क्रम चालविला आहे असें ऐकण्यांत आलें. त्यास पूर्वी अकबर पादशाहा यार्णी बावन वर्षे पादशाही केली. यामुळें एकंदर हिंदु वगैरे लोकांचे धर्म चांगले चालले व ते धर्मस्थापनेविसी मदत ठेवीत होते. सबब ' जगद्गुरु ' असी त्याची कीर्ति जाहाली. व त्यास हरएक स्थळीं यश येत होतें. पुढें नुरोद्दिन ज्यांगीर पादशाहा यार्णी बेवीस वर्षे ईश्वरी लक्ष ठेऊन पादशाई केली. नंतर स्वर्गास पोहोचले. उपरांत शहाजहान साहेब किराण पादशहा यार्णी बत्तीस वर्षे पादशाहाई करून कीर्ति मिळाविली. जो पुरुष जिवंत असतां लौकिकवान व मागे ज्याची कीर्ति त्याजला अचल लक्ष्मी प्राप्त जाहाली असें आहे. तेव्हां "पादशाहा यार्णी जेजियापट्टी घेण्यास ते समर्थ होते, परंतु सारे लहान मोठे जन ईश्वराचे आहेत" असें जाणोन त्यार्णी कोणावर जुलूम केला नाहीं. याजकरितां सर्वांचे मुखीं त्यांची स्तुति आहे. ज्याची जसी नेत तसी त्यास

बरकत. त्या पादशाहायाची दृष्ट प्रजेचे कल्याणावर होती. व आपले कारकीर्दीस कितीएक किले व मुलूख गेले. बाकी राहिले ते हि जातात. रयत लोक खराब आहेत. व सौदागर पुकारा करितात कीं हरएक माहालचें उत्पन्न लाखास एक हजार येणें कठिण जाहलें आहे. पादशाहाचे घरीं दरिद्राचा वास जाहला. तेव्हां पदरचे मंडळीची अवस्था कळतच आहे कीं कितिएक लोकांस पोटास मिळत नाहीं. त्याजवर जेजियापटी म्हणोन हिंदुलोकांवर आपण कर बसाविला. तो मुलगा जाहला म्हणजे दहा रुपये व मुलगी जाहली म्हणजे पांच रुपये असा चक्र बसाविला. या प्रकारचे करण्यांतच पुरुषार्थ पादशाहा समजतात. व तैमूर पादशाहाचें नांव बुडवितात असें जाहलें आहे. व कुराणांत ईश्वर जगाचा व मुसलमानाचाच आहे येविसी वाईट अगर चांगलें हे दोनी ईश्वरानें निर्माण केलें आहे हे रद करून महेजतीत यवन लोक बांग देतात व देवालयांत हिंदुलोक घंटा वाजवितात. याजकरितां कोणाचे धर्मावर दोष ठेविल्यास ईश्वरानें लिहिलें तें रद्द केल्यासारिखें होतें. न्यायाचे मार्गानें जेजियापट्टीचा कायदा केवळ गैर. ज्यावर जुलूम जाहाला, त्याणें खेद करोन “ हाय, हाय ” म्हणोन मुखानें धूर काढिल्यास त्या धुरानें जितके लौकर जळेल तितके अग्नी जलदीनें जळतां इसबदास ( ? ) जाळणार नाहीं, ऐसें आहे. याजवर हिंदु लोकास पीडा करण्यांतच धर्म आहे असं मनांत आले असल्यास राजा राजसिंग याजपासून जेजियापट्टी अगोधर घ्यावी. मग इकडून देण्यास कठीण नाहीं. परंतु गरीब मुंग्या चिलटा सारखे आहेत. त्यास उपद्रव करण्यांत मोठेपणा नाहीं. पदरचीं मंडळी अग्नी गवतानें झाकितात हें आश्चर्य वाटतें. राज्याचा सूर्य प्रतापाचा उदयचळापासून तेजस्वी असो. *

[ वार्षिक इतिवृत्त शके १८३७ पृ.१६६

---

* बखरींतून घेतलेला हा उतारा व टॉड किंवा सरकार यानीं इंग्रजींत दिलेलीं अवतरणें यांत नांवासंबंधींच्या एक दोन ठिकाणाव्यतिरिक्त कोठें हि फरक नाहीं.

# महाराष्ट्रवर्णन



अदमास अडीचशे वर्षांपूर्वी वेंकटाध्वरि नांवाच्या कर्नाटकी पंडितानें 'विश्वगुणादर्शचंपू' नांवाच्या संस्कृत ग्रंथांत तत्कालीक लोकस्थितीचें विहंगमदृष्ट्या वर्णन केलें आहे. त्यांत प्रत्येक प्रश्नांची अनुकूल बाजू विश्व-वसु नांवाच्या गंधर्वानें व प्रतिकूल बाजू कृशानूनें वर्णन केली असून यांच्या संभाषणांत गुजराथ, महाराष्ट्र, आंध्र व कर्नाटक या देशांचें व तेथील लोकांचे गुणदोषवर्णन मार्मिक रीतीनें आणलेलें आहे. महाराष्ट्रांतील लोक-स्थिती सांगतांना तेथील ब्राह्मण वैदिकधर्म व वेदाध्ययन या विषयीं उदा-सीन असून फार्शी, उर्दू वगैरे यावनी भाषा शिकतात; यवनांची सेवा कर-तात, खोटे जमाखर्च लिहितात व थोड्या विद्येवर पांडित्याचा आव घालितात; त्याचप्रमाणें इतर जाती म्हणजे मराठे ठिकठिकाणीं हिंडून लुटालूट करतात वगैरे दोष दाखविले आहेत पण विश्वावसूनें ' हे दोष अंशतः खरे आहेत असें मान्य केलें तरी त्यांच्यातहि अन्तर्मुख दृष्टीचे व धर्मबुद्धीचे ब्राह्मण आहेत व मराठ्यांनीं पराक्रम गाजविला नसता तर ब्राह्मण व हिंदुधर्म यांचा भरतखंडांतून उच्छेद झाला असता हें लक्षांत आणून त्यांच्या दोषा-वर पांघरूण घालणेंच योग्य आहे ' असें म्हटलें आहे.

**विश्वावसुः—**

महाराष्ट्राभिख्यो मधुरजलसांद्रो निरुपमः ।
प्रकाशो देशोऽयं सुरपुरनिकाशो[1] विजयते ॥
गृहस्था यत्रामी गुणजलधयः केऽपि विभवैः ।
समृद्धःश्रद्धातो मुहुरतिथिपूजां विदधते ॥

**कृशानुः—**

अपारैर्व्यापारैरहरहिह नयन्तो दशदिशा ।
स्वथस्नाताः संध्यां विदधति न जातु स्वसमये ॥

---

१ स्वर्गासारखा

त्यजन्तः स्वां वृत्तिं द्विजकुलभवा ग्रामगणकी ।
भवंतो हंताऽमी कथमपि च जीवंति बहवः ॥
उपनयनविवाहावुत्सवैकप्रधानौ ।
कलिविभवत एषां कालभेदानभिज्ञौ ।
विजहाति न कदाचिद्वेदपाठैकयोग्ये ।
वयसि च यवनानीवाचनाभ्यासमेते ॥
अज्ञानामविरामलौकिकवचो भाजाममीषां पुनः ।
मन्त्रोच्चारण एव पर्यवासितं मौनव्रतं कर्मसु ॥
ग्रामायव्ययलेखनेन नयतां कालानशेषानहो ।
पारंपर्यत ईदृशामिहनृणां ब्राह्मण्यमन्यादृशम् ॥
कुक्षेः पूर्त्यै यवननृपतेर्भृत्यकृत्यानि कर्तुम् ।
विक्रीणीते वपुरपि निजं वेतनैरेतदास्ताम् ।
विप्रो भूत्वाप्यहह गणनानैपुणैर्वंचयित्वा ।
स्वर्णस्तेयं रचयति पुनः स्वामिनां पोषकानाम् ॥
वेदव्यासः स इह दश यो वेद वेदाक्षराणि ।
श्लोकं त्वेकं परिपठति यः स स्वयं जीव एव ।
आपस्तंबः स किल कलयेत्सम्यगौपासनं यः ।
कष्टं शिष्टक्षतिकृतिकलौ कार्श्यमृच्छंति विद्याः ॥

विस्वावसुः—किं अरे भूसुरेषु एवं दोषमुद्घोषयासि ।
अत्रापि सांति बहवः कलिताग्निहोत्राः
शास्त्रार्थबोधकुशलाः किल शांतिमन्तः ॥

---

२ कुलकर्णकी व जमाखर्ची कारकुनीचा धंदा ३ लग्नें व मुंजी केवळ उत्सावाच्या दृष्टीनें व केव्हां तरी उरकून घेतात ४ वेदाध्ययनाच्या वयांत-यावनी लिपी व भाषा पढविण्यांत गर्क असतात ५ पोट भरण्या साठी यवनरा-जाची नोकरी करतो ६ वेदाची दहा अक्षरें येणाऱ्याला हे लोक व्यासाचा अवतार समजतात ७ बृहस्पति ८ अग्नीची उपासना ९ शिष्टांची हानी करणारा आचार १० ब्राह्मणांत

अन्तर्मुखाः सततमात्मविदो महान्तो ।
निर्धूतबाह्यविषया निगमोध्वनिष्ठाः ।
शुचिर्भूताः स्नानैः श्रुतिहितपुराणोक्तनियमात् ।
अपूतानां स्पर्शानवहितहृदोऽमी विजहतः ।
सुराभ्यर्चां कृत्वा शुचिकृतमदन्त्यन्नमनघम् ।
महाराष्ट्रे देशे विलसति महानेष हि गुणः ॥
चमूनेर्यमनेन वा जनपदाधिकारेण वा ।
द्विजव्रजउपव्रजन् प्रभुपदं महाराष्ट्रजः ।
न वृत्तिमिह पालयेद्यदि धरासुराणां ततो ।
यवनवेष्टितं भुवनमेतदब्राह्मणम् ॥

कृशानुः— अस्त्वेवमथाप्यत्रत्यानां आद्येतरवर्णानां पुनरतिदुः-
सहं चेष्टितं पश्य ।
देशेदेशे लंपटाः पर्यटन्तो भंजभंजं ब्राह्मणादीनशेषान् ।
हारं हारं हन्त सर्वस्वमेषां पापा एते स्वोदरं पूरयन्ति ॥

विश्वावसुः-सत्यमेवं तथापि एतेषां चेष्टितं सहनीयम् । तथाहि ।
मायाचुंचुतया भयावहगतिः प्रत्यर्थिपृथ्वीभुजाम् ।
माहाराष्ट्रभटच्छटा रणपटुर्नोपर्यटत्येव चेत् ।
देवब्राह्मणवर्गनिग्रहकृतो देशांस्तुरुष्का इमे ।
निष्प्रत्यूह मनोरथा वितनुयुर्निर्देवभूमीसुरान् ।
देवक्षोणीसुराहितकृते दारितम्लेच्छपक्षैः ।

---

११ वेदमार्गांत गढलेले १२ देवांस नैवेद्य दाखवून १३ सेनाधिपत्य व सरकारी अधिकार संपादन करून ब्राह्मणानीं ब्राह्मण्यांचें संरक्षण न केलें तर यवनांच्या कचाटींत सापडून हें जग अब्राह्मण बनलें १४ आद्येतर म्हणजे मराठे वगैरे लोक देशोदेशी लुटालूट करीत फिरतात अशी कृशानु तक्रार करतो १५ गनीमीकावा १६ शत्रुपक्षाच्या १७ महाराष्ट्रवीरांचे समूह १८ निर्विघ्न १९ करतील २० ब्राह्मण २१ म्लेच्छांचा पराभव करणाऱ्या महाराष्ट्रीयांच्या चेष्टा सहन करणें अवश्य आहे

मह्यां सह्यं कथमपि महाराष्ट्रयूथस्य चेष्टा ।
व्याधिव्यूहप्रतिहतिकृतां व्यक्तमुग्रौषधानाम् ।
कायारोग्य प्रणयिहृदयैः काटवं मर्षणीयम् ।

---

# समर्थांचीं ओवीबद्ध पत्रें



श्रीसमर्थांनीं शिवरायास पाठविलेल्या पत्रांतून पुढें दिलेल्या ओव्या निवडल्या आहेत.

निश्चयाचा महामेरू । बहुत जनासी आधारू । अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥ १ ॥ नरपती हयपती । गजपती गडपती । पुरंदर आणि शक्ति । पृष्ठभागी ॥ २ ॥यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत । पुण्यवंत आणि जयवंत । जाणता राजा ॥ ३ ॥ तीर्थक्षेत्रें मोडिली । ब्राह्मणस्थानें बिघडली । सकळ तीर्थे आंदोळली । धर्म गेला ॥ ४ ॥ देवधर्मगोब्राह्मण । करावयासी रक्षण । हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥ ५ ॥ या भूमंडळाचे ठाईं । धर्म रक्षी ऐसा नाहीं । महाराष्ट्रधर्म उरला कांहीं । तुम्हां कारणे ॥ ६ ॥ कित्येक दुष्टांसी संहारिलें । कित्येकासी धाक सुटले । कित्येकांसी आश्रय जाले । शिवकल्याण राजा ॥ ७ ॥ तुमचे देशीं वास्तव्य केलें । परंतु समाचार नाहीं घेतले । ऋणानुबंधें विस्मरण जालें । काय नेणूं॥८॥

शिवाजी महाराजांच्या अंतकाल जवळ आलेला पाहून आनंदवनभुवनांत म्हणजे महाराष्ट्रांत महाराजांनीं कोणती कामागिरी केली याचें स्मरण करतांचां श्रीसमर्थ म्हणतात:--

---

२२ रोगांचा नाश करणाऱ्या औषधाचा कडूपणा आरोग्यासाठी सोसावा लागतो.

बुडाले सर्व हि पापी । हिंदुस्थान बळावलें । अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभूवनीं ॥ १ ॥भीमची धाडिला देवें । वैभवें धाव घेतली । लांगूळ चाललें पूढें । आनंदवनभूवनीं ॥ २ ॥ येथून वाढला धर्मू । रमाधर्म समागमें । संतोष मांडला मोठा । आनंदवनभूवनीं ॥ ३॥ बुडाला अवरग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला । मोडली मांडली छेत्रे । आनंद० ॥ ४ ॥ बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळ पातकी । ताडिले पाडिलें देवे । आनंद० ॥ ५ ॥ गळाले पळाले गेले । जाले देशधडी पुढें । निर्मळ जाहली पृथ्वी । आनंद० ॥ ६ ॥ बंड पाषांड ऊडाले । शुद्ध अध्यात्म वाढलें । रामकर्ता रामभोक्ता । आनदवनभूवनीं ॥ ७ ॥

---

छत्रपती संभाजी यांना समर्थांनीं पाठविलेल्या पत्रांत या ओव्या आहेत:—

अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें । तजवीज करीत बसावें । एकात स्थळीं ॥ १ ॥ कांहीं उग्र स्थिति सोडावी । कांहीं सौम्यता धरावी । चिंता परार्ची लागावी । अंतर्यामीं ॥ २ ॥ मागील अपराध क्षमा करावे । कारभारी हातीं धरावे । सुखी करून सोडावे कामाकडे ॥ ३ ॥ पाणवठी तुंब निघेना । तरी मग पाणी चालेना । तैसें जनाच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४ ॥ जनाचा प्रवाह चालिला । म्हणजे कार्यभाग आटोपला । जन ठाई ठाई तुंबला । म्हणिजे तें खोटें ॥५॥ श्रेष्ठीं जें जें मेळाविलें । त्यासाठीं भांडत बैसलें । तरी मग जाणावें फावलें । गलीमासी ॥ ६ ॥ ऐसे सहसा करूं नये । दोघे भांडितां तिसऱ्यासी जाये । धीर धरुनि महत्कार्य । समजूनि करावें ॥ ७ ॥ आधी च पडलो धास्ती । मग कार्यभाग होय नास्ती । याकारणें समस्तीं । बुद्धि शोधावी ॥ ८ ॥ राजी राखतां जग । मग कार्यभागाची लगबग । ऐसें जाणोनियां सांग । समाधान राखावें॥९॥ सकळ लोक एक करावे । गलीम निवटूनि काढावें । येणें करितां कीर्ति धावें । दिगंतरीं ॥१०॥ आधीं गाजवावें तडाके । तरी मग भूमंडळ धाके । ऐसें न करितां धक्के राज्यास होती ॥ ११ ॥ समय प्रसंग

ओळखावा । राग निपटुनि काढावा । आला तरी कळों न द्यावा । जगामाजीं ॥ १२ ॥ राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊनि करावे सेवक । लोकांचे मना मध्यें धाक । उपजों चि नयें ॥ १३ ॥ बहुत लोक मेळवावे । एकविचारें भरावे। कष्ट करोनि घसरावें । म्लेंच्छावरी ॥ १४ ॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आधीक मेळवावें । महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १५ ॥ लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तरवार करावी ।चढती वाढती पदवी । पावाल येणें ॥ १६ ॥ शिवराजास आठवावें । जीवित तृणवत् मानावें । इहलोकीं परलोकीं रहावें । कीर्तिरूपें ॥ १७ ॥ शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप ।शिवरायाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं ॥१८॥ शिवरायाचें कैसें बोलणें । शिवरायाचे कैसें चालणें । शिवरायाची सलगी देणें कैसीं असे ॥ १९ ॥ सकळ सुखाचा केला त्याग । करूनि साधिजे तो योग । राज्यसाधनाची लगबग । कैसी केली ॥ २० ॥ त्याहुनि करावें विशेष । तरी च म्हणवावें पुरुष । याउपरी आतां विशेष । काय लिहावें ॥ २१ ॥

---

# बाटलेल्या ब्राह्मणाची प्रायश्चित्त-शुद्धि



[ खं. ८ ले. ४० ] श्रीमहालक्ष्म्यै नमः [ १६०८ चैत्र शु. २ ]

॥ श्रीसकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री देशमुख देशपांडे व ज्योतिषी व उपाध्ये व समस्त वेदमूर्ती वस्ती कसबे हरसूल प्रांत अवरंगाबाद व समस्त महाराष्ट्र कोंकण देशस्थ विद्वद्वैदिक गृहस्थ गासावी यांसीः—

पौष्य उपाध्ये व मोरेश्वर पंडितराव आशीर्वाद अनुक्रमें नमस्कार.

उपरि. गंगाधर रंगनाथ कुळकरणी कसबे हरसूल हा ब्राह्मण मोंगलापासी सेवेसी होता. कित्येक दिवस चाकरी करीत असतां मोंगलीं यावरी बलात्कार करून बाटविला. भ्रष्ट करून यास तीन महिने बंदखानीं निर्बंध ठेविला होता. तेथें यवनासी अन्नोदकसंसर्ग घडला. त्यानंतर यास भाग्य अडीच सद्दी मनसब देऊन चाकर करून ठेविला. पांच वर्षें चाकरी करीत होता. स्नानसंध्यादिक कर्में करितां न ये यास्तव राहिले. पांचा वर्षांत अन्नोदक संसर्ग केला नाहीं. दौलत करीत असतां भाग्याचें सुख टाकून, अंतःकरणीं अनुताप मानून आपले जातींत यावें यास्तव दौलत संपत्ती सर्व टाकून, अनुतापास्तव राजश्री छत्रपती स्वामीपाशी रायगडास येऊन एक वर्ष गंगाधर रंगनाथ " दरबारीं आपणास प्रायश्चित्त द्या " म्हणऊन सरकार-कून व न्यायाधीश व उपाध्ये व दानाध्यक्ष व भलेभले व ब्राह्मण व समस्त आपले ज्ञातीस शरण येऊन प्रायश्चित्त मागत होता. त्याउपरि राजश्री समस्त-राजकार्यधुरंधर वर्णाश्रमधर्मप्रतिपालक राजश्री छंदोगामात्य स्वामी यास सर्व वर्तमान विदित जालें. त्यानंतर त्यांहीं ब्राह्मणाचे कष्ट व अनुताप बहुत देखोनी राजश्री छत्रपती स्वामीस याचा वृत्तांत विदित केला. छत्रपती कृपाळु होऊन प्रायश्चित्त द्यावयासी आज्ञा दिल्ही. त्याउपरि आम्हीं राजश्री छंदो-गामात्य यांचे सभेसीं समस्त विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे संमतीनें मिताक्षरादि निबंध पाहोन. प्रायश्चित्त निर्वाह करून गंगाधर रंगनाथ यासी प्रायश्चित्त संकल्प सांगोन श्र्यांबेस पाठविला. तेथें श्रीगिरिप्रदक्षिणा तीनशे साठी व यात्रा दोनी इतुकें चतुर्विंशत्यब्द प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगसहित केलें. यथाशास्त्र प्रायश्चित्त विध्युक्त प्रकारें केलें......त्यावरून आम्हीं आपले पंक्तीस भोजन देऊन यासी शुद्धिपत्र दिलें. हा ब्राह्मण शुद्ध जाला, संव्यवहार्य जाहाला. याउपरि यासी तुम्ही अन्नोदकादि व्यवहार यथापूर्व करीत जाणें. जो कोणी याचा ब्राह्मण्याविषयीं संदेह मानील तो देवब्राह्मण द्रोही, महापातकी जाणिजे. शके १६०८ सोळा शतें आठ क्षय संवत्सर चैत्र शुद्ध द्वितीया भौमवार हे विज्ञापि. * मोर्तब.

---

* याखाली मोरेश्वर पंडितराय, कविकलश, वैदिक व प्रल्हाद निराजी वगैरे पंचविस सह्या आहेत

## ११५

# संभाजीची योग्यता



शिवाजीचाच मुलगा पडल्यामुळें शिवाजीच्या कर्तृत्वांशीं संभाजीची तुलना केली जाते. दोघे हि पुरुष संनिकट आल्यामुळें एक अतिशय उच्च तर त्याचे विरोधानें दुसरा अतिशय नीच समजला जातो. शिवाजी लोकोत्तर पुरुष होऊन गेला, त्याचे हातून राज्यसंपादन झालें, तेव्हां अर्थात त्यास देवाप्रमाणें मान मिळूं लागला. ह्या प्रकारांशीं संभाजीच्या आचरणाचा विरोध स्पष्ट होऊन व्यसनामध्यें, पराक्रमशून्यतेमध्यें, व इतर हरएक दुर्गुणामध्यें संभाजी जितका दिसतो तितका हीन खचित नाहीं. चांगुलपणांत तो लोकोत्तर नव्हता तसा हीनपणांतही तो लोकोत्तर नव्हता. त्याच्या ठिकाणीं असाधारण असें कांहीं नव्हतें. त्याचीं व्यसनें त्याच्या जबाबदारीच्या मानानें किती हि निंद्य दिसलीं, तरी तत्कालीन परिस्थितीच्या मानानें तीं असामान्य नव्हतीं. म्हणून शिवाजीस ह्या टोकास तर संभाजीस त्याच्या विरुद्ध टोकास उभें करणें वाजवी नाहीं. संभाजीच्या नाशाचीं मुख्य कारणें दोन आहत, एक नव्हे. केवळ त्याच्या अंगच्या व्यसनामुळें अगर दुर्गुणामुळें एवढें मोठें अरिष्ट राष्ट्रावर आले असें नाहीं. दुसरें एक जबरदस्त कारण आहे, तिकडे सहसा कोणाचें लक्ष जात नाहीं. प्रतापी मोगल बादशाहीच्या अखिल व प्रचंड शक्तीशीं संभाजीला निःसहाय झगडावें लागलें; तसें शिवाजीस लागलें नाहीं. संभाजीच्या सारखीं संकटे शिवाजीवर येतीं, तर त्याची हि त्रेधा उडाल्यावाचून राहतीना. मात्र कांहीं तरी युक्ति योजून तशीं संकटें शिवाजी स्वतःवर एकदम येऊ देत नसे. आणि संभाजीस तर कावा असा मुळींच माहीत नव्हता. शिवाजी विजापूरकराशीं लढला. तर संभाजीनें प्रत्यक्ष औरंगजेबाशीं मोठ्या जोरानें टक्कर मारिली; आणि अनेकवार त्या बलवान बादशहास त्यानें सतावून अगदी हताश केलें. यामुळेंच मरणाचे पूर्वी मोगलांच्या भीतीनें तो संगमेश्वरी जाऊन लपला असेल हें संभवत नाहीं. सारांश आज राजपुरास तर उद्या

भडोचेस, आज हबसाणांत तर उद्या फोंड्यावर असा जो एकसारखा विजेसारखा चमकत होता, ज्यानें अनेक मुलूख मारून मोगल बादशहास जर्जर केलें, गंगेच्या तीरीं सहा हजार विश्वास-घातकी लोकांचा मोठ्या शिताफीनें समाचार घेतला, ज्यानें वाघाप्रमाणें शत्रूवर उडी घालण्यास कधीं हि जिवाची पर्वा केली नाहीं, त्यास औरंगजेबासारख्या बलिष्ट बादशाहानें व्यसनाधीनतेच्या वन्य अवस्थेंत विश्वासघातानें पकडलें आणि नीचतेनें त्याचा शिरच्छेद केला म्हणून आम्ही तज्जातीयांनीं हि संभाजीचा तिरस्कारच केला पाहिजे असें नाहीं. वर सांगितलेल्या कर्तबगारीबद्दल थोडाबहुत सन्मानाचा अंश त्यास आपणाकडून मिळणें रास्त आहे. निदान संभाजी विषयी नालस्ती पुराव्याशिवाय आपण खरी मानली नाहीं म्हणजे पुष्कळ झालें. कारण संशयाचा फायदा आरोपितास देणें हें निःपक्षपाताचें मर्म होय.

[ सरदेसाईकृत मराठी रियासत, भाग २ पृ. ६०२ ]

---

# मालवण सिंधुदुर्गची हकीकत व ब्राह्मणाचा निर्धार



सिंधुदुर्ग किल्ल्याच्या उपाध्येपणाचा तंटा लागल्या वेळीं दादंभटानें मागली हकीकत सांगितली ती अशी [ काव्येतिहाससंग्रह; पत्रें, यादी वगैरे लेखांक ४२१ ]:—

महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामी[1] यांणीं राज्य आक्रमण करीत असतां कुडाळ प्रांतास जमाव पाठवून कांहीं मुलूख कबदस्त करीत केवळ प्रांत मजकुरी होतीं. ते समयीं महाराज राजश्री बसनुरे[2] प्रांतीं मोहिम करा-

---

१ शिवाजी महाराज २ शके १५८६

वया निमित्त आरमाराच्या जमावानिशीं मौजे मजकूर एथे आले. त्याउपर दर्यामध्यें बेट मौजे मजकूर एथे आले. नजीक दृष्टीस पडलें तेव्हां 'या बेटाचें नांव काय ' म्हणून पुसिलें. त्यावर कृष्ण सांवत देसाई व भानजी प्रभुदेसाई प्रांत मजकूर यांणीं सांगितलें कीं 'या बेटाचें नांव कुरटे.' त्यावरी राजश्री स्वामी बेटावरी येऊन जागा पाहिला तें स्थळ उत्तम, विस्तीर्ण, आटोपसारखें दिसलें. त्याउपरी राजश्री स्वामींनीं आज्ञा केली कीं या जागीं बिलंद किल्ला बांधून वसवावा. म्हणून आज्ञा करून किल्ला बांधावयास हुकूम केला. आणि आरमाराच्या जमावानिशीं राजश्री स्वामींनीं बसनुरावरी मोहीम केली. जंजिरा बांधावयास राजश्री स्वामींनीं मुहूर्त करिते समयीं पंडितराव व उपाध्ये ज्योतिषी होते, तथापि आज्ञा केली कीं ' पेस्तर संपूर्ण प्रांत हस्तगत करणें आहे. हें कृत्य होतच आहे. ऐशियास गांवीचा उपाध्या असावा. ' म्हणून अपणास व आपला मामा जानभट अभ्यंकर उपाध्ये मौजे मजकूर असे दाखल्यास धरून आणून छ. १४ जमादिलावल मन खंमस मितैन मार्गशीर्ष बहुल २ ते दिवशीं किल्ला बांधण्यास मुहूर्त करून चिरा भूमीमध्यें बसविला; आणि सिंधुदुर्ग असें नांव ठेवलें. आणि आपणास व आपला मामा जानभट यांस राजश्री स्वामींनीं सांगितलें कीं ' तुम्ही ब्राह्मण या जागीं सुखरूप राहणें. कांहीं शंका मनामध्यें न धरणें. प्रांत मजकूर हस्तगत जाहालाच आहे. कांहीं किंचित अद्दलशाई—कुडाळापासून मामले फोंड्यापर्यंत—ठाणीं आहेत, तीं दहशत खाऊन जातील. ' महाराज राजश्री स्वामींचें राज्य प्रबळ होत आहे चिंता न करणें, ह्मणून अभय देऊन सांगितलें. त्या उपर आम्हीं येथें राहिलों. पळून जावें तर यत्न नाहीं. त्यावर आपला मामा जानभट यांणीं आपणास सांगितलें कीं ' तूं म्हणजे एका पायानें क्षीर्ण आहेस. तुझे वस्तु दूर कोठें जावते येवते असा अर्थ नाहीं. येथें राहणें. जंजिराचे उपाध्येपण चालवणें. जो उपाय होईल त्यावर आपला योगक्षेम करणें म्हणून सांगितलें. त्या गोष्टीस आपण मान्य होऊन या स्थलीं राहिलों.आपला मामा जानभट मालवणीं जाऊन राहिला.

---

३ मौजे मालवण ४ लंगडा ५ तुझ्या हातून

महाराज राजश्री स्वामींचें राज्य प्रबळ होऊन कुडाळापासून फोंड्याकड वाडी शिवेश्वर देवाचे महाल पर्यंत ठाणीं बसविलीं. अद्लशाई ठाणीं निः-शेष निघोन गेलीं. आपल्या मनाच्या ठायीं निर्धार जाहला जे 'या उपर अद्लशाईचा प्रसंग होत नाहीं. हेंच राज्य प्रबल जाहलें.' असा निश्चय चित्ताचे ठायीं केला आणि या जागीं राहिलों.......असें असतां महाराज राजश्री संभाजी राजे तक्तारूढ जहाले. त्याउपर सहासात वर्षांनीं शाल-मताबें फौजेनिशीं प्रांत मजकुरीं आला. त्यामुळे संपूर्ण प्रांत उध्वस्त जहाला. किती एक मनुष्यें तांब्रांनीं धरून नेलीं. तांब्राच्या भयास्तव ज्यास जिकडे मार्ग जहाला तिकडे मनुष्ये निघून गेलीं. जानभट आपला मामा मालवणा-मध्ये कुटुंबसह होता, तो तांब्राच्या धामधुमीकरितां परांगदा होऊन गेले. कुडाळप्रांतीं संपूर्ण धामधुमी जहाली. त्या उपरांतिक खेमसावंत देसाई प्रांत मजकूर यांणीं महाराज राजश्री स्वामींच्या राज्याची निष्ठा सोडून तांब्राचा अवलंब धरिला; आणि तांब्राकडील फौजदार महंमद अब्बस व अबदुल राजखान यास जमावानिशीं कुडाळास आणिलें. त्यांच्या स्वाऱ्या मुलखामध्यें होत्या. एकवेळ मौजे मजकुरीं स्वारी येऊन कित्येक लुटी ना-गवा करून मनुष्यें धरून नेली. मौजे मजकूरचे देव श्रीनारायण व रामेश्वर एथें गोवध करून देवस्थानें भ्रष्ट केलीं. जंजिऱ्याच्या मनुष्यास बाहेर जावयाक-रितां मोंगलाच्या भयास्तव सावंताच्या ररस्काकरितां जागा नाहीं. कोठून दाणा गल्ला येणें तो राहिला. मनुष्यांस अन्न नाहीं. जो कोणी मूठमर्दीनें दळोंकडे जाऊन भाजीपाला आणून उदरपोषण करी तो वांचला; व किती-एक मनुष्यें जंजिराच्या लोकांची मयत जहालीं. असा प्रसंग जाहल्यावर चाकर लोकांखेरीज जांजिरे मजकुरी जे कोणी होते ते बिदनूर प्रांतीं जाऊ लागले. ते समयीं जांजिराचा मुद्राधिकार राजश्री कृष्णाजी मोहिते यांस होता. त्यांणीं व जंजिऱ्याचा तट-सरनोबत व नाईकवाडी यांणीं आपणास पुसिलें कीं 'तूं ब्राह्मण म्हणजे एका पायानें क्षीण आहेस. तुझ्या वस्तु कोठें

---

६ मोंगल ७ पळून ८ जलदुर्ग= मालवण सिंधुदुर्गच्या ९ दांडगाईनें १० लष्कराकडे

जावते असें नाहीं. जंजिरामध्यें अन्नाचें दुर्भिक्ष जहालें. त्याहीमध्यें कर्नाटकांतून वाणी उदमी उकेडे तांदूळ आणितात ते कांहीं ब्राह्मणाच्या प्रयोजनाचे नव्हत. आम्ही मराठे लोक भाजीपाला खाऊन धन्याची जागा जतन करीत आहों. आमच्या निष्ठेस फलदाता ईश्वर आहे. आम्हां चाकर लोकांस सुटका नाहीं. तू ब्राह्मण कर्नाटकास जाणार तर सुखरूप जाणें. आम्हीं निरोप देत असों. ' म्हणून आपणास सांगितलें.

त्यावर आपण उत्तर दिलें कीं ' आपण ऐथें आहां. मागें तुम्हांमध्यें राहून उपाध्येपण करून सुख भोगिलें आणि तुम्हांस कांहीं काल विलग पडल्यावर टाकून जावें ही गोष्ट ईश्वरास बरी मानवणार नाहीं व महाराज राजश्री स्वामींनीं जे समयीं सिंधुदुर्गास मुहूर्त केला ते समयीं आपल्या मामास विचारिलें कीं, येथें ब्राह्मण कोण राहतो. ते समयीं आपला मामा बोलिला कीं 'आपला भाचा दादंभट येथें राहून उपाध्येपण करील' म्हणून बोलून माहाराज स्वामींचें दृष्टीपुढें आपणास उभें केलें. आपण ते समयीं महाराजासन्मुख बोललों कीं आपण येथें राहून उपाध्येपण करीन म्हणून सांगितलें. ही गोष्ट आपल्या चित्तामध्यें आहे. ते केवळ महाराज स्वामीजवळ मी भाष्य दिल्यासारखी जाहली. त्या गोष्टीस आतां माझ्या हातून अंतर करवत नाहीं. होणार प्राक्तनाधीन आहे कोठेंहि गेलों तरी सुटणार नाहीं. असें असतां ही जागा टाकून आपण जात नाहीं. तुम्हाबरोबर जसें होईल तसें होऊ ' म्हणून बोललों. त्याउपर जंजिऱ्याचे नायकवाडी यांणीं व लोकांनीं आपलें समाधान केलें कीं, ' आम्हानिमित्य तुम्हीं म्हणून इतका निर्धार केला त्यास आम्ही जें अन्न मिळवूं त्यामध्यें तुमच्या प्रयोजनाचे सुरई तांदूळ व नाचणे जे मिळतील ते तुमच्या कुटुंबास देऊन भाजीपाला आणूं त्यांतील विभाग तुजला देऊ' म्हणुन समाधान करून सांगितलें. त्यावरून आपण राहिलों. त्यास जंजिऱ्यामध्यें पांच वर्षेपर्यंत मोठें महारण व कांडील दुःखामध्यें गडकरी यांच्या घरीं लग्न, मुहूर्त, हव्यकव्य, बरें वाईट जो प्रसंग जाहला तो संपादिला. ज्यानें आपल्या उचितानें जें दिलें

११ उकडे व सुरई असे दोन प्रकारचे तांदूळ असतात. उकडे तांदूळ भात शिजवून नंतर तयार केलेले असतात, ते ब्राह्मण खात नाहींत.

तें तिराकें घेऊन लक्षशः मानिलें. न्यून पूर्ण बोलिलों नाहीं. ' कार्य निमित्तें जे सर्व प्रसंग धामधुमीकरितां तुटका जाहला असेल तो पदार्थ द्यावयास हे लोक अनमान करणार नाहींत. पदरीं नाहीं तेव्हां मजलाच कोठून देणार ? ' असें चित्तामध्यें मानून कार्य-प्रसंग संपादिले. कोणाचेंहि न्यून पडूं दिलें नाहीं. व कोणा समागमें खटला न केला. याप्रमाणें पांच वर्षे दुःखाचीं घालविलीं. उपरांतीक सुभिक्ष प्रसंग होत चालला. महाराज राजश्री राजाराम चंदी प्रांतीं असतां राजश्री रामचंद्र पंडित अमात्य विशाळगडीं राहून संपूर्ण तांब्र कोंकण प्रांत प्रवेश केला होता त्यास दहशत लावून निःशेप घालाविला. इत्यादि.

---

# दाभोळची देशमुखी व वतनाची आसक्ती



आदिलशाहींत सरकारी कामांत कांहीं चूक झाल्यामुळें दाभोळच्या ब्राह्मण देशमुखोंच वतन जप्त होऊन शिवाय त्यांस मुसलमान करण्यांत आलें. त्या देशमुखीसाठीं अदिलशाही अमलांत, शिवशाहींत आणि राजारामाच्या कारकीर्दीत शिरके यानीं किती उपद्याप केले हें लक्षांत घेतलें असतां आमच्या लोकांची वतनावरील विलक्षण आसक्ती वाचकांस कळून येईल. महाराष्ट्राच्या इतिहासाचा नीटपणीं उलगडा होण्यास ठिकठिकाणच्या वतनदार घराण्याचे हितसंबध व सोयरिकी यांची माहिती मिळविली पाहिजे:—

मामले दाभोळ येथील देशमुखीवतन पूर्वी ब्राह्मणाचें. त्यास त्या ब्राह्मणांपासून इदलशाहा पातशाहासी हरामखोरी जाली. यावद्दल त्यास मुसलमान केलें. आणि देशमुखचिं वतन कित्येक वर्षे अमानत असतां, शृंगारपुरीं

सूर्याजी राजे सुर्वे यांनीं पिलाजीराव शिरके यांसीं आपली लेक दिल्ही. त्यांणीं पातशहास विजापुरीं अर्ज पोंचविला. त्यावरून पिलाजीराव यांस दाभोळ मामल्याचें देशमुखीचें वतन मऱ्हामत केलें. त्याचा भोगवटा व्हावा तों छत्रपति थोरले स्वामीस तळकोंकण काबिज जालें. यास्तव न जाहला. त्या उपरी कांहीं वर्षांनीं थोरले शिवाजी महाराज यांनीं आपली लेक राजकुवरबाई गणोजीराव यांसी दिल्ही. व पिलाजीराव शिर्के यांची लेक जिऊबाई संभाजीराजांस केली. या उपरि कोंकणांत लखम सावंत फिसाहत करून, वसाहत होऊं न देई. याजकरितां महाराजांनीं पिलाजीरायास सावंताकडे पाठविलें. त्यांनीं सावंतास आणून राजास भेटवून तह करून दिल्हा. ते समयीं महाराज कृपाळु होऊन ऊर्जित करावयावरी आले. ते समयीं 'चिरंजीव राजकुवरबाईस पुत्र होईल, त्यास मामले दाभोळ येथील देशमुखीचे वतनाचा भोगवटा चालत नाहीं, तें वतन करून देऊं' असें बोलले. त्याजवर राजश्री राजाराम साहेब ताम्राचे दाटीचे प्रसंगें कर्नाटकांत चंदीप्रांते गेले. तिकडे ताम्राच्या फौजा झुलफुकारखान जाऊन चंदीस वेढा घातला. ते समयीं गणोजीराव मोगलांचे चाकर असतां त्यांनीं स्वामीस व सौभाग्यवती ताराबाई व राजसबाई व राजकुंवरसहित चंदीहून काढून रात्रीची अरणीस पावविली. त्या सेवेमुळें राजश्री राजाराम संतोषी होऊन " काय पाहिजे तें मागा " ऐसी आज्ञा केली. तेव्हां गणोजीराव यांनीं विज्ञाप्ति केली जे " दाभोळचे देशमुखी इदलशहांनीं अनामत केली होती ते त्यांनीं आपले बाप पिलाजीराव यांसी दिल्ही. परंतु भोगवटा न जाहला. त्या वतनावर कोणी वतनदार नव्हता म्हणून चंदीचे मुक्कामीं राजश्री खंडोबल्लाळ चिटणविस यांस दिल्ही आहे. ऐसीयासी आपणास ' आपण देऊं ' ऐसें अभयवचन पूर्वील आहे. त्याचप्रमाणें आपणास पुत्र जाला आहे. त्याचें नांव पिलाजीराव ठेविलें असे. तरी तें वतन आपणास द्यावें. त्यावरून राजश्री खंडो बल्लाळ यांचें समाधान करून, त्यांस दुसरें वतन देऊं केलें. आणि दाभोळचें देशमुखीचें वतन गणोजीराजे यांसीं देऊन, पत्रें करून दिल्हीं; व खंडो बल्लाळ यांस पत्रें दिल्ही होतीं. येलुराहून स्वामी स्वार होऊन, स्वराज्यांत स्वदेशीं आले. त्याजसमागमें रामोजी बिन कान्होजी

शिरके-गणोजीरावाचे पुतणे– देशीं आले त्यांजपाशीं वतनाची पत्र दऊन इकडे पाठविले.

[ वतनपत्रें; निवाडपत्रें, वगैरे पृ. ८३

---

# ३ स्वातंत्र्य संरक्षणार्थ युद्ध



औरंगजेबानें झुलपिकारखानाकडून रायगडास वेढा देवविला. तेव्हां त्यांतून राजाराम छत्रपति निसटून प्रतापगडास गेले. नंतर तेथून चंदीस गेले. इकडे शाहु व एसूबाई मोंगलाच्या हातीं लागलीं. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं मराठ्यांनीं एक लाख फौज जमवून मोंगलाशीं स्वातंत्र्याप्रीत्यर्थ शेवटपर्यंत लढण्याची हिंमत धरली. त्या प्रसंगीं येथें दिलेलें पत्र लिहिण्यांत आलें आहे. मराठ्यांत दुफळी असल्यामुळें शत्रु शिरजोर झाला होता परंतु त्यांनींच एकोप्यानें राहण्याचें ठरविल्यावर गनीमाचा हिसाब काय असा लेखकानें आवेशाच्या भरांत प्रश्न केला आहे. [ खं. १५ ले. ३४७

श्री १६१२ चैत्र वद्य ८

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १६ प्रमोद नाम संवत्सरे चैत्र बहुल अष्टमी मंदवासरे राजमान्य राजश्री बाजी सर्जाराऊ जेधे देशमुख यासि राजाआज्ञा ( अभय दिल्हे ) ऐसी जे मा। रतनोजी सिंदे व शंकराजी ढगा याजबराबरी कितेक एकनिष्ठपणाचा गोस्टी सांगोन पाठविल्या. सांगितल्याप्रमाणें विदित जालें. ऐसियासि हे मऱ्हाट राज्य आहे. तुम्ही लोक त्या राज्याची पोटतिडीक धारितां तरि ते प्रांते कितेक राजकारणें आहे ते

चालणा करून + + ण जमाव करून सावधपणें राहोन स्वामीकार्य जे दृष्टीस पडेल तें मनांत आणून हस्तगत करून ठेवणें. हुजूर लेहोन पाठविणें. तेणेंप्रमाणें हुजूरून विल्हे केली जाईल. या प्रांतीचें वर्तमान तरी राजश्री छत्रपति स्वामी स्वारी करून कर्नाटक प्रांतें गेलियावरी तिकडे जमाव लस्कर चाळीस हजार व हशम एक लाख पंचवीस हजार जमाव जाला आहे. पुढें हि आणखी जमाव होतच आहे. ते प्रांतीं कुल पुंड पाळेगार तमाम एऊन भेटले आहेती. जमेती पोख्ती जाली आहे. तुर्त पुढे राजश्री केसो त्रीमळ या प्रांतें रवाना केले आहेती. या बरोबर संगिनात स्वार पंधरा हजार व हशम पंचवीस हजार देऊन रवाना केले आहेती. ते हि कादळ प्रांतें तुंगभद्रेच्या तीरास आले आहेत. खजाना हि एक लाख होनु या बराबरी आहे. त्यास आणावयास राजश्री धनाजी जाधव व संताजी घोरपडे सेना-पंचसहस्री पाठविले आहेती. ते हि आठा पंधरा दिवसीं एतील. ते आलियावरी तो जमाव व हुजूरचा जमाव ऐसे करून त्या प्रांतें स्वारी होईल. तरी हें पत्र तुम्हास सादर केलें असे. तेणेप्रमाणें जमावानसी सावध असणें. त्या प्रांतें आलियावरी तुमची हि सरंजामी एथें मा॥ रतनोजी सिंदे व शंकराजी ढगे एही रदबदल केली त्याप्रमाणें चालऊन * बिता॥

| तैनाती सालीना होनु | गांव |
|---|---|
| ५००८० खासा | ४ इसाती |
| ५०० मताजी जेधे | २ वेतनांत गांव |
| १००० | ६ |

सदरहु प्रमाणें हजार होनु तैनाती व गांव इसाती व मुकासे मिळोन सा गांव कार्यभाग जालीया देऊन. तरी तुम्ही आपली खातरनिशा राखोन स्वामीच्या पायासी एकनिस्टता धरून स्वामिकार्य साध्य होए ते गोस्टी करणें. गनीमाचा हिसाब काय आहे ? तुम्ही लोक जेव्हां मनावरी धरितां तेव्हां गनीम तो काय आहे. ? गनीमसा तुम्हीं लोकीं केला आहे. ते

* चालऊन = चालऊं.

तुम्हीच लोक या राज्याची पोटतिडीक धरितां तेव्हां औरंगजेबाचा हिसाब धरीत नाहीं. ऐसें बरें समजोन लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. व औरंगजेबानें मऱ्हाटे लोक आहेती त्यास मुसलमान करावे ऐसे केले आहे. त्यापैकीं मुसलमान केले मा। नेतोजी राजे व साबाजी घाटगे व जानोजी राजे व कित्येक ब्राह्मण हि ए प्रांतींचे बाटविले. पुढें हि तलबा गेला आहेती. तिकडून तमाम मऱ्हाटे लोक होते ते आपला जमावानसी आम्हाकडे एताती. हालीं रा। हाणवंतराऊ निंबाळकर व सटवोजी निंबाळकर ब्राजे सरदार आले आहेती. पुढें हि कितेक एताती. ऐसे गनीमाचे लष्कर उठोन हुजूर जमाव होत आहे. ईश्वर करितो तरी फते च आहे. लिहिले प्रमाणें हिमती धरणें. जाणिजे छ. २० जमादिलाखर सु॥ तिसैन अलफ. आज्ञा प्रमाण.

---

# उशींतल्या कागपत्रांची चोरी



चिपळूण येथील देशकुलकर्ण्यांचे मूळ पुरुष नरसींपंत. त्याचा नातू काळो परशराम वतनाचें काम चालवीत असतां दावेदारांनीं मारिला. पुढें त्याचा मुलगा अंतो काळो लौकरच मरण पावल्यामुळें वृत्ती चालविण्याची जबाबदारी काळो परशरामाची बायको गोतमाई इच्यावर आली. तिनें तिमाजी भास्कर व गंगाजी भास्कर हेळवाककर यांस मुतालीक नेमिलें. हेळवाककरांनीं गोतमाईस विश्वास दाखवून वतन आपल्या मालकीचें बनविण्याचा विचार केला. तेव्हां:—

" विजापुराहून अफजलखानास राजश्री सिवाजी राजे यावरी नामजाद केले. अफजलखान वजीर, त्याही बराबरी पादशाहाची फर्मानाची डौलें करून घेतली होतीं, हें वर्तमान तिमाजीपंतांस श्रुत जालि-

यावरी याहीं कामी दियानतराऊ यांस वष करून या खेरीज तीनसे नांवा विजापुरास पोंचवाव्या ऐसा करार-दाद करून फर्मानाचीं डौलें होतीं त्यां-पैकीं आपल्या नांवें [ एक ] फर्मान करून घेतला. त्यामध्यें गौतमाबाईची अफलाद लेहोन रुजु पडे ऐसे करून जाहिराणा न करतां चिपोलणास आले. ऐसियास माहजर पाहिजे म्हणौन जेथें स्नेह त्यास श्रुत करून फर्मानाप्रमाणें माहाजर करून घेतले. अनकूल होते तेवढियाच्या साक्षी घेतल्या. केशव सेट व गांगसेट सेटिये हे नामधारीक. यांची साक्ष अलबता असावी म्हणौन प्रसंगो-चित त्यास सांगितलें. त्याही उगेच मान्य केलें सें केलें. आणि त्या अपरोक्ष गौतमाईस आणून पुसिलें कीं "तिमाजी पंतीं आपल्या नांवें पादशाही फर्मान करून घेतला. आतां महाजर करितातो. कितेकांनीं साक्षी केल्या. आम्हांस हि साक्ष करा म्हणौन आमचे भेटीस आले हें वर्तमान तुम्हांस कांहीं कललें कीं नाहीं." त्यावरी ते कष्टी होऊन बोलिली कीं "हें वर्तमान आपणास आजीवरी कलले नाहीं." तेव्हां सेटीनें पुसिले कीं "तुम्हांपासीं कांहीं कागद-पत्र वतनाचे आहेत कीं काय ?" त्याउपरी ते बोलिली कीं 'आहेत.' त्याउपरी तऱ्ही सावध होऊन कोण्हास दृश्य न होता जतनेनें वागवणें. त्या-वरी बाइकोची जात. कागद दुसरे जागा ठेवावयास योजेना तेव्हां चिरकुटें घालून उसां घ्यावयास उसी करून त्यामध्यें कागदपत्र होते, तेवढे अशेष घालून उसी ठेविली. रोज उठोन उसी दडपून पाहतां कागद दरम्यान आहेत ऐसें कलत गेलें. तो तिमाजीपंतास अगत्य जालें कीं आपण फर्मान व माहाजर आपले नांवें करून घेतला. परंतु गौतमाईपासी कागदपत्र अस-तील त्याचा अंतस्तें शोध करून हस्तगत करावे म्हणौन कार्याकारण ती-पासीं येऊन आपले कितेक सुखदुख तिचे मन द्रवे ऐसे करू लागले. उसा उसी होती तेथें हात चालवून उसीमधे कागद आहेत ऐसा तर्क दिसोन आला. तव्हां प्रसंग पाहोन खर्डेयाचे गुंडाळे करून उसीमध्यें घालोन पाहिले कागद ठेविले होते ते काढून घेऊन खर्डे ठेवले. गौतमाआई सदा पहात असे तैसे पाहू लागली. तों पाहिल्याच प्रमाणें कागद आहेत ऐसें प्रत्ययास येत गेले. त्यावरी कितेका दिवसी संदेह निर्माण झाला म्हणोन उसी उघ-डून कागद पाहों लागली. तेंव्हा बुके फुरसी खरडे हे कलताच तिमाजी

पंतांच्या घरांत जावून पांच बोंबा मारून " फर्मांना मध्यें माझे लेकीचा औप म्हणोन लिहितोस तरी तूं माझ्या बटकीचा लेक कीं काय ? " असा घोकणा केला. "

---

# * सत्याग्रहाचा मासला

यानंतर बरीच घालमेल होऊन माहादाजी अनंत सुभेदार यांच्या कारकीर्दीत तिमाजीपंताची हकालपट्टी झाली; व गौतमाईच्या बहिणीचा मुलगा कृष्णाजी सोमनाथ याची वतनावर नेमणूक झाली. परंतु संभाजीच्या कारकीर्दींत पुनः वाद उपस्थित झाला तो असा:—

" राजश्री संभाजी राजे यांच्या कारकीर्दीस राजश्री आनाजीपंतीं प्रसंग केला कीं संगमेश्वराच्या देशकुलकर्णास कोण्ही खावंद नाहीं. तेवढें वतन साहेबीं मेहरबान होऊन आपणास मऱ्हामत करावें. त्यावरून मनास आणून संगमेश्वरचें वतन देशकुलकर्णाचें अनाजीपंतांस दिल्हें. तेच प्रसंगीं राहुजी सोमनाथ अनाजीपंतांस बोलिलें कीं ' तुमचे सिवेसेजारी आपणास हि एक वतन द्यावें'. त्यावरून राहुजीपंतास चिपोलणचें देशकुलकर्ण वतन करून दिल्हें. त्या फडास कृष्णाजीपंतीं जाऊन सा महिने वाद मांगितला. परंतु सरकार कारकुनापुढें याचें मांडेना. राहुजीपंतांचा मुतालीक माहालास आला. हे वाद सांगत जर्जर जाले तऱ्ही दरबारीचा पिछा सोडिला नाहीं. इतकियांत राजश्री कबजीबावा संगमेश्वरीहून रायगडास जातांबराबरी राहुजीपंत चिपोलणास आले. माहाजर करोन घ्यावा म्हणोन लोकास तश्रीफा घ्यावयास दोन दीडे कपडे खरेदी करून अगोदर आपण चिपोलणास आले. राजश्री कबजीबावा परशरामीं येऊन भोजनास राहिले. ते प्रसंगीं कृष्णाजीपंतीं विनाजी बराबरी दोघे त्याचे पुत्र देऊन कबजीबावा बाहेर येतांच तीघांनीं पायाबरी घालून घ्यावें ऐसें सिकवून पाठविलें. तेणेंच प्रमाणें या तीघांनीं येऊन कबजीबावाच्या पायाबरी घालून " जुलूम होतो दाद द्यावी " म्हणौन अर्ज केला. त्यावरून कबजीबावा अनतापी होऊन कोनेरीपंत कारभारी यास

---

* हा भाग मागील प्रकरणाचा उत्तरार्ध आहे,

रागेजोन सांगितलें कीं " यो बडा जंज्याल. हमारे नजीक किस सबब हयाल हुवा ? इसका करी देखकर निशा करो. फेर हमारे पास गरगशा आने न द्यौ " म्हणोन सांगितलें. त्यावरून कोनेरीपंतीं त्यास उठवून " उदैक तुमचा निवाडा करितों " म्हणौन आपणाकडे आणिले. कुल हकीकत कृष्णाजी पंतांच्या मुखांतरें रायगडी आइकिली च होती. त्यावरी कबजी-बावा भोजनास बसले ते समई पंडितांनीं येऊन न्यायनीतीच्या शास्त्राच्या चर्चा केल्या. त्यामध्यें सहज एकाचे वृत्तिछेद करून दुसऱ्यास दिल्हियानें त्या पापास जोडचि नाहीं म्हणौन वाक्यें चालिलीं. ते च समई कोनेरपंत येऊन कबजीबावास सांगितलें कीं " त्या ब्राह्मणाची मनसुफी बरहक मनास त्याचें वतन खरें येथें संदेह नाहीं. राजद्वारीं बलात्कार होऊन त्या गरीबाचा उच्छेद होतो " म्हणौन सांगितलें. त्याच्या सांगण्यास आणि शास्त्राच्या वाक्यास एक जालें. त्यावरून त्याचें मन द्रवोन राहुजीपंतास सांगोन त्याचें वतन दूर करून याचें यासच द्यावें ऐसा आपले मनीं निश्चय केला. तो चिपोलणीं राहुजीपंतीं त्वरा करून माहाजर करून लोकास तश्रीफा द्यावयासि तमाम लोकास ताकीद करून चोट पडवीस जमा केले. तो कृष्णाजीपंतीं विनाजसि सांगितलें कीं तूं दोघे मुल घेऊन सभांगण वठली असेल तेथें उभे राहोन ठसासा " जुल्म होतो " म्हणौन बोंबा मारा. म्हणौन त्यांस सांगोन पाठाविलें.त्याचप्रमाणें यांही केलें. त्यावरून मूलारंभीं अप-शकून मानून तमास लोक भरारा एकाकेंच उठोन आपल्या घरास गले. राहुजीपंत हिंवसलेसें तोंड करून, खटे होऊन परशरामास गेले. कबजी बावाची हि भेटी होतांच कबजी बोलिले कीं "राहुजी पंडित, तुम बुडे होकर राज्याजीका निशा करकर गरीब बमणका बतन लेकर तुम लेते हो. ये मनसुफी हम जानता नई. " म्हणौन निभ्रंसून सांगितलें. कबजी बावा स्वार जाले. राहुजीपंत हि डोलीमध्यें बसोन त्या बरोबरी गेले. तो वाटेंत कृष्णाजीपंतीं जाऊन डोली उभी करून राहुजीपंतास बोलिले कीं " राहुजी नाना, तू म्हातारा जाला आहेस. उद्या मरून जा-शील. तुजपाशी पटकुल अपरांपर असतां तुझ्या पुत्रास काय उणें आहे ? हे टाकून माझ्या आंगावरील घोंगडी जुनी बलात्कारानें हिरोन घेतोस हें तुझें

काण भूषण ? '' ऐसे होऊन बोलतांच राहुजीपंतीं दोन्ही हात जोडून '' या उपरीं तुझ्या वतनाच्या वाटेस अजीपासून जाईल तो तुझ्याच बटकीचा लेक असेल '' म्हणौन सांगोन कृष्णाजीपंतास निरोप देऊन राहुजीनाना स्वार होऊन गेले. हे कलम वारलें. तरी कृष्णाजीपंतीं भगवीं कापडें करून उपोषणें आरंभून रोज राजे बाहेर येतांच मुजरा करूं लागले. याउपरि राजे गांगोलीस आले. तेथें हि पिछा सोडिला नाहीं. एके दिवशीं राजे डोहो बांधिला होता तेथें होडिया घालून खुशालीस जागा केला होता तेथें राजे येतांच कृष्णाजीपंतीं उभे राहोन हाका मारिल्या. '' साहेब सर्वज्ञ, शास्त्राचा अर्थ, स्वत: पंडिताचा निशा होय एसा करितातीं. ऐसे असोन माझें पारपत्य होत नाहीं. '' म्हणौन अर्ज केला. त्यावरून राजांनीं प्रल्हादपंतांस पुसिलें. त्यांहीं सांगितलें कीं '' थोरले माहाराज होते ते थोराची भीड पडली तरी एकाचे वतन काढून दुसऱ्यास सहसा दिल्हें नाहीं. आणि साहेब माहाराज-पुत्र. भिडेभाडेनें या ब्राह्मणाचें वतन खरेंखुरें असतां बलात्कारानें काढून दिल्हें. '' त्यावरून राज्यांनीं राहुजीपंतांचें कुलकर्ण दूर करून कृष्णाजी पंतासच करार करून राजश्री प्रल्हादपंतीं राजपत्र व आपलें पत्र वेंकाजी निंबदेव दाभोलेस सुबेदार होते त्यास आणून आपलें वतन चालवू लागले. ' या उपरि दुसऱ्यास खलेल करावयास गरज नाहीं ' ऐसें राजपत्र खरेंखुरें होऊन बिलाकुसूर चालऊ लागले.

त्याउपरि राहुजीपंत मृत्य पावले. दोघे पुत्र कासी राहुजी व त्र्यंबक राहुजी यास घेऊन राहुजीपंताची स्त्री राजश्री रामचंद्रपंतापासी विशालगडास गेली. तेथे या कुलकर्णाचा प्रसंग केला. तेथें चालवावे हें अगत्य देखोन त्यास दोन तकसिमा, कृष्णाजी पंतास एक तकसीम देऊन समजाऊन पाठवावें ऐसा तह केला. परंतु कृष्णाजीपंत नाइकेत. '' कुडीमध्यें आत्मा आहे तों सोडून जात नाहीं. देहं वा पातयेत् । अर्थं वा साधयेत् ॥ '' हे गोष्ट चितांत धरून मरणास धरणें घेत बसलें. रोज उठोन राहुजीपंताची स्त्री, बाजी आणि कृष्णाजीपंत देहावर संकल्प करून फड सोडिला नाहीं. तेव्हां एके दिवशीं रामचंद्रपंतास राग येऊन बलात्कारें कृष्णाजीपंतास गडाखाले घातले. उघडे बोडके दरवाजापाशीं येऊन योगासन घालून बसिले.

तों राजश्री नारो नीलकंठ—रामचंद्रपंताचे वडील भाऊ—जंजिरे विजयदुर्गाहून रामचंद्रपंताचे भेटीस विशालगडास आले. त्यास आणावयास पुढें सामोरे रामचंद्रपंत गेले. तों दरवाजियापासी कृष्णाजीपंत उघडे घोडके आसन घालून बसले होते ते देखिले. तेव्हां पंताचें मन द्रवोन बराबरी दिवटिया देऊन गडावरी पाठविले. दुसरे दिवशीं प्रसंग पडला तो राहुजीपंताच्या पुत्राची भीड मोडेना. कृष्णाजीपंत ऐकेतना. तेव्हां एखादा अनर्थ होणार; कृष्णाजीपंत तामसी. जिवाचवर उदार होणार. तेव्हां सभासद भले लोकीं कृष्णाजीपंतास बहुतां प्रकारें सांगितलें कीं " तुमचें कुलकर्ण उद्या तुमच्या हातास येईल. प्रस्तुत ये प्रसंगीं पंतीं तह केला कीं दोन तकसिमा त्यास, एक तकसीम तुम्हांस देताती ते तुम्ही मान्य करा" म्हणौन नाना प्रकारें बोध केला. त्यावरून शांत होऊन कार्याकारण प्रसंगानरूप मान्य करून आले. तों मोंगलांचा धुंदकार जाला. जागा जागा फौजा येऊन साताऱ्यास सर्फखान बिलगला. सेख निजाम विशालगडास येऊन वेढा घातला. तमाम कोंकण मोंगलास कबूल जाले. अगदी वतनदारी विष्कळीत जाली. राहुजीपंतांचे मूल परभारे च मोगिरीस गेले. त्याउपरि कितेका दिवसीं निवळ होऊन लोक आपापले जागा येऊ लागले. तो राजाराम चंदी मोगलियांनीं घेतलियावरी त्याप्रांताहून सातारियास येऊन राहिले. तेथे सारे कारकून आले. तेथे हरीपंत—कृष्णाजीपंताचे पुत्र-सातारियास गेले. राजे माडीवर बसले होते. त्यास जाऊन भेटले. वर्तमान निवेदन केलें. तेव्हां राजांनीं हरीपंताबराबरी चोपदार देऊन कोनेरीपंत न्यायाधीश याकडे पाठविले. त्यास जाऊन भेटले. त्यास पाहिली हकीकत कळली च होती. व याहीं आपले स्वमुखें सांगितलें. तेव्हां कागद करून द्यावे म्हणौन कोनेरपंत राजास पुसावयास आले. तेव्हां परशरामपंतीं + + मारिला कीं " विनाजीच्या च पुत्रांनीं उपभोग करावा ऐसें पत्र करून देणें. " हरीपंताचें नांव नाहीं म्हणौन खलेल पाडिले. कोनेरपंत हरीपंतास म्हणो लागले कीं ' तुमचें नाव लेहावयास तुम्हापासी कांहीं कागदपत्राचा आधार असेल तरी दाखवा. त्यावरून तुमचे नांव लेहोन पत्रें करून देतों. ' तेव्हां हरीपंतापासी विनाजीनें पत्र लेहोन दिल्हे होते कीं " आपल्या

पुत्रांनीं व हरीपंतीं मिलोन वतनाचा उपभोग वौंपपरंपरेनें करावा ''
म्हणौन पत्र होतें तें कोनेरपंतास दाखविलें. त्यावरून राजास व
परशरामपंतास सांगोन तें पत्र दाखवून 'याचे नांव लेहोन द्यावे' ऐसी
परवानगी घेऊन पत्रांमध्यें याचें हि नांव लेहोन राजपत्रें करोन सिध केलीं.
तों राज्यास कांहीं पैकियाची गरज लागली. म्हणौन कोनेरपंताकडे ऐवज
न्यायाधिशीची तें प्रसंगीं होती तेवढीवरी ऐवज नांवनिसीवार लिहिला.
त्यामध्यें हरीपंताच्या नांवें दोनी सें रुपये घेणें म्हणौन लिहिले. त्यावरून
दोशा रुपयाचें त्वष्ट यास लाविलें. रुका न मिळे. कागदपत्र तयार जाले.
तेव्हां कर्जवाम मिळाले तैसे घेऊन दोनी सें रुपये घेऊन कागदास सिके
होऊन हरीपंतास निरोप देविला. ते दरवाजियास आले. तो राहुजी-
पंताच्या दोघा पुत्रांनीं मारगिरीहून येऊन दरवाजियापासी हरीपंतास
अरगटून माघारे राजसंनिध नेलें. राजापाशी सांगितलें कीं " आपणास
चिपोलणचे कुलकर्णाचे वतन संभाजी राजे यानीं दिल्हे आहे. तेणेप्रमाणें
साहेबीं द्यावे.'' त्यावरून राजाराम बोलिले कीं " दाजीनें एकाचें वतन
काढून एकास काय समजोन दिल्हे ? आम्ही मनास आणून ज्याचे त्यास
च सरे. तुम्हांस निसबत नाहीं. या उपरी कुलकर्णाची चर्चा करायास
गरज नाही '' म्हणोन पष्ट सांगोन हरीपंतास वतनाच्या वतनावरी पाठविलें
हें कलम.*

[ द्वितीय संमे. वृ. १८३६ पृ. ६६

---

# यवनास भग्न करूं तेव्हां खंडणी द्या



औरंगजेबाच्या अफाट सैन्यापुढें मराठ्यांचा प्रथम टिकाव न लागल्यामुळें
राजाराम छत्रपति जिंजीकडे गेले. परंतु त्यांना आपण पुनः महाराष्ट्रांत

---

* चित्रमयजगत् १९१४ फेब्रुवारीचा अंक पहा.

परत येऊन यवनांची हकालपट्टी करूं अशी खात्री होती. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांना देखील ही गोष्ट संभवनीय दिसत असल्यामुळें ते मराठ्यांशीं या धोरणानें गुप्त तह करून सलोख्यानें वागण्यास तयार असत. अशा पैकीं सोंध्याचे संस्थानिक हे एक होते. हे यद्यपि मोंगलांचे अंकित बनले होते तरी राजाराम छत्रपतीशीं आंतून संबंध ठेवीत. याचा फायदा घेऊन मराठे मुत्सद्दी या संस्थानिकाशीं कशा प्रकारचे करारमदार टरवीत याची कल्पना येथें दिलेल्या पत्रावरून येण्याजोगी आहे:--

अप्रकाशित. सोंधेकर-दप्तर ] श्री [ १६१८ आषाढ शु. १५
+महादेव

राजश्री सवाई सदाशिव नाईक
सोंधें गोसावी यांसी.

०॥ छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य

प्रति राजश्री राजाराम छत्रपति. उपरि तुम्ही मा। बायाजी विठल व रायाजी रखमांगद यांसमागमे पत्र पाठविलें होतें तें पाऊन लिहिला अभिःप्राव व उभयेतांनीं कित्येक स्नेहाचे प्रसंग मुखवचनीं सांगितल्यावरून त्यासारिखें अंतःकरणास आणून त्याचें उतर उभयेता मशारूनइलेस सांगून त्यां हातीं तुम्हास लिहिविलें व आम्ही आपलें उतर हि पाठविलें. यैसें उभयेपक्षीं उत्तर प्रतिउत्तर पाठवीत असता मग तुम्ही आपणाकडील भले मनुश रा। कोनेरपंत यांचे विद्यमाने रा। मल्वाजी रखमागद यांसमागमें निर्वाहपूर्वक सागून पाठविलें. तेंहि राजश्री शंकराजी पंडित सुमंत व राजश्री निलो कृष्ण यांचे गुजारतीनें विदित केलें कीं उभयेपक्षीं पूर्वापर स्नेह सारोधार चालोन आला आहे व पुढें हि उतरोतर चालावा यैसीयासी पंजमाहाल देशदुर्गादि आपणांस मोकरर करून पारंपरा चालावें यैसे निर्वाह करून भाषापत्र द्यावें यासी देऊं करार केले मक्ता होन प्रलयेवटी२२२०० बावीस हजार दोन सें नेम करून लिहून पाठविलें. यावरी यासी मान्य करून

+ हीं अक्षरें मूळपत्रात बाळबोधींत लिहिलीं आहेत. या पत्रांत पुढें श्रीची आण असें म्हटलें आहे त्या ठिकाणीं श्री महादेवाची आण असें समजावें.

सदरहु पंजमाहाल देशदुर्ग तुम्हास आम्ही आपुले मनःपूर्वक भाव संवत्सरीं मोकरर करून दिल्हे बिा.........येकून माहाल ५ पांच व कोट ४ च्यार व गड ४ च्यार यासी नक्त होन प्रलय घटी बावीस हजार दोन से घेऊन तुम्हास सदरहु माहाल ५ व कोट ४ व गड ४ दिल्हीं आहेत. तुम्ही आपले वौशपारंपरेनें अनुभवून सुखरूप असणें. तुमचे देश विलायत सोंधें देहाये देखील हुडवा वगैरे मुल्क तालुका बंकापूर व आम्हीं क्रियापूर्वक दिल्हें. माहाल पांच व कोट च्यार व गड च्यार यैसें तुमचे असें सदरहु विलायेतील आम्हांकडून उपसर्ग होऊं देणार नाहीं. यासी दरसाल पैके आम्हास देवे तरी हालीं तुम्ही यवनासी देत आहा त्यास भग्न करून मग तेंच द्रव्य आम्ही घेऊन. यावितरिक्त तांब्रांचे कबजांतील राज्य तुम्ही बांधून घेणें त्यासी दरसाल तुम्ही काय द्रव्य देणें करार कराल ते च आम्ही आपले सामराज्य वैभोगादि तें द्रव्य तुम्हापासून घेणारास भग्न करून तेच प्रा दरसाल द्रव्य आपण सालेसाल घेऊं. ते हि मुल्क तुम्हास च चालवून देऊं. शत्रूचा उपसर्ग तुम्हास जालियानें त्याविशईं आपली फौज पाठऊन उपराला करून स्नेहासी कधीं अंतर पडणार नाहीं. क्रियापूर्वक दिल्हीया वचनासी या लिहिलेमध्यें काहीं अंतराय पडेल तरी आम्हास आपले श्री चीआण असे. अंतःकर्णपूर्वक या प्रसंगाची श्रीचा बेल व कसेची माल व रोटी काढून पाठविलें आहे ते घेऊन तुम्ही याच प्रा स्नेह चालऊन दिवसें दिवस अभिवृधी करणें + बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा मर्यादेयं विराजते.

पौ धातसंवत्सरे आषाढ सुा १५

---

+ येथून अक्षराचे वळण निराळें आहे.

## १३३

# राजमाता येसूबाईवरील कठिण प्रसंग



हें पत्र मातुश्री येसूबाई साहिब ( म्हणजे संभाजी महाराजांच्या पत्नी ) यांणीं अहमदनगरच्या किल्यांत कैदेंत असतां श्री देव, चिंचवड, यांस लिहिलें आहे. त्या वेळीं येसूबाई साहेबांची फार हलाखीची स्थिति झाली होती. संकटाचा परिहार व्हावा या हेतूनें त्यानीं चिंचवडकर देवांकडे पत्रद्वारें धाव घेतली आहे. [वार्षिक इतिवृत्त शके १८३७ पृ. २९८]

॥ श्रीशंकर १६२७ वै. शु. ७

राजश्री श्री देव स्वामीचे सेवेसी

॥ श्रीमत् परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकलगुणालंकरण देवमान्य. वरदमूर्तीपरायण राजमान्य राजश्री

आज्ञाधारक सेवेसी मातुश्री येसूबाईसाहेब दोनी करकमल जोडून चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंति. उपरि. येथील क्षेम तागाईत वैशाख सुध सप्तमी गुरुवार जाणऊन मुकाम अमदानगरीं दुर्गांत स्वामीच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे. स्वकीय कुशल–लेखन–आज्ञा केली पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठवून बालकाचा परामृश केला नाहीं. याकारितां चितास स्वस्थता होत नाहीं. तें देव जाणें. तरी स्वामींनीं येणारा मनुश्या बराबरी प्रतिक्षणीं आशीर्वादपत्र पाठवीत गेलें पाहिजे. विशेष. आमचें वर्तमान तरी स्वामीपासी सत्य च लेखन केलें पाहिजे. चिरंजीव दाजी[1] तों पृथ्वीपतीसमागमें[2] गेले. आम्हांस सार्वभोमाची आज्ञा जाली कीं 'अहमदानगरास जावें.' आज्ञेप्रमाणें आम्हांस अहमदानगरास घेऊन आले. तेथें आलियावरी आजी पांच मास जाले. परंतु खर्चाची

१ शाहु. २ औरंगजेब.

बहुत तंगचाई जाली. काय निमित्य तरी सार्वभोम दूर गेले. आमचा तनखा जो दिल्हा तेथें ताम्रांनीं व हरिभक्तांनीं व कांहीं काळानें करून प्रतिकूल जाली, यामुळें द्रव्य येणें राहिलें. येथें अहमदानगरीं साहुकारांचें पांच सात सहस्र ब्रम्हस्वे[३] जालें. आतां कोण्हीं देत नाहीं. मागिल्या च पैकियास तगादे लाविले आहेत. त्याच्यामुळें बहुत कष्टी होतों. तो दुःखसागर स्वामीस काय म्हणऊन ल्याहावा ? स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे. तरी माहाराज कैलासवासी स्वामी गेल्या तागाईत आपणावरी हा कसाला प्राप्त जाला. इंगळास वोळंवे लागले. बरें, होणार भविष्य त्यास यत्न काय आहे ? आतां एक स्वामी वितरिक्त आ_णीक कोणाचा भरवसा या समयांत नाहीं. एक स्वामीच क्लेश परिहार कारितील. इतराच्यानें कांहीं होणें नाहीं. तरी सारांश गोष्टी कीं ब्रह्मस्वापासून मुक्त केलियानें बहुत कीर्ति स्वामीची आहे. आणि पाऊसपाणी जालियावरी स्वामी ज्या पासून देवितील त्यास प्रविष्ट करून. परंतु हा समय आम्हांवरी कठीण पडला आहे. आपले कोणी येथें प्रतिपक्षी नाहीं ऐसा प्रसंग प्राप्त जाला आहे. याचें निवारण करणार स्वामी आहेत. माझी उपेक्षा केली न पाहिजे. वरकड चिरंजिवाकडील सामराज व आमचें वर्तमान रायाजी मुखांतरीं चरणापाशीं विनंति कारितां श्रुत होईल, तें सत्यच मानणें. विशेष ल्याहावें तरी आपण अज्ञान, मूढ असे. लिहितां येत नाहीं. अथवा ज्ञान हि नाहीं. त्याहि वरी आपणाजवळीं कोण्ही शाहणा कारकून नाहीं. आवाक्षराची क्षमा केली पाहिजे. कृपा आशीर्वाद निरंतर करीत गेलें पाहिजे. कृपा आसो दीजे. जाणिजे मो

सेवेसी सेवक बसवंतानें चरणावरी मस्तक ठेऊन सां दंडवत विनंति उपरी लिा परिसिजे. मी सेवक असे. आशीर्वादपत्र पावीत जाणें. जाणिजे हे विनंति.

रा छ ११ माहे मोहरम सन ४९ हे विज्ञापना.

---

३ कर्ज, देणं

## १३५

# संताजीचा पराक्रम



सर्व सरदारमंडळी मिळोन फौजा जमा केल्या. तीस चाळीस हजार फौज जमली. जुलफिकारखान यांस पादशहा यांनीं रायगडास पाठविलें. त्यांनीं येऊन मोर्चे दिले. हें वर्तमान पन्हाळ्यास समजल्यानंतर ' रायगडास वेढा पडला, आपण पायबंद[1] लावावा, म्हणजे ओढ पडेल, रायगडचा वेढा उठेल ' म्हणोन आपली फौज तयार करवून बाळ जोशी संगमेश्वरकर यांज-कडून मुहूर्त आणऊन अमात्य यांनीं धनसिंगराव जाधवराव मुख्य सरदार, पोटीं सरदार--पथकें त्यांचे स्वाधीन केले. त्यांत संताजी घोरपडे यांचें पथक हि स्वाधीन केलें. फौजेसुद्धा धनसिंगराव जाधवराव यांणीं मसलत करून श्रीमहादेवाकडे[2] गेले. कारण पादशहाच्या फौजेची ओढ आपल्याकडे पडावी मैदान मुलकांत लढाई द्यावी.' मराठी फौज आहे' असें पादशहास कळावें. याजउपरि पादशहास ' मराठी फौज आली ' हें वर्तमान तुळपूराचे मुक्कामीं समजल्यानंतर रणमस्तखान व शास्ताखान फौजसुद्धा रवाना केले. त्यासमयीं जाधवराव यांस संताजी घोरपडे बोलिले कीं " पादशहा याची फौज एक दोन मुक्कामावर आली आहे. फलटणचे आश्रयास आपण लढाई द्यावी. पाठीवर डोंगर असावा. माझ्याबरोबर दोन हजार स्वार सडे एकांडे निवडक द्यावे. शिवाय माझे पथकानिशीं तुळापूरचे मुक्कामीं जाऊन बराय-खुद पादशहा याजवर मी छापा घालितों. मराठे आहेत असें खाशास कळवून येतों. " या प्रकारें बोलिले असतां जाधवराव ' फार चांगलें ! शाबास ! ' असें बोलून घोरपडे यांचे खास पथकाशिवाय दोन हजार निवडक एकांडे व विठोजी चव्हाण असे बरोबर दिले. तितक्यानिशीं संताजी घोरपडे निघोन डोंगराच्या आश्रयानें जेजुरीस श्रीचें दर्शन करून, दिव्याच्या घाटाखालीं जाऊन झाडींत मुक्काम केला. तेथून मध्यरात्रीचे

---

१ पायबंद लावणें=बाहेरून हल्ला करून वेढ्याचे कामास व्यत्यय आणणें
२ शंभुमहादेव ?

अमलांत तुळापूरचे मुक्कामीं जावयास मार्गानें जातांना ऐलीकडे तीन कोशांवर छबिन्याचे स्वारांची गांठ पडली. त्यास सांगितलें कीं "पादशहाचे लष्करांतील हिंदु सरदार शिर्के व मोहिते वगैरे आहेत त्यांजकडील आम्ही छबिन्यास गेलों होतों. मुबादल्यास आले म्हणून माघारे जातों." अशी पक्की खूण सांगितल्यावरून त्यार्णी हि मार्ग दिला. यार्णी लष्करांत शिरून छापा घातला. त्या काळीं लाखो फौज असतां दोन तीन हजार स्वारानिशीं छापा घालून बहुत तसनस करून पादशहाचे डेऱ्याचे तनावे तिघे बंधु घोरपडे व चव्हाण यार्णी तोडून डेऱ्याचे सोन्याचे कळस दोन्ही घेतले. याजकडीलाहि स्वार थोडेबहुत पडले. पादशहाचे फौजेचा दुभाग करून गटांनिशीं निघोन सिंहगडचे झार्डीत आले. सिंहगडावर प्रतापराव गुजर यांचा लेक सिदोजी गुजर हे किल्लेवर होते. त्यास वर्तमान कळलियानंतर खाली येऊन यांशीं भेटले. यांची बरदास्त केली. जखमी होते ते त्यांच्या स्वाधिन केले. ते किल्यावर नेले. दोन मुक्काम त्या झार्डीत करून तेथोन निघोन भोरावर येऊन, पुनः घाटाखाले उतरून, रायगडाचे संधान राखून जुल्फकारयांचे फौजेवर छापा घालून, त्यांची तसनस करून, त्यांतील पांच हत्ती घेऊन पारघाट चढून, वाई सातारेवरून पन्हाळेस येऊन, महाराजांचे दर्शन घेऊन पादशहाचे डेऱ्याचे कळस आणलेले पुढे ठेवले. पांच हत्ती पुढे केले. त्यासमयीं महाराजांची मर्जी बहुत खुष होऊन, वस्त्रें भूषणें देऊन, तिघे बंधु व चव्हाण यांस किताबती दिल्या. प्रथम लढाई शिवाजी महाराजांचे नांवावर केली, यश आलें, आणि बादशहाचे डेऱ्याचे कळस हस्तगत जाले; पांच हत्ती मिळाले हा संतोष मानून संताजी घोरपडे यांस ममलकतमदार ही किताबत व दुसरे बंधु बहिरजी घोरपडे यास हिंदुराव ह्मणून व तिसरे बंधु मालोजी घोरपडे यांस अमीरूलउमराव व विठोजी चव्हाण यास हिंमतबहादर अशा किताबती देऊन शितोळे यास घोरपड्याच्या पथकाची सरनोबती सांगितली. याप्रमाणें संताजी घोरपडे यांचा पराक्रम पंत अमात्य यार्णी पाहून महाराजास सक्त विनंति केली कीं "संताजीचा पराक्रम अतिपराकाष्टेचा. किताबत दिली ही यास योग्य नव्हे. आपले फौजेंत सेना-

पति नाहीं. पूर्वी हंसाजी हंबीरराव मोहिते बीडकर होते, हे वारले, सांप्रत त्यांचें कोणी नाहीं. सबब घोरपडे यांस सेनापतीचीं वस्त्रें द्यावीं. मर्दुमी बहुत केली. पादशहाचे डेऱ्याचे कळसच आणून जुल्फकारखान यांचे प.च हत्ती आणिले. त्यापेक्षा यांची मर्दुमी कोठवर वर्णावी ? यास्तव स्वामींनीं कृपा करून पदाधिकार द्यावा. ” असें ऐकोन महाराज बोलले कीं “आमचे मनांत धनसिंगराव जाधवराव यांस हें पद द्यावें असें होतें. परंतु तुमची मर्जी यास देण्याची तरी देतों ” असें सांगोन सेनापती पदाचीं वस्त्रें संताजी घोरपडे यांस शके १६१० विभवनाम संवत्सरे श्रावण शुद्ध ५ स दिलीं. तिकडे धनसिंगराव जाधवराव याणीं फलटणचे मैदानांत पादशहाच्या फौजेशीं आरेतुरेच्या लढाया पांच वेळा उभे राहून दिल्या. शास्तेखान व रणमस्तखान यांच्या पांच तोफा पाडाव केल्या. ते नामोहरम जाले. धनसिंगराव यांचा मुक्काम फलटणावर असतां शास्तेखान यांकडे कांहीं मराठे सरदार होते त्यास सांगोन धनसिंगराव यांचे फौजेवर छापा घालविला. तो संभाळून त्यांचीच तसनस करून जाधवराव तोफा घेऊन आपल्या सलतनतेसुद्धा पन्हाळ्यास येऊन पोंचले. श्रावणमासाचा महिना, पाउसाळा बहुत. किल्लेखाली माचीस येऊन मुक्काम करून राहिले. हें वर्तमान छत्रपतीस कळलेवर जाधवराव यांस भेटून बहुमान वस्त्रें देऊन जयसिंगराव हा किताब दिल्हा. इकडे पादशहा याणीं मनांत विस्मय केला कीं “मराठी फौज बुडाली म्हणत होतों; परंतु कायम दिसती. संभाजीचा कबिला रायगडी ठेऊन त्याचा धाकटा भाऊ पन्हाळ्यास राहून फौज जमवून आम्हांशीं लढाया देतो. तरी दुतर्फा यास पायबंद लावावा ” म्हणोन रायगडास जुल्फकारखानाचे पुस्तपन्हास कांहीं फौज पाठविली व कांहीं पन्हाळेकडे रवाना केली.

राजाराम महाराजांचें चरित्र.

# स्वामिद्रोह्याचें शासन



सोंधेकर दफ्तर—अप्रकाशित ] [ १६२९ चैत्र शुद्ध १५

श्री

राजश्री सवाई बसवलिंग नाईक
गोसावी यांसी

उपरि हिंदुराव घोरपडे यांणीं दुर्बुध धरून तांम्रासी अनुसंधान लावून कितेक स्वामिद्रोहाचा अर्थ योजिला यास्तव राजश्री जयेसिंग जाधवराउ सेनापति व हंबरिराउ मोहिते सरलस्कर यांणीं त्यास नतीजा पावविला. समूल नाश करावा तों त्याणें स्थलांतर करून फिरत आहे. यैसीयासी हिंदुराउ स्वामिद्रोही. त्याचा समूल नाश करणें हें स्वामीस अवश्यक. यास्तव त्यास स्वामींनीं जिल्हे व मुकासे दिल्हे होते ते कुल दूर करून तो जेथें जाईल तेथें जाऊन त्याचा निःशेष निपात करावा किंवा हस्तगत करून निर्बंध-युक्त हुजूर पाठवावें यैसी उभयेता राउ मशारइलेस परिछिन्न आज्ञा केली आहे. कदाचित् पालगार लोक अविचार बुधींनें त्यास मदत देतील अथवा पत्रादिमुखें अनुसंधान लावितील तरी जो नतीजा हिंदुरायास तोच नतीजा त्यास देऊन स्थल देखील खणोन काढणें ऐसा निर्वाह केला आहे. यैसियासी तुम्ही पहिलेपासून स्वामींसीं निष्टेनें वर्तत आले आहा. स्वामीची दया ही तुम्हावरी विशेषच आहे. हा अर्थ तुम्हांस निष्टंक कलावा यास्तव हें पत्र लेखन केलें असे. तरी कदाचित् हिंदुरायानीं तुम्हाकडे पत्र अगर मनुष्य पाठविलें तरी पत्र न घेतां माणूस मारून बाहेर घालणें. त्या-कडील हेर्जीब तुमचे स्थलीं होता त्यास कैद करून भानजी बलाल हेर्जीब याचे स्वाधीन करणें. जाणिजे बहुत काय लिहिणें.*

---

१–२ येथें 'त'चा पाय मूळ लेखांतच मोडलेला आहे.

* पत्राच्या पाठीमागें एका कोपऱ्यांत 'पौ सर्वजितु सवछर चैत्र शुद्ध १५ मी' असें लिहिलें आहे.

# टोपीकर वरकड सावकारासारखे नव्हेत



हें राजनीति विषयक प्रकरण कोल्हापूरकर संभाजी राजे यांचे अमात्य रामचंद्रपंत बावडेकर यांनीं लिहिलें असून तें विविधज्ञानविस्ताराच्या ५ वें वर्षीच्या ( इ. स. १८७२ ) अंकांत क्रमशः प्रसिद्ध झालें होतें. या राजनीतींत अनुभवाच्या व व्यवहाराच्या कसोटीस उतरणारे बरेच नियम दिलेले आहेत व एकंदर प्रकरण चांगलें वाचनीय व विचारणीय आहे. रामचंद्रपंतानें शिवाजी महाराजांपासून तीन पिढ्यापर्यंतच्या राजकीय घडामोडी पाहिल्या होत्या व त्यांत प्रामुख्यानें भाग हि घेतला होता. यामुळें राजनीतीचे नियम सांगण्यास तो सर्वतोपरीं अधिकारी होता. याचीं एकंदर नऊ प्रकरणें आहेत; पैकी येथें पांचवें प्रकरण दिलें आहे.

साहुकार म्हणजे राज्याची व राजेश्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य अबादान होतें. न मिळे त्या वस्तुजात राज्यांत येतात. तें राज्य श्रीमंत होतें. पडलें संकटप्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम मिळतें. तेणेंकरून आलें संकट परिहार होतें. साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा. कोणविपर्यी त्याजवर जलाल अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा. पेठांत दुकानें, वखारा घालवून हत्ती, घोडे, जरमिना, पशमी आदिकरून वस्त्रजात, रत्नें, शस्त्रें आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा. हुजूर बाजारामध्यें हि थोर थोर साहुकार आणून ठेवावे. वर्षसंबंधें तसें च लग्नादि महोत्साहीं हि त्यांचे त्यांचे योग्यतेनुरूप प्रतिष्ठेनें बोलावून आणून वस्त्रपात्र देऊन समाधान करीत जावें. परमुलखीं जे जे सावकार असतील त्यांचीं समाधानें करून आणावें. त्यास अनुकूल न पडे च तर असतील तेथें च त्यांचें समाधान रक्षून आपली माया लावून त्यांचे मुतालीक आणवून त्यांस अनुकूल जागा दुकानें देऊन ठेवावे. तसें च दर्यावर्दी सावकार यांस हि बंदरोबंदरीं कौल

पाठवून आमदरफ्ती करावी. साहुकारामध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज व फराशीस व डिंगमारादि टोपीकर हे हि लोक साहुकारी करितात, परंतु ते वरकड सावकारासारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्य च करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक या प्रांतीं साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पाहतें ? तथापि टोपीकरास या प्रांतीं प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावीं हा पूर्णाभिमान. तदनुरूप स्थळोस्थळीं कृतकार्य हि जाले आहेत. त्यास हीं हट्टी जात; हातास आलें स्थळ मेल्यानें सोडावयाचे नव्हेत. यांची आमदरफ्ती आले गेले इतकी च असू द्यावी. त्यास केवळ नेहमीं जागा कधीं हि देऊं नये. जंजिऱ्यासमीप तों या लोकांचें येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित वखारीस जागा देणें जाली तर खाडीचे मोबारी समुद्रतीरीं न द्यावी. तसें च ठिकाणीं जागा दिल्यानें जोंपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तों आहेत. नाहीं ते समयीं आरमार, तोफा, दारूगोळी हेंच त्यांचें बळ. आरमार पाठीशीं देऊन त्याचे बळें त्या बंदरीं नूतन किल्ला च निर्माण करणार. तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें. याकरितां जागा देणें च तर लांब खाडी गांव दोन गांवें राजापुरी सारखी असेल तेथें फराशिसास जागा दिल्हा होता त्या न्यायें दोन च्यार नामांकित थोर शहरें असतील त्यामध्यें जागा द्यावा. तो असा कीं तीच जागा शहराचे अहारीं, शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारा घालाव्या. त्यास इमारतीचें घर बांधूं देऊं नये. याप्रकारें राहिले तर बरें. नाहीं तर याविणें प्रयोजन नाहीं. आले गेले असून त्यांचे वाटे आपण न जावें; आपले वाटे त्याणीं न जावें इतकें च पुरे. गनीमाचे मुलखांतील--गनिमाचा मुलूख मारिले यामुळें अथवा दर्यावर्दी मुळें----साहुकार सापडले तर अवसर पाहून त्यांशीं खंड करावा. खंडाचा वसूल घेणें तो हि त्यास राखून घ्यावा, खंड फारीक जाल्यावर थोडी बहुत त्यांशी मेहेमानी करून बहुमानें त्यास त्यांचें स्थळास पावनून द्यावें. गनीमाकडील सेवक लोकांस जें शासन आहे तें सावकार लोकांस उचित नाहीं.

---

# चिटणीसांची राजनिष्ठा



कायस्थ प्रभूंच्या
इतिहासाचीं साधनें                श्री                १६५५ चैत्र शु. ५
पुस्तक १ अंक १

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६१ आनंदनाम संवत्सरे चैत्र शुद्ध पंचमी गुरुवासरे क्षत्रियकुळावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी यांणीं राजकार्य लेखन धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जिवाजी खंडेराव चिटणीस यासी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही विनंति केली " आपले वडील आजे व तीर्थरूप यांणीं सेवा केली त्याजवरून कृपाळु होऊन चिटणिसीचा दरक वतनी वंशपरंपरेनें करून दिला; व कारखानिसी व जमेनिसी हे दोन धंदे सर्व राज्यांतील वंशपरंपरेनें करून देऊन शपतयुक्त पत्रें करून दिलीं. त्या अन्वयें स्वामींनीं हि अभयपत्र दिलें. चिटणिसी वेतनास गांव जमिनी मोकासे लावून दिले तें इनाम चालावेसें अभय वचन दिलें. त्याप्रमाणें पत्र करून देऊन चालविलें पाहिजे " म्हणून. त्यावरून पूर्वीपासून कागदपत्र वृत्त मनास आणितां तुमचे आजे बाळाजी आवजी थोरले कैलासवासी स्वामींनीं राज्य साधन केलें ते समयीं बहुत श्रम साहस करून उपयोगीं पडले. त्या नंतर दिल्लीचे जाण्याचे प्रसंगीं संकट पडलें असतां बराबर फार सेवा केली व राज्याभिषेकाचे समयीं उपयोगीं पडून मनोरथसिद्धि केली. त्याजवरून संतोष होऊन अष्ट प्रधानांतील पद द्यावयाची योजना केली असतां 'चिटणीसीच वतनी वंशपरंपरेनें द्यावी' विनंति केली. त्यावरून प्रसन्न होऊन शपथयुक्त पत्र करून दिलें. नंतर थोरले महाराज कैलासवासी जाले. यावर कैलासवासी तीर्थरूप स्वामी यांणीं कोणी गैरवाका समजाविल्यावरून राज्यभार प्रसंगीं सरकारांतून मुत्सद्दियास शिक्षा केल्या, त्यांत त्यासहि केली असतां तुमचे वडील खंडो बल्लाळ यांणीं बहुत निष्ठेनें वागून स्वामीस गोव्याचे लढाईत शूरत्व करून समुद्राचे भरतीस स्वामीचा घोडा पोहोणे

लागला असतां धरून उडी टाकून घेऊन निघाले. याजवरून बहुतच संतोष होऊन शपथ करून वचन दिलें. सर्व राज्य केलें. तोहि प्रसंग यवन यांचे प्राबल्य होऊन जाला. स्वामीसहि यवनांचे सन्निध जाणें आलें. तेथें गेलें असतां कैलासवासी काकासाहेब चंदीकडे जाऊन राज्य रक्षण करण्याचे प्रसंगास लागले. तेव्हां जातेसमयीं त्यानीं संकट प्राप्त जालें असतां त्यास काढून देऊन आपण क्लेश भोगिले. त्यानंतर चंदीस जाऊन तेथें हि शेवा निष्टे केली. तेथें संकटाचा प्रसंग प्राप्त होऊन निघणें दुर्घट पडलें असतां झुलपुकारखान व गणोजी शिर्के यांस देऊन त्यांचे मोर्च्यांतून पाळण्यांत बसवून काढून घेऊन येऊन देशीं सेवा केली. त्यानंतर काकासाहेब समाप्त जाले. यवनास दिल्लीचें व्यसन प्राप्त जालें. तेव्हां स्वामीस त्याणीं निरोप देऊन लावून दिलें. देशीं येणें घडलें असतां काकासाहेब यांची स्त्री आईसाहेब यांस आपला पुत्र घेऊन राज्यकारभार करण्याची इच्छा होऊन दुर्बुद्धि धरली. फौज देऊन सेनापति व परशराम त्रिंबक प्रतिनिधी रवाना केले. त्या बरोबर खंडोबास दिलें असतां स्वामीस गुप्तरूपें भेटून सेनापति व सरदार यांच्या खातरजमा करून सर्वांस स्वामींच्या लक्षीं आणिलें. लढाई जाली. प्रतिनिधी पळून गेले. विजयी होऊन राज्यकारभार साधन प्रसंगांत सर्व स्थळें व सरदार व प्रतिनिधी सरकारांतून यांस स्वामी-लक्षीं लागण्याचे उपयोगी बहुत केलें. पुढें तुम्ही हि त्या अन्वयें स्वामीचे ठ यीं एकनिष्ठता धरून आंग्रे वगैरे मातुश्रींचे लक्षांतील सरदार, स्थळें वगैरे स्वामींचे लक्षीं वागण्याचा उपयोग करिता यावरून तुम्हांवर कृपा करणें अवश्यक जाणून चिटाणिसी तुम्हांस शपथयुक्त वतनी दिली आहे. ते व कारखानिसी व जमेनिसी हे दोन धंदे राज्यांतील दिले. त्याप्रमाणें करार करून चिटाणिसी वतनास गांव व मोकासे व जामिनी लागल्या आहेत. इनाम करार करून दिले.......... येणेंप्रमाणें महाल गांव जमिनी एकंदर ४५ तुम्हांस इनामी करून दिले असत. तरी तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सदरहु दरक अनुभव करून सेवा करून सुखरूप राहणें. जाणिजे. खास दस्तुर. येणेंप्रमाणें सेवा केली असे. वतनी धंदे करून इनाम खाणें. बहुत काय लिहिणें मोर्तब.

१४३

# धन्यासी मर्यादेनें असावें



खं. ८ ले. ९९ ] श्री. [ १६५० शके.

राजश्री पंते अमात्य हुकुमतपन्हा स्वामीचे सेवेसी

द्वारकोजी यादव कृतानेक साष्टांग दंडवत. यानंतर आपण वार्तिका समवेत आम्हांस पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन सविस्तर वर्तमान कळों आलें. " या राज्यांत थोरले महाराज राजश्री[2] यांणीं आम्हां लोकांचीं घरें वाढविलीं. तीर्थरूप राजश्री निळोपंत आजे; राजश्री रामचंद्रपंत बाप, त्यामागें आम्हीं सेवा केली. काळ साह्य होता तो धणी यांनीं वाढविलें. आजी तागायतं[3] चालत आलें. तीन पिढ्या सेवा केली त्याचें सार्थक जालें ! ज्यांणीं दिलें त्यांणीं घेतलें हा दंडक[4] कोठें हि नव्हता ! या राज्यांत पाहिला ! विश्वासु कारकून पाठवावा तरी कोणी पाय घेईनात " ऐसें कितेक पर्यायें लिहिलें. तरी तुम्ही सरकारकून, या राज्यांतील परंपरागत सेवक, सर्वांनीं तुम्हांजवळून सिकोन जावें असें असोन धण्याचे पायाशीं अमर्यादा होऊन, धण्यास कितेक शब्दारोप ठेऊन लिहिलें. तरी धण्यासी तुम्हीं अथवा कोणीं शब्द ठेवावा ऐसें नाहीं. आबालवृद्धापर्यंत धण्यानीं लोभ धरून, अंतरें, महदंतरें पडलीं तरी क्षमा करून, सर्वापराध पोटांत घालून चालाविलें. लहानाचे थोर केले. पुढें त्यांचीं महत्वें विशेष वाढवावीं हेंच चित्तीं सर्वात्मना आहे.......तुमचे तीर्थरूप राजश्री रामचंद्र पंडित यांणीं थोरले महाराजा-संनिध कोणे रीतीनें वर्तणूक केली हे लोकांत कीर्ती प्रख्यात आहे. महाराज राजश्री[5] या प्रांतीहून चंजीप्रांतें जाणें जालें तत्समई संपूर्ण राज्य व लोक

---

१. भगवंतराव रामचंद्र यांस कोल्हापूरकराकडे वळवून आणण्यासाठी द्वारकोजी यादव बुद्धिवाद सांगत आहे. २ शिवाजीमहाराज, ३ पर्यंत ४ प्रघात, पद्धति ५ राजाराम छत्रपति

लोकपाळ-स्वामित्व राजश्री पंडित माशारनिले यांचे गळा घालोन खासा स्वामीनीं चंजी प्रांतें स्वारी केली. त्यामागें सबळ रिपुवर्ग यांचा उद्भव जाहला. तत्समई यवन उन्मत्त होते. त्यास इत्यादि अमर्यादकास शासनें करून, त्यांचा संव्हार करून दमसर्द केलें. राज्य शर्थीनें राखिलें. तदोत्तर महाराज राजश्रींचें आगमन चंजीहून या प्रांतें जालें. तेव्हां पंडितमशारनिले यांणीं बहुतविशेषाकारें नम्रता धरून जाते समई, राज्य व लोक लोकपाळ व गड किले स्वाधीन केले होते, त्याप्रमाणें धण्याचे धण्यासंनिध वोपून आपण विनीत प्रकारें होऊन " पुढे सेवकास आज्ञा कर्तव्य काय ? " म्हणून पंडित मशारनिले यांणीं विनंति केली. हे किमर्थ ? कीं " आपण ब्राम्हणलोक, परंपरागत सेवक; जीवित हें क्षणभंगूर आहे. ज्या धणियाचे कृपांजळें हें पद प्राप्त जालें त्यासी निमकहराम न होता कल्याणाभिवृद्धी इच्छिल्यानें आपल्यास श्रेयस्कर. येणेंकरून धर्म, अर्थ, काम, मोक्ष चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. मागे पुढे कोणी दूषण ठेवीना. ऐसें अभ्यंतःकरणें विवेक वर्तत आले जे " हे श्रीचे वरदी राज्य. यासी दिल्लीश्वरादि कोणी स्वधर्मकर्तव्यतेस प्रवर्तले त्यांचा गर्व हत होऊन पराभव पावते जाले. याकारितां धण्यासी मर्यादेनें असावें. " ऐसें चित्तांत आणून तुमचे वडील चालत आले. तुम्हांसहि पंडित मशारनिले यांणीं सकलविद्यासंपन्न केलें च होतें. त्यामागें आपण प्रतिदिनीं पुराणश्रवण देवब्राह्मणाचे ठायीं भक्ति धरिली. धर्मशास्त्र इत्यादि सर्व हि नीत तुम्हांस करतलामल. तेव्हां सर्व अर्थ तुम्हांस न कळेसा काय ? असें असोन कोणेक गोष्टीचा युक्त विचार नाहीं. " राणोजी घोरपडियाची व आपाजी सितोळेयाची स्पर्धा वाढली " म्हणोन लिहिलें. तरी ते जाले तरा मराठे माणूस. तुम्ही सरकारकून, तुमचे वक्रानें त्यांणीं वर्तावे. कोणी वर्दराह वर्ततील तरी तुम्हा लोकांनीं बुद्धिवाद सागावा जे ' धण्यासी हे अमर्यादा कार्याची नव्हे, परिणाम लागणार नाहीं. ' ऐसे तुम्हा लोकांच्या नीति असोन ते आपण एक होऊन धन्यासी बेळा बांधिली. वल्गना हि मनःपूत केल्या. प्रांतांत उपद्वाप

६ भलत्या मार्गानें

कला. मुलूक मारिला. रयत देशांतरास उठोन गेली....प्रस्तुत तुम्ही पत्रें दिवाणांत लिहिलीं त्यांत निर्भत्सना करून लिहिलें. यांत तुम्हा लोकांस भूषण कोणतें ? पदें कागदीपत्रीं लिहावीं हे सामान्याची कमाई ! तुम्हांस योग्य नाहीं. जीं पत्रें येतात त्यांत किमपि तुमचे निष्टार्थ नाहीं. जें लिहिणें तें विडंबर लिहिता. यावरून तुम्हांविशीं धण्यास अर्ज करणारानें कसा काय करावा ? ' या राज्यांत विवेक विचार, शहाणे लोक, सभ्य, चतुर, विद्यावंत नाहींत. राजश्री शाहू राजे यांचे राज्यांत सरकारकून लक्षाचे लक्ष जिल्हे मामले खाऊन सुखरूप आहेत. ' म्हणून लिहिलें. तरी तिकडील सरकारकुनानें अथवा सरदारानें धण्यासी अमर्यादा केलीसी नाहीं. धण्यासी निष्ठेनें वर्तोन कीर्ती संपादून घेतल्या. यद्यपि कोणी अमर्याद वर्तणुकेस प्रवर्तले तरी तत्क्षणीं त्यास शिक्षा होईल. या भयें करून जे आहेत ते बहुत मर्यादेनें असतात. धणी हि त्यांचे निष्ठेप्रमाणें भूषणें वाढवितात. जिल्हे मामले देतात. त्याजला स्वामिसेवेवितरिक्त दुसरें नाहीं. सुखरूप दौलता खाऊन आहेत. त्यांची साक्षी उपसाक्षी देऊन तुम्ही लिहिलियानें साम्यतेस येणार *नाहीं. इत्यादि

---

# औरंगजेबाचा आपल्या मुलास उपदेश

औरंगजेबानें आपला मुलगा बाहादरशाहा यास उपदेशपर असें एक पारशींत पत्र पाठविलें होतें. त्याचें मराठींत भाषांतर साताऱ्या प्रतापसिंह महाराजांच्या दप्तरांत सापडलें. तें ' इतिहास आणि ऐतिहासिक ' मासिकांत ' ऐतिहासिक विविध विषयांच्या पहिल्या खंडांत' ( पृ. ८६–८७ ) छापलें आहे. त्यांतील तात्पर्य असें —

---

* मूळचें पत्र फार मोठें आहे. व जोरदार भाषेचा नमुना या दृष्टीनें तें फार महत्त्वाचें आहे. त्यांतील लहानसा भाग येथें दिला आहे.

हे प्राणा, हे प्रिया, कित्येक गोष्टी श्रेष्ट वहीवर हजरत शाहाज्याहां पातशाहा यांणीं लेहून ठेविल्या आहेत. त्या माझे हृदयांत होत्या. मी इच्छितों कीं तुम्हीं ही जिवास जपमाल करा. गोष्टींचा तपसील:—वाईट माणसांचे तोंडीं लागू नये. बुद्धिमान व सुशील यांची सोबत ठेवावी. सत्पात्रास न मागतां द्यावें. प्रयत्नें करून चांगला मनुष्य हर कोठून तलास करून संग्रहीं बाळगावा. मूर्ख येकांतांत घेऊं नये. विपत्तींत धैर्य धरावें. चांगल्या मनुष्यापासून गोष्टी गेली असतां हि त्यांस दुखवूं नये. क्षमा करावी. सांप्रत्य चांगलीं मनुष्यें फार आहेत त्यांसी संग्रहून करावें. कांहीं पदार्थ गळा पडून मागूं नये. निस्पृह लोक राज्यांत असणें ही ईश्वरकृपा आहे असें जाणावें. कुलीन व बुद्धिमानासी मसलत करावी. गैर कायदा गोष्ट ऐकू नये, व तसें वर्तूं नये. शत्रूच्या गौरवावर इतबार ठेऊं नये. जे कांहीं आरंभिलें तें सिद्ध न जालें तत्रापि खेद करूं नये.

---

# औरंगजेबाचा अंतकाळ



औरंगजेबाच्या अंतकाळाची हकीकत 'मनूची'नें विस्तृतपणें दिली असून ती 'मराठी रियासत' भाग २ मध्यें भाषांतर रूपानें आली आहे. त्यांतील महत्वाचा भाग असा आहे:—

अहमदनगरास परत येण्याचें बादशहाच्या मनांत नव्हतें. म्हैसुरावर स्वारी करण्याचा त्याचा इरादा होता. इतक्यांत बातमी आली कीं अफगाणिस्तानांत बंड होऊन शहाअलमची फौज कापली गेली. 'औरंगजेब मरण पावला असें समजून शहाजादा अजीमतारा गुजराथच्या सुभ्यावर होता तो निघुन भावाशीं लढण्यासाठीं आगऱ्यावर जात आहे आणि दुर्गादास अजीमवर चालून आला आहे' या बातम्यांनीं गोंधळून जाऊन

व वजीरांच्या वगैरे विनंतीस मान देऊन बादशहा देवापुराहून परत फिरल आणि त्यानें अजीमतारा यास परत बोलाविलें. या गोंधळानें फौजेंत व लोकांत बादशहाची फजीती उडाली ; आणि जो तो त्याची टर उडवू लागला. त्यावरून बादशहानें जास्तच चिडून असा हुकूम काढिला की आपल्या कृत्याबद्दल जो कोणी चकार शब्द काढील त्यास देहान्त शिक्षा मिळेल. या हुकुमानें लोकांचीं तोंडें इतकीं बंद झालीं कीं अहमदनगरास एवढी मोठी फौज मुक्यासारखी चालत आली. रणवाद्यें सुद्धा बंद होतीं अशा वेळीं मराठे बादशहावर चालून आले; बादशहाच्या तंबूजवळच एक हजार फौज त्यांनीं कापून काढिली ; आणि सेनापतीस पकडून त्याजपासून पांच लाख दंड घेऊन सोडून दिलें. ह्या प्रसंगीं प्रत्यक्ष बादशहा त्यांचे हातीं सहज सापडला असता. पण मराठे लोक म्हणाले ‘ बादशहास मारल्यापासून आमचा फायदा नाहीं. तो जिवंत राहिल्यानेंच आमचा धंदा चांगला चालतो ! ’

एकदा बादशहानें झुल्फिकारखानास मराठ्यांवर पाठवितांना कानमंत्र सांगितला. तो म्हणाला ‘ हें पहा, शत्रूंशीं प्रसंग पडला असतां, कपट, खोटें बोलणें, धरसोड, खोट्या शपथा इत्यादि वाटेल तो प्रकार प्रसंगानुसार उपयोगांत आणण्यास कमी करूं नको. नाहीं नाहीं त्या युक्त्या व लबाड्या योजीत जा. पण हातांत घेतलेल्या कामांत यश मिळविल्याशिवाय राहूं नको.’

एकसारखा लढाईचा विषय बादशहाचे मनांत घोळत असतो. पालखींत बसून कूच करीत असतां, तलवार म्यानांतून काढून वरचेवर पुसतो, उगाच थोडीशी इकडे तिकडे परजतो, पुनः परत ठेवतो. धनुष्य बाणांचें हि असेंच करितो. येणेंकरून तो लोकांत दाखवितो कीं ‘ मी अजून वाटेल तशी लढाई करण्यास तयार आहे. लोक आपले हुकूम मानीत नाहींत हें बादशहास ठाऊक आहे म्हणून स्वतःच लढाईवर जाण्याचा त्यानें निश्चय केला. तो सदासर्वदा ईशचिंतनांत निमग्न आहों असें दाखवितो. रमजानच्या उपवासांत जमिनीवर डोकें ठेवून सारखे चोवीस चोवीस तास

भजन म्हणत असतो. अशा वर्तनानें भोळ्या भाबड्यांच्या चित्तास वाटूं लागतें कीं बादशहा खरोखरच मोठा सत्पुरुष आहे.

परंतु त्याच्या छावणी इतकी घाणेरडी जागा पृथ्वीवर दुसरी नसेल दररोज असंख्य माणसें व जनावरें मरून एकच घाण सुटलेली असते. जनावराप्रमाणेंच मेलेल्या माणसांना दोरी बांधून ओढून नेतात आणि अंगावर असेल नसेल तें बुचाडून जवळ कोठें खाडा असेल त्यांत टाकून देतात. कोल्ह्याकुत्र्यांची मात्र चैन असते, प्रवासी लोकांस पहिला मोठा धाक मराठ्यांचा पण मराठ्यांच्या हातून सुटावें तों बादशहाचे जकात अधिकारी जास्तच लुबाडणारे आहेत. कोणाजवळ कांहीं द्रव्य आहे असा सुगावा लागला म्हणजे पुरे. खुशाल ते सर्वस्व हरण करून प्रवाशांना मारून पुरून टाकितात. अशी ही ह्या साधु बादशहाची राज्यव्यवस्था आहे.

अहमदनगरास आल्यावर बादशहास अति पस्तावा झाला. आपण कशाला ह्या मराठ्यांच्या युद्धांत पडलों असें त्यास होऊन गेलें. दिल्लीस निघून जावें तर दक्षिणचा सर्वच प्रदेश हातचा जाणार. आणि इतक्या वर्षांचे श्रम व खर्च सर्व पदरांत, म्हणून त्यास दक्षिण देश सोडतां येईना. मुलें, नातू, पणतू मिळून निदान सतरा आसामी वीस पंचवीस वर्षांच्या वरचे त्याच्या कुटुंबांत आहेत. नातवांच्या दाढ्या पिकूं लागल्या. बादशहा मरतो केव्हां आणि आपण राज्य बळकावतों केव्हां अशी प्रत्येकास विवंचना लागलेली आहे. पण मराठे लोकांस जिंकून बादशहाच्या मनास समाधान देण्याचें सामर्थ्य एकांत नाहीं. मराठे तर बेसुमार दांडगाई करूं लागले आहेत, एक टोळी दिल्लीवर; तर दुसरी बंगाल्यांत ओरिसा, डाका, राजमहालकडे; तिसरी कर्नाटकावर तर चौथी सुरतेवर असा सारखा धुमाकूळ चालला आहे. सन १७०६ त त्यांनीं सुरत, भडोच व गणदेवी लुटली. कोणत्या म्हणजे मुलखांत ते नाहींत अशी जागा नाहीं. अजीम व कामबक्ष हे दोन मुलगे बादशहाच्या मरणाची वाट पहात टपून जवळ बसले आहेत. त्यांची धास्ती बादशहास अहोरात्र लागलेली आहे. आपली फौज ह्यास मिळेल म्हणून बादशहा फौजेस नेहमीं लांबलांबच्या प्रांतांत पाठवून आपण बहुतेक सडाच राहतो. अहमदनगरास तो एकदा सडकून

# दक्षिण हिंदुस्थान.


अहमदाबाद
नर्मदा नदी
भडोच
सुरत
धरणीपूर
दमण
चांदवड
नासीक
दौलताबाद
औरंगाबाद
अजंठा
पैणगंगा नदी
जव्हार
ठाणा
वसई
कल्याण
जुन्नर
मुंबई
पनवेल
अहमदनगर
चाकण
पुणें
सुपे
परेंडा
गोदावरी नदी
राजपुरी
जंजिरा
महाबळेश्वर
जेजुरी
इंदापूर
कल्याणी
सातारा
फलटण
बेदर
रायगड
पंढरपूर
भीमा नदी
गुलबुर्गा
गोवळकोंडा
हैद्राबाद
राजमहेंद्री
कोंडापली
महाड
पन्हाळा
मिरज
विजापूर
मालखेड
कोल्हापूर
मुधोळ
मालवण
सावंतवाडी
कौलार
वेंगुर्ला
गुंटूर
फोंडा
धारवाड
अनेगुंडी
कर्नोळ
गोवा
विजयानगर
हुबळी
बेल्लारी
अंकोला
कडप्पा
चित्रदुर्ग
पेणुकोंडा
बेदनूर
बंगलोर
कोलार
आरणी
वेलोर
आर्काट
कावेरी नदी
जिंजी
पांदिचरी
म्हैसूर
फोर्ट सेंट डेव्हिड
वेलूर
कालीकत
त्रिचनापल्ली
तंजावर
कोचीन
मदुरा
रामेश्वर
सिलोन
अरबी समुद्र
बंगालचा उपसागर


लाहोर
सरहिंद
कुंजपुरा
पानिपत
विजनगर
दिल्ली
रामपूर
अलीगड
लासवारी
मथुरा
आग्रा
फरुकाबाद
लखनौ
शिकंदराबाद
कुंभेर
जयपूर
अजमीर
उदेपूर
कालपी
सिरोंज
भोपाळ
सिहोर
अमदाबाद
पेटलाद
बडोदा
नर्मदा न.
भडोच
सुरत
अशीरगड
नागपूर
बऱ्हाणपूर
दौलताबाद
औरंगाबाद
कल्याण
मुंबई
अहमदनगर
पुणे
सातारा
कोल्हापूर
हैदराबाद
बेदर
कर्नूल
कडप्पा
गोवें
होनावर
बेदनूर
मद्रास
बंगलूर
श्रीरंगपट्टण
पांडिचरी
कालिकत
तंजावर
कटक
रा ज पु ता ना
म रा ठी
सा म्रा ज्य
मो ग
म्है सू र
ने पा ळ

हिंदुस्थानचा नकाशा.

आजारी पडला तेव्हां तो मेल्याची गप्प उठली; आणि मग जो काय गोंधळ सर्व राज्यांत उडाला तो कांहीं विचारूं नये. तो खरोखरी मेल्यावर पुढें काय होणार हें त्यास जिवंतपणीं डोळ्यासमोर दिसून आलें.

अहमदनगरास पोंचल्यावर आपलें इतिवृत्त संपलें असें बादशहास वाटूं लागलें. आपण आतां थोड्या वेळानें मरणार अशी खात्री होतांच बादशहानें वजीर असदखान यास जवळ बोलाविलें; आणि त्याजकडून खजीना खोलवून फौजेचा चढलेला सर्व पगार आपल्या समक्ष देऊन टाकला. मरण समयीं तो बोलला ' मी आतां सुखानें मरणार; कारण मुसलमानी धर्माच्या शत्रूंचा नाश करण्यांत मी कसुर केली नाहीं एवढें तरी लोक माझ्याविषयीं खात्रीनें म्हणतील.' 'वडील मुलगा शहाअलम यानें आपल्या पश्चात राज्यावर यावें ' अशी व्यवस्था करण्याविषयीं जवळच्यांनीं त्यास आग्रह केला असतां तो म्हणाला मीं कोण त्यास नेमणार ! परमेश्वराच्या हातची ही गोष्ट आहे. दोन प्रहरानंतर दोन तासांनीं बादशहाचें प्राणोत्क्रमण झालें.

---

# शिवाजी महाराजांचें जयसिंगास पत्र



'नागरीप्रचारिणी पत्रिका ' नांवाच्या हिंदी त्रैमासिकांत बाबू जगन्नाथदास यानीं शिवाजी महाराजांचें, जयसिंगाच्या नांवें, फारशी भाषेंत लिहिलेलें कावितावद्ध असें एक पत्र प्रसिद्ध केलें आहे. तें कदाचित बनावट असलें तरी त्याचा लेखक औरंगजेबाचा समकालीन व इतिहासाचा मर्मज्ञ असला पाहिजे अशी फारशी भाषाभिज्ञांची खात्री झाली आहे. तें येथें सारांश रूपानें दिलें असून त्यावरून शिवाजी महाराजांच्या वेळच्या व ताराबाईच्या वेळच्या ध्येयांत किती फरक पडला होता याचा उलगडा होण्याजोगा आहे.

हे श्रेष्ठ सरदारा, तुझ्यामुळें राजपुतांची मान उन्नत आहे. तुझ्यामुळें बाबरवंशाची राज्यलक्ष्मी अधिक प्रबल झाली असून तुझें सहाय तिला मिळत आहे. हे प्रबल व प्रौढ जयशाहा ! 'सेवाचा' ( = शिवाजीचा ) प्रणाम व आशीर्वाद स्वीकार. परमेश्वरानें तुझें रक्षण करून तुला धर्माचा व न्यायाचा मार्ग दाखवावा. मी असें ऐकलें आहे कीं मजवर हल्ला करण्यासाठीं व 'दख्खण' जिंकण्यासाठीं तू आला आहेस. हिंदूंचें हृदय व नेत्र यांच्या रक्तानें तूं जगांत यशस्वी होऊं पहात आहेस. पण तुझ्या हें लक्षांत आलें नाहीं कीं यानें तुझ्या तोंडास काळोखी फासली जात आहे; कारण या कृत्यानें देशावर व धर्मावर आपत्ती ओढवली आहे. जर तूं क्षणमात्र अन्तर्मुख होऊन आपल्या हाताकडे व झग्याकडे विवेकदृष्टीनें पाहशील तर हा रंग कोणाच्या रक्ताचा आहे व या रंगाचा रंग इहपर लोकीं काय होणार हें तुला समजेल. जर तूं आपणहून दक्षिणदेश जिंकण्यास आला असतास तर माझें शिर व डोळे तुझ्या रस्त्यावर बिछान्याप्रमाणे पसरल असते. मी तुझ्या घोड्याबरोबर मोठी सेना घेऊन आलों असतों आणि देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंतची भुमि तुला जिंकून दिली असती. पण तूं सज्जनांना फसविणाऱ्या औरंगजेबाच्या थापास भुलून इकडे आला आहेस तेव्हां या वेळीं तुझ्याशीं कोणता डाव खेळावा हें मला समजेनासें झालें आहे. जर तुला सामील व्हावें तर त्यांत मर्दपणा नाहीं; कारण मर्दलोक प्रसंगाची सेवा करीत नाहींत. सिंह कधीं भित्रपणा दाखवीत नाहीं. बरें;जर मी तरवार व कुऱ्हाड यांचा उपयोग केला तर दोनहि बाजूनीं हिंदूंचीच हानी होणार.मोठ्या दुःखाची गोष्ट ही आहे कीं मुसलमानांचें रक्त पिण्याखेरीज इतर कामासाठी माझ्या तरवारीस म्यानांतून बाहेर पडावें लागेल ! जर या लढाईसाठीं स्वतः तुर्क आला असता तर आम्हां वीरपुरुषांना घरबसल्या शिकार लाधल्याप्रमाणें झालें असतें. पण जेव्हां अफजलखान व शाइस्ताखां यांच्या हातून काम झेपत नाहीं असें दिसलें तेव्हां तुला आम्हांशीं युद्ध करण्याकरितां नेमलें आहे; कारण स्वतः औरंगजेब आमचा मारा सोसण्यास समर्थ नाहीं. हिंदूलोकांत कोणी बल-

शाली राहू नये आणि सिंहांनीं आपसांत लढून घायाळ व श्रांत व्हावें आणि गिधाडांना जंगलाचें स्वामित्व प्राप्त व्हावें अशी औरंगजेबाची इच्छा आहे. ही गूढ नीति तुझ्या ध्यानांत येत नाहीं यावरून त्याच्या जादूनें तुला भूल पाडली आहे असें प्रत्ययास येतें. तूं जगांत बरे वाईट पुष्कळ प्रसंग पाहिले असशील; बागेंतून तूं फुलें व कंटक या दोहींचा हि संचय केला असशील; पण आम्हां लोकाशीं युद्ध करून हिंदूचें शिर धुळीस मिळविण्याचें काम मात्र तूं करूं नये. प्रौढ वयांत अल्लडपणा न करतां सादीच्या या वचनाचें स्मरण कर " सर्वच ठिकाणीं घोडा फेकतां येत नाहीं. कधीं कधीं ढाल फेकून पळून जाणें योग्य असतें. " व्याघ्र, मृगादि प्राण्यांवर व्याघ्रता करतो; पण सिंहाबरोबर गृहयुध्द करण्यास प्रवृत्त होत नाहीं. जर तुझ्या तीक्ष्ण तरवारींत पाणी असेल व घोडयांत दम असेल तर हिंदु-धर्माच्या शत्रूवर हल्ला करून इसलामाचें जड मूळ खोदून टाक.जर या देशाचें राज्य दारा शिकोह यांस मिळालें असतें तर आम्हां लोकांवर त्यांनीं[१] कृपा, अनुग्रह केला असता. पण तूं जसवंतसिंहास दगा दिलास व उच्च नीच यांची पारख तुला करता आली नाहीं. आजवर किरकोळ शत्रूंशीं गांठ पडल्यामुळें तुझा दम कायम राहिला आहे. परंतु तू आतां सिंहाशीं युद्ध करण्याची धिटाई करून आला आहेस. एवढया धावपळीनें तुला काय मिळत आहे ? तूं मृगजळाच्या मागें धावत आहेस. एखाद्यानें फार परिश्रम करून एखादी सुंदरी हस्तगत करावी आणि ती आपल्या शत्रूच्या स्वाधीन करावी अशा तुच्छ व्यक्तीसारखा तूं आहेस. तू या नीचाच्या

---

१ शहाजहानाचा सर्वांत वडील मुलगा दारा शिकोह हा अकबराप्रमाणें हिंदु-मुसलमानांना ममतेनें वागवावें या मताचा होता. जेव्हां त्याचा श्यामगडच्या लढाईत पराभव झाला तेव्हां तो सिंध प्रांतांतून जसवंतसिंहाच्या संमतीनें आजमीरास आला. परंतु जयसिंहानें पत्र पाठवून जसवंतासिंगाचें मन कलुषित केल्यामुळें दारास अजमीर येथें सहाय मिळू शकलें नाहीं व औरंगजेबानें शेवटीं त्याचा पराभव केला.

कृपेचा काय अभिमान धरतोस ? जुझारसिंहाच्या[2] कामाचा परिणाम काय तुझ्या लक्षांत नाहीं ?

कुमार छत्रसाल[3] यांजवर तो कशा प्रकारची आपत्ती आणूं पहात होता हें तूं जाणतोस. या खेरीज इतर हिंदुलोकांवर या दुष्टाच्या हातानें काय काय अनर्थ आले आहेत हेंहि तुला माहीत आहे. इष्ट हेतु साधण्यासाठीं तो बापाचा व भावांचा खून पाडण्यास भीत नाहीं. राजभक्तीची सबब सांगत असशील तर तूं शहाजहानाशीं कसें वर्तन केलेंस याचें स्मरण कर. जर विधात्यानें तुला अकलेचा अंश दिला असेल व मर्दपणाची तुला चाड असेल तर तूं आपल्या जन्मभूमीच्या संतापांत आपली तलवार तापीव व अत्याचारांच्या दुःखानें पडणाऱ्या आसवांनीं तिला पाणी दे. हा प्रसंग आम्ही लोकांनीं आपसांत लढण्याचा नाहीं कारण हिंदुलोकांवर या वेळीं मोठें कठिण कार्य येऊन पडलें आहे. आमचीं पोरेंबाळें, देश, धन, देव व पवित्र देवपूजक या सर्वांवर त्याच्यामुळें पराकाष्ठेचें दुःख कोसळलें आहे. आणि हाच क्रम आणखी कांहीं दिवस चालेल तर आम्हां हिंदुलोकांचें चिन्ह देखील पृथ्वीवर राहणार नाहीं. मूठभर मुसलमानांनीं आमच्या एवढ्या देशावर प्रभुत्व गाजवावें ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. पण हें प्रभुत्व त्यांच्या पराक्रमाचें फळ नव्हें. जर तुला अकलेचे डोळे असतील तर पहा. आम्हा बरोबर तो कशा गोड गोष्टी बोलतो व चेहऱ्यावर कसकसे रंग आणितो; आमच्या पायांत आमचीच बेडी अडकावतो व आमच्याच तरवारीनें आमचीं शिरें कशी कापतो तें लक्षांत घ्या. आम्ही लोकांनी या वेळीं हिंदु, हिंदुस्थान व हिंदुधर्म यांच्या संरक्षणार्थ

---

२ ओडछाचा राजा जुझारसिंह बुंदेला याने जहांगीर व शहाजहान यांची इतकी एकनिष्ठपणे सेवा केली होती कीं त्याला ' राजा ' ही पदवी व चार हजाराची मनसब मिळाली. परंतु औरंगजेबानें पुढें त्यास क्षुल्लक कारणावरून पदच्युत केले व जुझारसिहास जंगलांत दणवण करीत फिरावें लागलें.

३ छत्रसालाचा बाप चंपतराय यानें औरंगजेबास पुष्कळ वेळा सहाय दिलें होतें. परंतु पुढें किरकोळ कारणावरून वैमनस्य येऊन चंपतरायास आत्महत्या करावी लागली. नंतर छत्रसालानें शिवाजीची मदत मागितली.

फार जोराचे प्रयत्न केले पाहिजेत. तरवारीस पाणी देऊन (जशास तसें या न्यायानें) तुर्कांचा जबाब तुर्कीतच दिला पाहिजे. जर तूं मारवाडचा राजा जसवंतसिंग व मेवाडचा राणा राजसिंह यांच्याशीं ऐक्य करशील तर फार मोठें काम होईल अशी आशा आहे. चोंहकिडून उठावणी करून तुम्ही या सर्पाचें डोकें दगडांनीं ठेंचून टाका; म्हणजे कांहीं काळपर्यंत तरी त्याला दक्षिण प्रांतांत आपलें जाळें पसरतां येणार नाहीं. तेवढ्यांत मी व माझे भालेबहाद्दर वीर विजापूर व गोवळकोंडा येथील दोनहि बादशहांना जिकतो मेघासारखी गर्जना करणाऱ्या सैन्यानिशीं मुसलमानांवर तरवारीचा पाऊस पाडीन;आणि सर्व दक्षिण देशांच्या पटावरून इस्लामाचें नांव किंवा चिन्ह धुऊन टाकीन.त्या नंतर कार्यदक्ष वीर व भाला चालविणारे घोडेस्वार यांना बरोबर घेऊन प्रचंड लाटा व कोलाहल माजवणाऱ्या नदीप्रमाणें दक्षिण देशांतील पहाडांतून बाहेर पडून मैदानांत येईन; आणि अत्यंत जलदीनें तुम्हा लोकांच्या सेवेस हजर होईन; व व तुम्हांस हिशेब विचारीन. चोहीकडून भयंकर युद्ध उपस्थित करून रणांगणांत दंगल माजवून आम्ही लोक आमच्या सेनेच्या लाटा दिल्ली येथील त्याच्या जर्जर झालेल्या घरांत पोहचवूं. म्हणजे त्याच्या नांवांचे औरंग (राजसिंहासन) राहणार नाहीं व जेब (शोभ) हि राहणार नाहीं. तसेच त्याची अत्याचाराची तरवार राहणार नाहीं व कपटाचें जाळेंहि राहणार नाहीं.शुद्ध रक्तानें भरलेली नदी वाहवून आम्ही आमच्या पितरांच्या आत्म्याचें तर्पण करूं. हें काम कांहीं फार कठिण नाहीं. फक्त हृदय व डोळे आणि हात यांची अवश्यकता आहे.दोन अंतःकरणें एक होतील तर पहाड तोडतां येईल व मोठ्या सैन्याच्या समूहाच्या ठिकऱ्या उडवितां येतील.या विषयासंबंधीं मला तुझ्याशीं फार बोलणें चालणें करावयाचें आहे;तें पत्रांत लिहिणें सयुक्तिक नव्हे. तूं म्हणशील तर मी समक्ष तुझ्या भेटीस येईन व माझा बेत तुला कळवीन.तरवारीची शपथ,घोड्याची शपथ,देशाची शपथ व धर्माची शपथ-घेऊन मी सांगतों कीं असें करण्यानें तुझ्यावर आपत्ती येणार नाहीं.अफजलखानाचा शेवट कसा झाला हें लक्षांत आणून तूं शंकित होऊं नको. त्यानें बाराशे लढवय्ये हबशी माझा घात करण्यासाठी ठेवले होते. त्याच्यावर मी

प्रथमच हात चालविला नसता तर या वेळीं हें पत्र तुला कोणी लिहिलें असतें? मला तुझ्यापासून अशी भीति नाहीं कारण तुझ्या माझ्यांत कांहीं शत्रुत्व नाहीं. जर मला तुझे उत्तर अनुकूल आलें तर रात्रीं मी एकटा तुझ्या भेटीस येईन. शाइस्तेखानाच्या खिशांतून मी जें पत्र काढून घेतलें आहे तें गुप्त पत्र मी तुला दाखवीन. तुझ्या डोळ्यावर संशयाचें पाणी शिंपडून तुझी सुखनिद्रा नाहीशी करीन. तुझ्या स्वप्नाचा खरा खरा फलादेश करून नंतर तुझा जबाब घेईन. जर या पत्राचें उत्तर माझ्या मनाजोगें न येईल तर मी आणि माझी तीक्ष्ण तरवार आहे व तुझी सेना आहे. उद्या सूर्य आपलें मुख संध्याकालांत लपवील तेव्हां माझा अर्धचंद्र ( तरवार ) म्यानांतून बाहेर पडेल. बस्स. कल्याण असो.

---

# स्वामिकार्यार्थ आत्मार्पण करणारा वीर



खंड १७ लेखांक २९ ] श्री [शके १६२५ पौष शुद्ध १५

राजश्री शामजी हरी नामजाद व कारकून
वर्तमान भावी प्रांत मावळ गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक शंकराजी नारायण सचिव. नमस्कार.सुा सन अर्बा मया व अलफ.मा प्रतापजी हैबतराऊ सिलिंबकर देशमुख तर्फ गुंजनमावल याचे बाप संताजीराऊ सिलिंबकर वतनामुळें राजगडीं नामजाद ठेविले असास किल्ले मजकुरास औरंगजेबाचा परीघ आला. खासा मोर्चा माची सुवेला किल्ले मजकूर येथें तटानाजिक भिडला आणि लगट केला. ते समईं संताजीराव याणीं हिंमत धरून गनीमासी युद्धप्रसंग शर्तीनसी करून गनीम मारून काढिला. तों अकस्मात गनीमाक-

कडील भांडियांचा गोळा येऊन लागतांच स्वामिकार्यावरी ठार जाले. संताजीराऊ याणी शर्ती करावयाची तैसी केली. गनीम मारून काढिला. मशारनुले स्वामिकार्यावरी खर्च जाले. अशास इनामाची तिजाई व हकाची चौथाई देशमुखापासून दिवाणांत वसूल घ्यावया तर्ह आहे. त्यास प्रस्तुत संताजीराऊ स्वामिकार्यावरी खर्च जाले; याकारितां प्रतापराव सिलंबकर देशमुख ता। मजकूर यास इनामाची तिजाई व हकाची चौथाई माफ केली असे. तरी सदरहूचे तोष्ट साल दरसाल लावीत नव जाणें. प्रतिवर्शी नूतन पत्राचा आक्षेप न करणें. पत्राची तालीक लेहोन घेऊन असल पत्र भोवाटियास फिराऊन देणें. छ १२ रमजान सुरु सूद बार पौ छ २१ मिनहू.

---

# औरंगजेबाची कानउघाडणी



औरंगजेबाचा एक मुलगा प्रथम संभाजीकडे आला आणि नंतर तेथून इराणास गेला. तो इराणच्या शहाची मदत घेऊन हिंदुस्थानावर केव्हां चाल करून येईल याचा नेम नाहीं अशी धास्ती औरंगजेबास वाटत असल्यामुळें आपल्या मुलानें परत आपणाकडे यावें अशा हेतूनें औरंगजेब पत्रें पाठवीत असे. त्यास उत्तर देतांना शहाजादा अकबर यानें एका पत्रांत बापाच्या कारकीर्दीवर खरमरीत टीका केली आहे. तें पत्र ' मनूची ' नें समग्र दिलें आहे. त्यांतील मुद्याचा भाग असा आहेः—

बाबा, तुमचेंच उदाहरण मी नेहमीं डोळ्यापुढें ठेविलें आहे. इतकें चांगलें उदाहरण दुसऱ्या कोणाचें सापडणार ? ज्या रजपुतांनीं अकबर, जहांगीर व शहाजहान यांस मनापासून साह्य केलें त्यांचा आश्रय मी

---

१ तोफेचा २ मेले ३ सरकारांत ४ ठराव, वहिवाट ५ तगादा, मागणी ६ नक्कल

केला यांत वाईट तें काय केलें ? जसवंतसिंग तुमच्या भुलथापास भुलला नसता तर तुम्हीं आज हिंदुस्थानचे बादशहा झाले नसता. असे हे रजपूत लोक आपल्या राज्याचे खांब होते. पूर्वी फौजेंत रजपूत पाहिजे असले म्हणजे एकाचे ठिकाणीं शंभर उमेदवार येत. हल्लीं तुम्हीं तीन तीन वर्षे डांगोरा पिटून सुद्धां दहा पांच माणसें जमा होत नाहींत. हा प्रभाव कशाचा ? आज इतके तुमचे अंमलदार आहेत, पण एकाची तरी तुमच्यावर खरी भक्ति आहे काय ? फौजेतील सर्व लोक दारिद्री झाले आहेत. कोणापाशीं हत्यार नाहीं. एक कवि किंवा ग्रंथकार निपजत नाहीं. व्यापाऱ्यांची व धनिकांची लूट होते व खून होतात. रयत धुळीस मिळाली, दक्षिणचा प्रदेश जो पूर्वी केवळ स्वर्गतुल्य वाटत होता तो हल्लीं ओसाड, निर्जन व निर्धन झाला आहे! विजापूर, औरंगाबाद हीं केवढीं मोठीं व सुंदर शहरें, पण हल्लीं मातीशिवाय तेथें जास्त काय आहे. तुम्हींच सांगा, ह्या सर्वांचें कारण काय तर तुमचा परधर्मद्वेष. तुम्हीं हिंदूवर जिझिया बसविला, त्यानें लोक सर्व तुमच्यावर उठले; जाळपोळ व लूट करू लागले, त्यानेंच देश धुळीस मिळाला.

तुमच्या राज्यांत एक तरी प्रकार असा आहे काय कीं ज्याची मला तारीफ करता येईल ? थोर थोर पुरातन घराणीं सर्व धुळीस मिळालीं. सर्वत्र लुच्चांचा बाजार भरला आहे. राज्यकारभार सर्व हलकट लोकांच्या हातांत आहे. हातांत जपमाळ, काखेंत कुराण आणि डोक्यास मोठेसें पागोटें असलें म्हणजे तुमचा त्यावर पूर्ण भरंवसा. अशी मंडळी तुमच्या राज्याचे आधारस्तंभ !

असा सर्व राज्याचा नाश झालेला मला पाहवेना. तेव्हां अत्यंत कष्टानें मी देशत्याग करून इकडे आलों. आतां मी शांत आहे. परमेश्वर तुम्हांला दीर्घायुष्य देवो. मीच परत येऊन राज्य करावें म्हणतां, त्यास तुम्ही राज्य सोडून मक्केस चालते व्हा म्हणजे मी येऊन दाखवितों कसें राज्य करावयाचें तें. आजपर्यंत काय करामत होती ती तुम्हीं करून दाखविलींत. आतां वृद्धापकाळीं परमार्थसाधनच तुम्हांस योग्य आहे. जास्त लिहून तुम्हांस त्रास होईल म्हणून पत्र पुरें करितों.

# भुतें घालणें व देवभोळेपणा



खंड १७ लेखांक ४३ ]        श्री. श्रीरोहिडमल

करीना बाबाजी कोंढालकर यास चांदजी कोंढालकर यानें भुतें लाऊन घर बुडाविलें. गुणाजी कोंढालकर दसरियाचा घट उठविला ते दिवसीं मुखवटा व रुमाल भगतानें श्री यास वाइला होता. तो गुणाजी घेऊन जाऊ लागला. त्यावर चांदजी बोलिला कीं " गुणाजी पाटील ! हा रुमाल माझे तरवास बांधावयास देणें. " गुणाजी बोलिला कीं " चांदजी ! हा देवाचा रुमाल देवास असों दे; तुला हि देत नाहीं, मी हि घेत नाहीं. आल्या दसरियास देवाचा देवास पांघरून " म्हणून गुणाजी बोलिला. त्यावर गुणाजीची व चांदजीची बोली जाली, म्हणऊन कटकटले. तेच दिवसीं गुणाजी घरीं गेला. घरीं गेल्यावर त्याला हींव येऊन डोई दुखू लागली, म्हणून बाळोजी देवास अंगारियास आला. देवास प्रसाद लाविले. देवानें प्रसाद दिले कीं " चांदजीनें देव व भुतें पेंसली " म्हणून बाळोजी चांदजसि म्हणूं लागला कीं " तूं माझ्या बा ला अंगारा दे. " तो अंगारा देईना मग च्यार दिवसांनीं गुणाजी मेला. त्यावर मूठमाती द्यावयास श्रीजननीजवळ गेला. तेथें बाळेजी चांदजीस बोलिला कीं " तूं रगताचा टिळा लाविलास." चांदजी सारे गांवकरियादेखत बोलिला कीं " मी टिळा लाविला. अझून काय जालें ? " त्यावर गुरें वासरें कितेक मेलीं. बैल मेले. मी कोठें गेलों नाहीं. त्या देवास पुढें तो म्हणे कीं " माझी लाग मीच मारतों. त्यास माझे लेक दोन. थोरला लेक भुतांनीं मारिला. धाकटा लेक याचे डोळे गेले. आंधळा जाला. " या उपर सन खमस खमसैनांत एक म्हस दोन महिने चारापाणी खाईना. देवास पुसे . तो म्हण " माझी लाग " त्यावर चापजीस म्हणे कीं " तू माझी म्हस वाचव " तो कांहीं आंगारा नेदी. मग मी श्री राजजाईस गेलों. तेथें मनास आणिल. तिनें सांगितलें कीं " चापजीनें तुजवर देवभुतें घालून तुझें घर व तुझा बाप—लेक मारि-

ला हें खरें. तूं त्याच्या गला पड " म्हणऊन गांवास आलों. श्री राणजाईचा भगत राणोजी गौलाहि आणिला. देवळीं पांच जण भले लोक मेलऊन राणोजी गौलीयानें श्री रोहिडमलास प्रसाद लाविले. त्याणेंहि प्रसाद दिलें कीं " चापजीनें भुतें लाऊन याचें घर मारिलें हें खरें ." तो हुबर घालूं लागला कीं " माझी भुतें नव्हत." त्यावर राणो गोला चापजीस बोलिला कीं " तू हि भगत आहेस. तूंच आपले हातें प्रसाद लाव. आणि देवास पूस हें खरें कीं काय ? " मग चापजीनें आपल्या हातें प्रसाद लाविले ' मी भुतें लाऊन बालोजीचें घर बुडाविलें हें खरें कीं काय ? ' देवानें प्रसाद दिला कीं " चापजी ! तूच भुतें लाऊन बालोजीचें घर बुडाविलें हें खरें . " ऐसें पडतालेयोनसीं सांगितलें. मग चापाजी बोलिले कीं " बरें . तुझे अंगीं कलंक लागिले. आतां हे ह्मस पाय पसरून मरते . तिला निकालमपण अंगारा लाव तें उठली म्हणजे हें खरें. नाहींतर देवभगत सांगतात हें अगदीं लटकें . " त्यास चापाजीनें त्याचे ह्मसीस अंगारा लाविला. दोन महिनें म्हस पडली होती ते उठोन गुरांत जाऊन चरो लागली इत्यादि.

---

# ४ दुहीचे दुष्परिणाम



मराठ्यांना बुडविण्यासाठी औरंगजेब महाराष्ट्राच्या उरावर वावरतांना दिसत होता तों पर्यंत स्वामिनिष्ठा व संकटाची जाणीव या दोन भावनांनीं प्रेरित होऊन मराठे एकजुटीनें वागले. शिवाय प्रत्येकास जहागीर व लूट मिळविण्याची पूर्ण मुभा असल्यामुळें स्वामिनिष्ठा व स्वार्थ यांचाहि मेळ बसे. पण औरंगजेबाच्या मृत्युनंतर शाहूची सुटका झाली तेव्हां सर्वत्र परिस्थिति पालटली. मोंगलांचा निःपात झाल्यामुळें महाराष्ट्राच्या स्वातंत्र्या-

वरचें संकट टळलें. परंतु कोल्हापूरकर व सातारकर असे दोन धनी झाल्यामुळें मराठ्यांची स्वामिनिष्ठा दुभंगली. व ज्या धन्याकडून आपणास अधिक जहागीर किंवा मोठी पदवी मिळेल त्याच्या पक्षास आपणास मिळण्यास हरकत नाहीं असें महाराष्ट्रांतील सरदारांना वाटूं लागलें. या दुहीनें दाहा बारा वर्षें महाराष्ट्रास फारच हतबल केलें. कारण शाहु व ताराबाई यानीं प्रतिपक्षांकडील सरदार फितूर करून आपला पक्ष प्रबळ करण्याचा प्रयत्न केला. शेवटीं कोल्हापूरदरबारांत दुफळी माजून व ताराबाईस कैदेंत टाकून राजसबाईचा मुलगा संभाजी गादीवर आला तेव्हां ही यादवी कमी झाली. परंतु सातारकर व कोल्हापूरकर यांमधील भाऊबंदकीचें भांडण ताराबाई व राजसबाई यांच्या मधील सवतिमत्सरानें तात्पुरतें मंदावलें इतकेंच. त्याचा बीमोड असा केव्हांहि झाला नाहीं. ही दुहीची कीड मराठी राज्यास अगदी अखेरपर्यंत भोंवली. या यादवींत कोणता सरदार कोणत्या पक्षास मिळाला ही गोष्ट फारशी महत्वाची नव्हती. परंतु स्वार्थासाठी फितूर होऊन शत्रुपक्षास मिळण्याचें जें वाईट वळण या वेळीं लागलें तें शेवटीं मराठ्यांच्या नाशास कारण झालें.

——

# आपापसांत फंदफितूर



[ १६३३ अ. भाद्रपद व. ७

स्वास्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे अधिक भाद्रपद बहुल सप्तमी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणीं समस्त सेना-धुंरधर-विश्वासनिधि राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराव सेनापति जफ्तन मुलूख यांस आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही विनंतीपत्र शुद्ध एकादशीचें पाठविलें तें काल षष्ठी गुरुवारीं प्रविष्ट जाहलें. सारांश लिहिला कीं "आपली निष्ठा स्वामींच्या चरणीं. स्वामींची सेवा करावी आणि यशकीर्ति

संपादावी. दुसरे राजश्री जाधवराव स्वामींच्या पायाव्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नव्हते. राज्यांत दुही निर्माण जाहली ते प्रसंगीं त्यांनीं प्रतिज्ञापुरःसर स्वामीसंनिध बोलोन स्वार जाहले. परंतु कालगतीनें सर्वांची बुद्धि एका प्रकारें जाहली. तन्मुळें त्यांचा हेतु पूर्ण करावा हें अंतःकरणीं धरून आजीपर्यंत याचमानी राहून राजश्री आप्पाजी थोरात, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे आदिकरून सामील करून घेऊन, शाहूनीं केल्या लोभाची आस्ता न धरितां, त्यासी वैमनस्य दर्शवून राजश्री परशराम पंडित प्रतिनिधी व राजश्री खंडेराव दाभाडे स्वामींच्या लोभाचे सेवक ह्या प्रसंगांत असावे या अर्थें " आपल्या समाधानास या उभयतास पाठवणें " म्हणोन मुद्दा सांगोन पाठविला. त्यावरून उभयतांस व राजश्री रामसिंग मोरे यास शाहूनीं पाठवून दिल्हे. त्यांच्या व आपल्या भेटी जाहल्या; व राजश्री हैबतराव निंबाळकर सरलष्कर आले. यांचीही भेटी जाहली. तों अगोदर आपण व राजश्री थोरात, खंडेराव दाभाडे व संताजी पांढरे बसोन घाट घटला होता. तो सरलष्कर यांस सांगतांच त्यांचे चित्तीं हेंच होतें. मग हे व आम्हीं अवघें वर्तमान सरदार कटांत घेऊन राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यांस विचारांत घेतले. त्यास स्वामींची द्वाही फिरविली. खुशाली केली आणि गडकिल्यास आम्हीं आपलीं व पंडित मशारनिल्हेचीं पत्रें पाठविलीं आहेत. याउपरी नीट सातारियाखाले चालोन जाऊन राज्यांतील दुही निःशेष करितों. स्वामींनीं खुशाली केली * पाहिजे " म्हणोन हें वर्तमान विशदें लिहिलें. तें श्रवण गोचरें करून संतोषातिशय जाला, तो पत्रारूढ किति काय म्हणून करावा ? कार्यकर्ते, पराक्रमी, मायेचे हिंदु सेवक असावे ते तुम्हासा-

---

* येथपर्यंत धनाजी जाधवरावाचा मुलगा चंद्रसेन यानें शाहूच्या पक्षांतील मंडळी फोडण्यासाठी काय काय डाव योजले आहेत याची हकीकत देणारें जें पत्र धाकट्या शिवाजीस पाठविलें होतें त्याचा सारांश झाला. यास उत्तरा दाखल कोल्हापूर दरबाराकडून हें पत्र लिहिण्यांत आले आहे. त्याचा मुख्य भाग येथून सुरू झाला.

रिखेच कृतकर्मे असावे. पूर्वोत्तर स्वामींचे कृपेचा अर्थ व रा ( धनाजी ) जाधवराव यांनीं कैलासवासी रा स्वामींचे वेळेपासून राज्याभिवृद्धी विषयीं केले श्रम--साहस व सांप्रत दुहीमुळें राज्याभिवृद्धीस जाला अपाय, चित्तांत आणून, पुढें स्वामींचें राज्य वृद्धीतें पाववून यशकीर्ति संपादावी हें मनीं धरून हें महत्कार्य सिद्धीतें पाववून जो अर्थ विशदें लिहिला तो उचित व यथार्थच लिहिला. तरी तुम्ही दीर्घद्रष्टेच आहां. हें राज्य समग्र तांम्राक्रांत जालें असतां कैलासवासी स्वामींनीं लहानापासून थोरास आपली माया लावून अवघियांवरी सदयत्वें कृपामृतवृष्टी करून दिनप्रति-दिनीं राज्य वृद्धिंगत पावविलें. ते प्रसंगीं कैलासवासी स्वामींचे संपूर्ण कृपेस पात्र एक जाधवराव जाले ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकुमबारदारी एक-निष्ठेवरी जाले. राज्याभिवृद्धीविषयीं त्याहीं कांहीं सामान्य कसाला श्रमसा-हस केला नाहीं. जीविताची तमा न धरितां स्वामिकार्यीच तत्पर राहून कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला ते समयीं कर्नाटकांत फौजांनी धावोन जाऊन कैलासवासी स्वामीस प्राप्त जालीं संकटें निरसन करून स्वामिगौरवाचें सुख त्यांहींच अनुभविलें व सेवाधर्मे करून त्यांहींच कैला-सवासी स्वामींस संतुष्टविलें. तेव्हां कैलासवासी स्वामींस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय कीं प्राण होते असें नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरं-वसा दृढ मनीं मानिला होता. तदनुरूपच राव मशारनिल्हेनीं स्वामींचें चरणीं चित्तालय करून औरंगजेबासारखा मोठा शत्रु राज्यांत पसरला असतां आपल्या शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगें शत्रूचा हिसाब न धरितां राज्याच्या संरक्षणार्थ असाधारण कसाला केला. स्वामींच्या तपोबलप्रभावें-करून शत्रु पराभव पावविल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त जाहलें. तदनंतर समुद्रवलयांकित अवनिमंडळ निःकंटक करून स्वामींचें शासन चालवावें आणि कृतकार्य व्हावें हा हेतु रावमशारनिल्हेनीं धरून हुजूर येऊन मनसबा योजिला. तों दुहीचा प्रसंग प्राप्त जाहला. ते समयीं स्वामींस दुसरा कोणाचा भरंवसा होता कीं काय ? दुही निःशेष करावी हे आंगेजणी राव मशारनिल्हेनीं करून प्रतिज्ञापुरःसर स्वामींचे सेवेसीं संतोषकारक व हौस जाणून स्वार होऊन गेले. त्यास वैपरीत्य कालवशें सर्व लोकांस एक प्रकारें

मोह प्राप्त जाहला. तन्मुळें राव मशारनिल्हे कृतसंकल्प सिद्धीतें न पावला. त्यांचे पुत्र तुम्हीं. त्याच सारिखे कृतकर्मे आहां. तुम्हां वितरिक्त त्यांचा संकल्प शेवटास नेणें आणखी कोण करूं पाहतों ? व दुहीमुळें राज्याभिवृद्धीस अपाय जाला हा विचार मायेच्या सेवकाविना दुसारियाचे मनांत येऊं पहातो कीं काय ? ज्यास यश कीर्ति संपादणें अगत्य त्यासच हा विचार. ते तुम्ही मायेचे यशकीर्त्या दक्षित सेवक म्हणूनच हा दीर्घदृष्टीचा विचार तुमच्या चित्तांत आला; आणि जाधवराव यांचा कृतसंकल्प 'दुही निःशेष करून समुद्रवलयांकित पृथ्वींत स्वामीचें शासन चालवून कृतकार्य व्हावयाचा' होता तो सफल कराव्या उदित होऊन बुद्धिवैभवेंकडून समग्र सेना नानाप्रयत्नें व द्रव्यसाहित्येंकडून ज्यांचे त्यापरी सजली जाऊन आपल्या विचारांत घेऊन राजश्रि परशराम पंडित प्रतिनिधी व खंडेराव दाभाडे व मानसिंग मोरे यांस आपणाजवळीं आणावयाचा विचार करून त्यांस आणून एकाग्रतेनें संपूर्ण स्वामीचें राज्य स्वामीचे सेवेसीं तत्पर केलें आणि आपलें कर्तेपण प्रगट करून जाधवरावांचा संकल्प सिद्धीतें पावविला. ही गोष्ट कांहीं सामान्य केली नाहीं. हे तुमची दीर्घदृष्टी व आंगेजणी व बुध्दीचे वैभव व शूरत्वाचा प्रसंग चित्तांत मनन करून पाहतां दुसरी साम्यता आहे असें नाहीं. अतएव स्वामींच्या राज्याचा अभिमान श्रीस संपूर्ण आहे; व जाधवराव याणीं कैलासवासी स्वामींची सेवा त्रिकर्ण बुद्धीनें करून संपूर्ण कृपा संपादिली होती. तद्योगें तुम्हांसारिखे बुध्दिप्रगल्भ पराक्रमी पुत्र त्यांस होऊन स्वामींचे शेवेसी तत्पर जाहले. हे कडून स्वामींनीं राज्यांतील दुही निःशेष मानून संपूर्ण पृथ्वींत स्वामींचें शासन चाललेंच असें मनांत आणून तुमच्या भरोशानें स्वामी निश्चित आहेत. तदनुरूपच तुम्ही सातारियाखाले येऊन निग्रह करावा आणि राज्यांतील दुही नाहीशी करावी ऐशा विचारें फौजानिशीं येत आहां. ती गोष्टीची त्वरा करून योजिला मानस हा पराक्रमेंकडून अल्प कालें सिद्धीतें पाववून पुढें अनुपदेंकडून ताम्राक्रांत राज्य साधावें. एकाग्रता होय तें करणें आणि संतोषाचें वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. स्वामींनीं खुशाली केली पाहिजे म्हणून तुम्हीं हर्षेंकरून लिहिलें तरी यापेक्षां दुसरा संतोष काय आहे ?

तुमच्या विंनतिपत्राचा लेखनार्थ श्रवण होतांच स्वामींनीं तोफांचे आवाज करवून खुशाली कर्तव्य ते बहुत केली. राजश्री परशरामपंडित प्रतिनिधी यांस स्वामींच्या चरणावितरिक्त दुसरा निजध्यास नाहीं. त्याचे अंतरीं हाच मानस होता तो श्रीकृपें अविघ्नतेनें घडला; आणि त्याणीं आपण एकरूप होऊन गड किल्यांस पत्रें पाठविलीं. स्वामींनीं पंडित मशारनिल्हे स्वामीचे मायेचेच सेवक आहेत. स्वामीच्या राज्याभिवृद्धीविषयीं त्याहीं बहुत श्रम केले आहेत. अपायेकरून त्यास दगा जाला होता तेहीं राजश्री जाधवराव याणींच त्यांचा अभिमान धरून संकटांतून रक्षिलें. त्यामागें तुम्हीं त्यास अंतर न दिल्हें. हा सविस्तर प्रसंग--तुमचे मायेचा—पंडित मशारनिल्हे यानीं हुजूर लिहिला होता. तदनुरूप स्वामींनीं त्यास समाधानयुक्त पत्र विस्तारें पाठविलें आहे. गडकिल्ले यांस त्याहीं तुम्ही पत्रें पाठविलीं. गोष्ट उत्तम केली. ते तुम्ही अखत्यारींचे सेवक आहां. पुढें हि त्यास जें लिहिणें तें लिहिणें. तें लिहून समस्त स्वामींच्या पायाशीं एकनिष्ठेनें वर्तत तें करणें. स्वामींनीं हि हुजरून गड किल्लीयांस व हशाम लोकांस पत्रें पाठविलीं आहेत. " राजश्री हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांची चित्तवृत्ती स्वामींचे चरणीं सदृढ आहे. स्वामींनीं मशारनिल्हेस समाधानपत्र पाठविलें पाहिजे " म्हणून; तरी त्यांचे बाप राजश्री हणमंतराव होते त्याणीं कैलासवासी स्वामींचे वेळेपासून त्यांची व स्वामींची सेवा निष्ठेनें करून स्वामींची कृपा बहुतच संपादून घेतली होती हें प्रसिद्ध आहे. त्यामागें मशारनिल्हे यानीं हि आपली माया स्वामींस बहुतच लाविली आहे. त्यांचे सर्व प्रकारें स्वामींस अगत्य आहे. हल्लीं तुमच्या लिहिण्यावरून स्वामींनीं त्यांस समाधानपत्र सादर केलें आहे. " राजश्री रावजी थोरात व खंडेराव दाभाडे व संताजी पांढरे याणीं ये प्रसंगीं बहुतच कमाला करून कार्याची प्रघटना केली त्यास समाधानपत्रें पाठवावी. स्वामी धनी आहेत " म्हणोन तरी मशारनिल्हेनीं सेवाधर्मासहित उत्तमपणास योग्य चित्तीं तोच प्रसंग करून तुमच्या चित्ताचें ठायीं एकरूप होऊन महत्कार्य संपादिलें; येणेंकरून स्वामी त्यावरी संतुष्ट आहेत. त्यांची हि विंनतिपत्रें हुजूर आलीं होतीं. त्यांनीं तुमच्या कर्तव्याचा प्रसंग बहुतच विशदें लिहिला आहे. तरी ते

सेवक लोभ करून चालवावे असेच आहेत. स्वामींनीं त्यास चित्तानुरूप समाधानपत्रें पाठविलीं आहेत. वरकड हि तुमच्या लिहिण्याप्रमाणें ' राजश्री मानसिंग मोरे, राजश्री शाहाजी निंबाळकर, हणगोजी नाईक निंबाळकर व मरिजी पवार आदिकरून कुल सरदारांस समाधानपत्रें व नावांस जागेत्रून पत्रें पाठवावया आज्ञा केली पाहिजे,''म्हणोन लिहिलें.त्याप्रमाणें समाधानपत्रें पाठविलीं आहेत. समस्तास देऊन दिलासे करणें. अतःपर कोणी सेवकलोकीं विलक्षण कालगर्त.करून घडोन आल्या आचरणाचा संशय मनांत आणावा असें नाहीं. मध्यें कांहीं दिवस कालाची कुटिल गति होती. अन्यथा तुम्हांसारिख्या सेवकलोकांस आणि स्वामींच्या पायाचा वियोग होणें होता कीं काय ? याकारिता स्वामींच्या चित्तीं कोणी एकाचें वैषम्य कीं संदेह नाहीं. अवध्यांहीं तुमच्या विचारें स्वामिकार्याची आंगेजणी करून कार्यसिध्दी करावी. अशाचि स्वामींनीं अवधियास आज्ञापत्रीं आज्ञा केली आहे. याउपरि शीघ्रतेनें चित्तानुरूप स्वामिकार्य सिध्दीतें पाववून संतोषाचें वर्तमान लिहून पाठविणें. तुम्हीं वंशजपणास जे गोष्टी योग्य तेच गोष्टी संपादून कीर्तीस पात्र जाला. सर्व गोष्टींनें मातोश्री साहेब व स्वामी हि बहुत संतोषी जाहले. याउपरीं दुसरें जें कर्तव्य तुम्ही लिहिलें तें निःशेष करून स्वामीसंतोषाचें वर्तमान लिहून पाठवून द्यावें. बहुत लिहिणें तरी तुम्ही सुज्ञ असा. मोर्तब असें [ भारतवर्ष, पत्रें, लेखांक ५० ]

---

# देशमुखीसाठीं एका जातीच्या दोन जाती



वाईच्या देशमुखीसाठीं शिवशाहींत व मोगलाई अमलांत पिसाळ मंडळींचें आपसांत तीस चाळीस वर्षेपर्यंत एकसारखें भांडण सुरू होतें. संभाजी छत्रपतीच्या कारकीर्दीअखेर सूर्याजी पिसाळानें रायगड हस्तगत करण्यास औरंगजेबास मदत केली, व पुढें तो बाटून मुसलमान हि झाला.

यानंतर शाहूच्या कारकीर्दीत हा तंटा पुनः उपस्थित झाल्यावेळीं शाहूनें धनाजी जाधवाचें सांगणें न ऐकतां निम्मी देशमुखी पुनः सूर्याजीकडे देण्याचें ठरविलें. त्या वेळीं सूर्याजी विरुद्ध भीड घालू पाहणाऱ्या धनाजीस सूर्यराव मोठ्या अभिमानानें सांगतो कीं ' मी एका जातीच्या दोन जाती पाहून देशमुखी सोडविली.'

श्री

देशमुखी प्रांत वांई राजश्री नागोजीराव नाईक पिसाळ मूळ पुरुष याशी नऊ गांव चालत होते. त्यांनीं आपले पुत्रांस गांव वाटून दिल्हे.

याशी तपसील:—

थोरले बायकोचे पुत्र ५ पांच.
त्यापै।। दोघांचें नकल झालें.
तिघे पुत्र राहिले. यांशीं गांव दिल्हे ४।। याशीं तपसील.
२ राजश्री सूर्याजीराव पिसाळ.
१ चांदक संमत हवेली.
१ तडवळें संमत कोरेगांव
मोकदम तेथील धुमाळ व झांजुरणें
१ राजश्री रामोजी नाईक
याशी लहासुरणें संमत कोरेगांव.
साळ याशी मरटें संमत निंब.
-।।- मौजे वोझर्डें निम्में निम्में
तिघाशे देशमुखीचा हकदारी
हिशास रुपये ५ पांच
११

धाकटे बायकोचे पुत्र तीन.
यांशीं गांव ४।।.
यांशी तपसील.
-।।- मौजें वोझर्डें निमे.
३ संमत कोरेगांव.
१ कटाकपूर किन्हई भोसल्याची
१ पाडळी फाळक्याची
१ सोनकें संमत वाघोली धुमाळाची.

सदरहू येणेंप्रो। वांटणी आपले आपली खात होते. कोणाचा तंटा भांडण हा कालपर्यंत नाहीं. सदरहू न्याहारखान गोरी यानें मातुश्री पिलाऊ यांजपासून देशमुखी घेतली. आणि फिरोन कोणी पिसाळाची देशमुखी म्हणेल त्यास पायलीभर मीठ चारावें असें झालें. यावर राजश्री सूर्याजीराव पिसाळ यांणीं पातशाहापाशीं जाऊन गळा कफणी घालून दिवा दिवट्या लाऊन फिर्याद केली. मग पातशहापाशीं अर्ज करून न्याहारखान तगीर केला. ते समयीं वतनास खर्च सावकाराचें कर्ज घेऊन दोन लक्ष रुपये खर्च केला. पादशाहास व दरबार खर्च करून वतन बहाल करून घेतलें. मग सूर्याराव वांईस आले. ऐशियास पिलाऊ पिसाळ यांशीं पुत्र नव्हता. त्यांणीं आपले दीर गंगाजी नाईक यांचा पुत्र दत्ताजी नाईक आपले ओटियांत पुत्र म्हणून घेतलें. ते व सूर्याराव एक होऊन पातशहापाशीं वतनाचा मजकूर जो जाला, तो सूर्याराव यांणीं दत्ताजी नाईक यांशीं निवेदन केला. त्यावरून दत्ताजी नाईक समाधान पावले. दत्ताजी नाईक सूर्याराव यासी बोलिले जेः—पिसाळाचे वंशीं तुम्ही खस्त करून गेले होते, त्यास दोन लक्ष रुपये खर्च करून वतन सोडविलें, त्यास जो खर्च पडला तो तुम्ही सांभाळणें, आणि देशमुखीचें वतन निम्में तुम्ही खावें, निमें आपण खावें ऐसा करार होऊन श्रीकृष्णातीरीं रवीधोंडीजवळी देशपांडिये व देशक व कसबे मजकूरचे पाटील व चापशेट व म्हाजण समस्त मिळऊन गंभीर सागर गोसावी याचे मठीची एक रोटी आणून दत्ताजी नाईक याणी आपले हातीं घेऊन श्रीकृष्णेंत उभे राहून रोटी निम्में बरोबर करून अर्धी रोटी आपले लेंकाचे हातीं केशवजी नाईक याचे हातीं-दिली. निम्में रोटी अर्धी सूर्याराव पिसाळ याचे पुत्र पदमसिंगराव याचे हातीं निम्में दिली. त्याजवरी तेच प्रसंगीं निम्में देशमुखीचें वतन निम्मेचें पत्र सूर्याराव यांशीं करून दिलें. वांई देशांतील गांव निम्में निम्में तारोतार व इसाफती व इनाम तारोतार निम्में वाटून दिलें असे. दत्ताजी नाईक यांणीं सूर्याराव याशी शिक्यानिशीं आपल्या हातें कागद करून दिला. त्यावर दत्ताजी नाईक बोलिले जेः—एक शिक्का असूं देणें. त्यांस सूर्याराव बोलिले जेः—तुम्ही निम्मे देशमुखीचा शिक्का करणें

आम्ही निमें देशमुखीचा शिक्का करूं. त्याजवरून उभयतांचें भांडण लागलें. त्याजवरी माहाराज छत्रपति स्वामी मोंगलाईहून या प्रांतीं आले. त्यास तुळापुरीं मुक्कामीं दत्ताजी नाईक जाऊन स्वामीस गैरवाका विदित करून सारे देशमुखीचीं पत्रें करून घेतलीं. धनाजी जाधवराव यांचे विद्यमानें पत्रें घतलीं. हें वर्तमान सूर्याजीराव याशी विदित नव्हतें. हें वर्तमान सूर्याराव याशी कळिल्यावरी सूर्याराव याणीं थोरात यांचे हातें महाराज छत्रपति स्वामींचें दर्शन घेतलें. सदरहू देशमुखीची हकीगत सदरहू प्रो सांगितली. आणि मोगलाईत असतां ही महाराज छत्रपति स्वामीसही वर्तमान दाखल होतें. त्यास स्वामी बोलिले जेः—तुमचे निम्में देशमुखीचें वतन तुमचे तुम्हास देऊं. निमें दत्ताजी नाईक यास देऊं. ऐसा करार होऊन मजल दर मजल सातारियाशीं आले. तेथून पुढें मजल दर मजल पन्हाळियांशी गेले. तेथून पंचगंगेवर गेले. तेथें धनाजी जाधवराव याणीं स्वामीस अर्ज केला जेः—वांई देश खराब झाला आहे. अवघे देशक बरोबर आहेत. याशी कौल, वस्त्रें, घेऊन रवाना करणें, ह्मणोन अर्ज केला. त्याजवरून दिवस्याच्या सलामाच्या समईं वस्त्रें सदरेस आणविलीं. ते समईं धनाजी जाधवराव सेनापति याणीं स्वामीस अर्ज केला जेः—दत्ताजी नाईक देशमूख याशीं वस्त्रें देणें. त्याजवरून महाराज स्वामींनीं मंदिलाचा पदर घेऊन हात वर केला. ते समईं सूर्याराव याणीं महाराज स्वामीस थोरले महाराज स्वामींची द्वाही दिली कीं, दोहीं हातीं दोन मंदिले घेऊन दोघांचे हातीं दोन पदर देणें, त्यास धनाजी जाधवराव बोलिले जेः—दत्ताजी नाइकास वस्त्रें देणें. मग सूर्याराव याणीं धनाजी जाधवराव याशी जाब दिला जेः—"मी कांहीं जाधव यादव नव्हे! तुम्ही कऱ्हाडची देशमुखी दहा हजार रुपयाची घेतली! ऐसा कांहीं आपण नव्हें! आपण आहे तो दत्ताजी नाईकाचा तुरा आहे! तुरुकहांहीस देशमुखी पडली होती. त्यास दरबार खर्च लाखोलाख रुपये खर्च करून एक जातीच्या दोन जाती पाहोन देशमुखी सोडविली." त्याजवरून महाराज छत्रपति यांनीं मंदिलाचा हात वरता होता तो मांडीवरी ठेविला. त्याजवरी मागती धनाजी जाधवराव महाराज स्वामीस बोलिले जेः—दत्ताजी नाईक याशी वस्त्रें देणें. त्यास महाराज

स्वामी बोलिले जेः—गोष्टी देत असतां बळजोरीनें वस्त्र कसें द्यावें.आम्ही वाद्यांची समजावणी करणें. तोंवर वस्त राहूं देणें. मग तमाम कचेरी गेली. त्याजबरोबर सूर्याराव ही गेले, आणि कचेरीचे बाहेर बसले. मग महाराज स्वामींनीं सूर्याराव याची याद केली. जगंनाथ चोपदार याशीं आज्ञा केली कीं, सूर्याराव कोठें आहेत, त्यास बोलाऊन आणणें. ते गोष्टी सूर्याराव यांनीं ऐकून हुजूर महाराजापाशीं उभे राहिले कीं, आपण येथें जवळ आहोंत. महाराज बोलिले जेंः—अम्हांस नजर देणें. तुमचें वतन तुम्हांस निम्मेच्या सनदा करून देतों, आणि निम्मेच्या सनदा दत्ताजी नाईक याशी ही देशमुखीच्या करून देतों. त्याजवरून सूर्याराव याणीं राजश्री राजजी थोरात व सुलतांजी थोरात व दमाजी थोरात यांजकडे जाऊन त्याजपासून कर्ज घेऊन सोनें, रुपें १५,००० पंधरा हजाराचे व नक्त रुपये १५,००० येकूण तीस हजार रुपये नजर, महाराज स्वामीस देऊन व दत्ताजी नाईक यानीं ही धनाजी जाधवराव याचे गुजारतीनें नजर स्वामीस देणें ती दिल्ही. त्याजवरी रांगणाचे मुक्कामीं राजश्री दत्ताजी नाईक याशी निम्में देशमुखीचीं पत्रें करून दिल्हीं.व सूर्याराव पिसाळ यास ही निम्में देशमुखीचीं पत्रें करून दिल्हीं. शिक्याचा मजकूर उभयतांनीं महाराज स्वामीस पुशिला. त्याजवर हि महाराज स्वामी बोलिले जेः—वांई देशाची लावणी करणें. आम्हीं हि त्या प्रांते आलियावरी शिक्याचा मजकूर विल्हेस लाऊं. त्याजवरी उभयता देशास आले. महाराज स्वामीची छावणी जाहली. मग दुसरें वर्षीं महाराज स्वामी या प्रांतीं आले. किल्ले वंदनगडावरी छावण्या करून राहिले. मग वंदनचे मुक्कामीं गंगाजी नाईक व दत्ताजी नाईक व त्यांचे भाऊ कुल पिसाळ मिळाले, तेथून कूच होऊन मराढियावरी राजश्री स्वामींचा मुक्काम जाहला- तेथें तमाम अष्ट प्रधान व चंद्रसेन जाधवराव असे होते. ते समई सारे पिसाळ उभे करून महाराज स्वामींनीं गंगाजी नाईक याशीं विचारिलें जेंः—सूर्याराव तुम्हांस काय होते? ते बोलिले जेः—माझा पुतण्या होय. त्यावरी दत्ताजी नाईक याशी विचारिलें. त्यास दत्ताजी नाईक बोलिले जेंः—गंगाजी नाईक आपले बाप, व आपले भाऊबंद सारे सूर्याराव याशी मिळाले. मग दत्ताजी नाईक

बोलिला जेः—सूर्याराव आपला भाऊ नव्हे. त्याजवरून महाराज स्वामसि राग आला. मोंगलाईतील न्याहारखानानें देशमुखी घेतली होती ती सूर्याराव यानेंच सोडविली असें महाराज स्वामीस विदित होतें. आणि हल्लीं ही येथील मजकूर कित्येक लोकांनीं निवेदन सूर्याराव यांजविशीं केला होता. त्याजवरून देशमुखीचें वतन अमानत करून जोत्याजी केसरकर सर देशमुख यांचे हवालीं देशमुखीचें वतन केलें असे. सुर्याराव हि यांच्या हाताखालीं देशमुखीचा कारभार करीत होते. त्याजवरी महादजी गणेश यांच्या हाताखालीं सुर्याराव कारभार करीत होते. त्याजवरी मोरो जिवाजी देशपांडे यांच्या हवालीं देशमुखीची मुतालकी करून सूर्याराव याशीं महाराज छत्रपति बोलिलेः—मौजे वोझर्डे हा गांव कुलबाब कुलकानू देखील हक्कदार देखील दरोबस्त खाऊन सुखरूप राहणें. असें असतां जनाई जाधवीण भुईजकर इनें महाराज स्वामीस अर्ज करून राणोजी नाईक पिसाळ याशीं वोझर्डेपैकीं दोन चाव्हर जमीन बरोबर चोपदार देऊन मोजून पदरीं घातली. दोन चाव्हर खात होते. याशी साक्ष देशाधिकारी व देशक.

[खं. ३ ले. ६४ पृ. ६४.]

---

# हरणाचा तंटा



चंद्रसेन जाधवराव मोगलाईतील चौथाई सरदेशमुखी बाबतीचे अंमल बसवावे, उगवावे म्हणून फौजा सनदा देऊन, पोख्त सामान तयारी करून देऊन रवाना केले. दमाजी थोरात पाटस तर्फेतील हिंगणगांव येथें गढी करून पुंडपणा करीत होते. स्वाऱ्या करू लागले. व उदाजी चव्हाण हे करवीर प्रांतीं अथणीकडे राहून वडगांव येथें असोन उभयतांहि संभाजीराजे यांचे लक्षांत राहून, सातारा प्रांतापर्यंत स्वारी करावी, चव्हाणचौथाई म्हणून घ्यावी; गांव लुटावे, मारावे असें करूं लागले. महाराजानीं सर्व कारखाने किल्ला सातारियावरी ठेवून वरता वाडा बांधविला. शाहु—तलाव

म्हणून तळें केलें. कांहीं लोक वरत, [ कांहीं ] खाली रहावे असें केलें. जाधवराव सेनापति यांचे पदरीं बाळाजी विश्वनाथ बावतीच्या मामलती करून होते. ते फौजेंत जाधवराव यासमागमें होते. एके समयीं लष्करचें कूच जालें. रवें पडली. त्यांत हरण उठलें. त्याचे मागें पिराजी राऊत म्हणून—बाळाजीपंत यांजकडील पथकांत—शिलेदार होते ते लागले. पुढे मुक्काम होऊन डेरे राहुट्या जाल्या त्यांत व्यासराव म्हणून ब्राह्मण कारकून जाधवराव यांजकडील होते त्यांचे राहुटींत हरण शिरलें. त्यांचे मागे पिराजी राऊत लागून गेले. राहुटींत पाठीशीं आले म्हणून व्यासराव राहुटीचे तोंडीं उभे राहिले. तों हे जाऊन " आमची शिकार द्यावी "म्हणू लागले. तेव्हां व्यासराव " आम्ही ब्राह्मण, आमचे राहुटींत आलें, पाठीस निघालें. तें देतां नये. मारू नये " बोलले. राऊतहि आग्रहास आले जे " आमची शिकार आम्ही नेऊं. " असा उभयतांचा आग्रह. तेव्हां पिराजी राऊत याणीं भाला टाकिला. तों हे पुढें जाले यांस लागला. जखम जाली. हें पाहून पिराजी राऊत जाऊन बाळाजीपंत यांस वर्तमान कळविलें. " अशी गोष्ट घडली. या उपरि बचाव करणें आपणांकडे आहे " म्हणून सांगितलें. तों हें वर्तमान सेनापतीस समजलें, ' ब्राह्मणावर वार टाकिला, जखम शिकारीसाठी केली, हें अयुक्त जालें म्हणून पारपत्य शिक्षा त्यास करावी ' असें ठरवून बाळाजीपंत नानांस सांगून पाठविलें जें "तुम्हांकडील स्वारानें ब्राह्मणावर जखम केली त्यास पाठवून द्यावा. चौकशी करून शिक्षा जाली पाहिजे. "तेव्हां बाळाजीपंत नानांनीं सांगून पाठविलें " हरणावर भाला टाकिला तों राव मध्यें आले याजमुळें लागला. अपराध खरा. परंतु सरकारच्या पदरचे लोक आहेत. येऊन अम्हांपाशीं पोंचलें. पाठीस पडले. त्या अर्थी क्षमा करावी. पारपत्य करणें, तैनात बुडवणें, घालवणें, दूर करणें आम्हींच करितों. " असें सांगून पाठविलें असतां सेनापति आग्रहास पडले जे "त्याचें पारपत्य च जालें पाहिजे. पाठवून द्यावे." ते समयीं बाळाजीपंत हि आग्रहास आले. कळोन स्वार पथके रवाना केले

---

१ रांग लागली. २ बाळाजी विश्वनाथ. ३ चंद्रसेन जाधवराव, धनाजीचा मुलगा.

जे " सुप्रयुक्त राऊत हातीं न देत तरी हल्ला करून पथक लुटून, धरून आणावें. " हें वृत्त कळतांच हेहि पथक तयारी करून कूच करून निघोन चालले. लोकांस ताकीद केली जे " जमून जाऊं नये. थोडे थोडे टोळ्या करून चहू वाटेनें जिकडें जसें कळेल तसें निभावून जेजुरी, सासवड येथें सर्वांनीं येऊन पावावें. " आपण शे सवाशे स्वारानिशीं एका मार्गें निघोन चालिले. हें वर्तमान जाधवराव यांस समजलियावरून दोन तीन हजार फौज जमवून पाठविली. " त्यांच्या मागें जाऊन जेथें सांपडतील तेथून धरून आणावे " सांगून रवाना केले. बाळाजीपंत याणीं अंबाजीपंत पुरंदरे यांचे हातून सचिव याशीं राजकारण करून पुरंदर किलियाचे आश्रयास जाऊन राहिले. बाळाजीपंत फौज गेली त्याचे हातीं लागले नाहींत. हें वर्तमान कळलियावरून [ सेनापतींनीं ] आपण खासा फौजसुद्धा कूच करून बारामतीवरून सुपें येथें येऊन सचिव यांसी सांगून पाठविलें जे " बाळाजीपंत यांस तुम्ही आश्रय देऊं नये. दिल्हा असतां आम्हांस तेथें येणें प्राप्त आहे. तुमचे मुलकाची खराबी होईल. " यावरून सचिव याणीं बाळाजी पंतास सूचना केली "तुमचा परिणाम येथें लागणार नाहीं. " ......या उपरि आपला परिणाम महाराजांस शरण जाऊन आश्रय केल्यावांचून लागत नाहीं; ऐसा विचार करून पांडवगडची माची थोर, जागा बिकट. लोक सुद्धा दम खावयास योग्य आहे तेथें लोक ठेवून महाराजाकडे सांगून पाठवून, विचार आणवून, तेथें जावेसें करून पांडवगडचे माचीस जाऊन उतरले. आणि अंबाजीपंत पुरंदरे यांचा व खंडोबल्लाळ यांचा स्नेह आहे; यांचे वाद प्रकरणीं जाणें येणें त्यांत स्नेह जाला होता. त्यांचे विद्यमानें बोलणें करावें म्हणून त्यांस पाठविलें. त्याणीं जाऊन भेट घेतली. आणि उभयतां मिळोन महाराजापाशीं बोलणें केलें जे " बाळाजीपंत शहाणे, कर्ते, शिपाई, मोठे माणूस. याजवर सेनापतीनें असें गुदरले म्हणून स्वामीस शरण आले. रक्षिलें पाहिजे " ऐसें समजाविलें. यावरून आपणास चांगलें माणसाचा संग्रह करणें आहे; तेव्हां जाधवराव आग्रहास पडले

---

४ बऱ्या बोलानें, नीटपणीं. ५ बाळाजी विश्वनाथाचें पथक.

त्यास समजोन सांगोन घडेल तसें करणें. म्हणून अभयपत्र देऊन हुजूर यावें सांगितलें. [चिटणीसकृत शाहुचरित्र.]

---

# मराठ्यांना दिल्लीस आमंत्रण



पादशाईत पादशाहा यांशीं सर्वाध्यक्ष सैद होऊन वजीरी कारभार करू लागले ते निजाम उन्मुलुक वगैरे सरदार यांस असह्य जालें. आणि दोनभाग होऊन एकमेकांस घालवावें ऐशी मसलत वाढली यावरून औरंगाबादेस हसन अल्ली खान सैद होते यांस आलम अल्लीखान सैद याणीं लिहिलें जे "जुल्पकारखान वगैरे सरदार याणी फरोखशाहास अनुकूळ करून बखेडा आरंभिला आहे." यावरून हसन अल्ली याणीं संक्राजी मल्हार यांस "मसलत कशी करावी ? तुम्ही येथें सुभ्याचें काम बंदोबस्त राखावा; आपण फौज जमाव घेऊन दिल्लीस जाऊन बखडो मोडितों" विचारिलें. ते समयीं संक्राजी मल्हार याणीं मसलत सांगितली कीं "शाहू राजे पादशाहींतून सुटून आले. सर्व आपले दौलतीचा बंदोबस्त केला. मातबर सरदार व कर्ती माणसें, मुत्सद्दी, कार्यकर्ते जमाविले. फौज, पागा, कारखाने मोडलेले जमविले. आणि फौजसुभे मोठेमोठे पाठवून मुलूख अंमल काबीज केला. त्यांशी सख्य करावें. म्हणजे ते सहजच आपले सुभ्यांत उपद्रव करणार नाहींत.त्यांची फौज व लोक मदतीस बरोबर घेऊन जावें म्हणजे थोर मसलत व मोठीं कार्यें घडून येतील. नाहींतरी मसलत दुर्घट आहे." यावरून हसन अल्ली बहुत खुष होऊन "तुम्ही पूर्वी त्यांचे पदरीचे. तुम्हींच या कामास जाऊन तह ठरवून पन्नास हजार फौज त्यांची कुमकेस बराबर यावी [असें करावें]. त्याचा खर्च देऊन व त्यांचे मतलब काय असतील ते येथे करावयाचे व पादशहापाशीं करून द्यावयाचे ते कबूल करावे. आणि दक्षिणेंत जे आमचे तर्फेचे कामावरि राहतील त्यांची मदत त्याणीं राखावी ऐसें ठरवून यावें" सांगितलें. तेव्हां संक्राजीपंत याणीं मनांत विचार केला जे "महाराजांचा प्रताप, दैव

विचित्र आहे. गुण ही सर्व राजचिन्हें दिवसेंदिवस वृद्धीस पावावें ऐसेंच आहे. आपण पूर्वी पासोन त्यांचे पदरचे त्यांचें अन्न भक्षिलें आहे. त्यांचें दर्शन होईल. त्यांची सेवा घडावी ऐसा योग सहज प्राप्त जाला आहे. ” म्हणोन हसन अल्लीखानापाशीं जाऊन मसलत सिद्ध करितों ऐसें मान्य केलें त्यानीं बराबर लवाजिमा मातबर, हत्ती घोडे व पांच हजार फौज, स्वार, गारद ऐसे मोठे योग्यतेचा दिल्हा व महाराजांस पोशाख वस्त्रें जवाहीर हत्ती, घोडे, उत्तम पदार्थ ऐसे देऊन रवाना केले. ते आले. संक्राजी मल्हार पूर्वीचे आपले सचिव व सैदाकडून वकीलीस येतात कळोन महाराजांनीं प्रतिनिधी व अष्ट प्रधान व सरदार सर्व आणाविले. संक्राजीपंत आले त्यास सामोरे जाऊन मोठे योग्यतेनें भेटी जाल्या. त्याणीं नजर केली. सरकारांतून *बादली चादर घातली. त्यांस राहण्यास जागा याचे लवाजम्या सुद्धा राहण्याजोगी नेमून देविली.·········यानंतर बोलण्यास प्रारंभ केला तेव्हां संक्राजीपंत यानीं सैदाची बोलणीं सर्व विदित केलीं. “ यांत महाराजांचीं कार्यें असतील ते आज्ञा करावी त्यास दरमहा काय तो नेमावा ” बोलले. ते महाराजासीं मानलें आणि सांगितलें जे “ पूर्वी जैसिंग राजे येऊन महाराजांचा तह होऊन दिल्लीस जाते समयीं स्वराज्य दरोबस्त पावले, घाट, कोंकण, वरघाट, बालाघाट चालावा. सहा सुभे दाक्षिणेंतील चौथाई व सरदेशमुखी चालावी ऐसा तह जाला त्याप्रमाणें चालावें. मातुश्री व कबिले तेथे राहिले ते येणें घडावे ” ऐसे मतलब ते निवडोन यादी करून फौज घेऊन जाण्यास मुख्य प्रधान बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे सेनापति व संताजी भोसले परसोजी भोसले सेनासाहेब सुभा यांचे पुत्र व पंवार विश्वासराव ऐसे सरदार व पन्नास हजार फौज नेमिली. त्यास दररोज पन्नास हजार रुपये या प्रमाणें पंध्रा लक्ष रुपये दरमहा पावावा ऐसें ठरावून मतलबाची यादी करून दिल्ही......आणि सध्याच ठाणियांत मोगलाई अमलाचे सुभे होते व स्वराज्याचे जिमेचे बाहेर राहून अमल घत होते ते मोंगलाई ठाणीं सदरीं लिहिलीं तीं उठवून दरोबस्त अमल

---

* बादली = भरजरी; चादर = वस्त्र.

स्वराज्याकडे यावा ऐसें सांगितलें. ते संक्राजीपंत याणीं सैदास लिहून मत-लबाची यादी तह ठरावून आणिला. व ठाणेदार यास सोडचिठ्या आणून मोंगलाई अमल उठवून " दरोबस्त अंमल स्वराज्याकडे मतलब दिल्लीहून व्हावयाचे ते करून तेथून देतों " ऐसा तहनामा ठरावून पाठविला. शके १६३६ जयनाम संवत्सरे; सन खमस अशर मया व अलफ याप्रमाणें तह होऊन संक्राजीपंत याणीं महाराजास मेजवानी सर्व अष्टप्रधान व सरदार व कारखानदार व राजमंडळ यांस वस्त्रें जवाहीर यथायोग्य देऊन केली. महारा-जानीं हि पंतास मेजवानी त्याजकडील मुत्सद्दी कारकून व सरदारसुद्धा वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे बराबर दिल्हे. आणि औरंगाबादेस जाण्याचा निरोप दिल्हा. ते निघोन गेले.

मल्हार रामरावकृत थोरले शाहूचरित्र. पृ. ३७-३९

---

# एसूबाईच्या सुटकेसाठी खटपट



गुप्ते दफ्तर ]                    [ १६३९ फाल्गुन शु-५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नाम संवत्सरे फाल्गुन शुा ५ इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणी रा रा यादवराउ मुनशी यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही माघ बहुल १३ चें विनं-तिपत्र पाठविलें तें फाल्गुन शुद्ध ४ स प्रविष्ट होऊन वर्तमान विदित जालें. "सरदेशमुखीचा परवाना पाहिले जाला होता तो गलत करून हल्लीं नवा पर-वाना सिद्ध करविला. त्याची नक्कल काजीचे मोहरेनिशीं पाठविली असे. व पहिले पेसकसी मोकरर जाली होती त्याचप्रमाणें जरा बाजरा रदबदल करून स्वामीस कळण्यास पाठविली आहे. यावरून सेवकाचे चाकरीचे

मजुरा होईल" म्हणोन कित्येक प्रकारें लिहिलें. ऐशास जो पूर्वी प्रधानपंतीं निर्वाह केला होता त्यासंबंधें दुसरी बोली असलेली याकरितां तुम्हीं सेवक लोक व तुम्हांस जे लिहिणें तें लिहावें लागलें. येथील आज्ञेवरून तेथें तुम्हांस रदबदलेस जोर पोंहोचला आणि पहिलेच मोकरर बेरजेवरी काम होऊन आलें. तथापि तुमच्या शहाणपणास अगर कष्ट मेहनतीस स्वामींनीं शब्द लाविला ऐसा अर्थ नाहीं. हे प्रसंगीं तुम्ही श्रमसाहस केलेती तदनुरूप तुमचें उर्जित करणें आवश्यकच आहे. तुम्ही आपले मनांत कदापि विपर्यास न मानणें. पुढें हि स्वामिकार्यावरी एकनिष्टपण राहोन स्वराज्याची सनद सत्वरच तयार करून घेणें. रा शंकराजीपंताच्या व तुमच्या लिहिल्यावरून चौथाई व सरदेशमुखी परवाना व स्वराज्याची सनद ऐसे तीनहि मतलब तों विल्हे लागले. राहिले मातुश्री येसूबाईसाहेब व चिरंजीव रा मदनसिंग यांचें आगमन जालें आणि स्वामींची व त्यांची भेटी जाली म्हणजे नबाबाच्या वचनाप्रमाणें रा शंकराजीपंत दरम्यान पाडिले व तुम्ही कष्ट मेहेनत केली त्याची सार्थकता होऊन अवघेच मतलब सिद्धीस पावले. तर मातुश्रीचेविशीं व चिरंजीवाचेविशीं प्रतिक्षणीं स्मरण देऊन त्यांचे अविलंबें आगमन होय ते गोष्टी करणें. विस्तारें राजश्री शंकराजीपंत यांचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणें.

[ मराठी रियासत म. वि. पृ. १०२ ]

---

# कर्नाटक कीं दिल्ली ?



बाजीराव बल्लाळ व चिमणाजी बल्लाळ बहुत कर्ते शहाणे निघाले. राज्यवृद्धीची उमेद धरून बहुत पराक्रम करून दाखवावा, महाराजांची कृपा संपादावी म्हणोन " आपणास हिंदुस्थानची चौथाई सरदेशमुखी साधण्याच सुभा सांगावा " म्हणोन विनंति केली. हें महाराजांनीं ऐकून बाजीराव

यांजवर बहुत संतोषी जाहले. महाराजास हिंदुस्थान साध्य करावयाचे बहुत मानस. यावरून प्रतिनिधी व सर्व मुत्सद्दी जमा करून विचार पुसिला. तेव्हां श्रीपतराव प्रतिनिधी यांणीं " पादशाहाचा तह जाला आहे. ...... स्वामींचा मनोदय हिंदुस्थान साध्य करण्याचा आहे तोहि घडोन येईल. आधीं कर्नाटक प्रांत थोरले महाराजांनीं साध्य केलेला गेला आहे. तो साध्य सर्व फौज पाठवून करावा. नंतर ही मसलत करावी. ऐसे आमचे विचारे दिसते " बोलले. यावरी ते समयीं बाजीराव यांणीं उत्तर केलें कीं, " प्रतिनिधि अशी मसलत काय देतात ? पादशाही कमजोर जाहली. कांहीं जीव राहिला नाहीं. बखेडे बहुत जाले आहेत. पादशहा आमचे कुमकेनें पादशाही रक्षावी असें इच्छून आहे. यांत च त्याचे हि बखेडे मोडावे. आपला स्वराज्य अंमल पूर्वीं बसला नाहीं तो बसवावा. किलिजखान नजीक. त्याचा तह बिघडून खटला करतील याचा हिसाब काय धरावा ? [ असें म्हटलें तर ] राज्य कसें करावें ? आणि थोरले महाराज यांणीं जातीनें औरंगजेब शहाजादेपणांत येऊन दौलताबादची पादशाही घेऊन औरंगाबाद वसवून सुभा करून राहिले. त्याचा हिसाब न धरितां विजापूर भागानगर पादशाहींतील अंमल बसविला. व त्याचे सुभ्यांतील अंमल घेतला. यानंतर हि संभाजी महाराज यांणीं सर्व दौलत फौज बुडविली. ......पूर्वीं मोठीं मोठीं कार्यें वडीलीं केलीं तशीं न करावीं तरी मोठीं पदें कशास धरावीं ? आम्हांस सनदा मात्र द्याव्या. फौज, खजीना सर्व स्वामींचे चरणाचे प्रतापें करून सिद्ध करितों. राज्य साध्य करितों. किलिजखान याचा हि शह राखून हिंदुस्थानची मसलत करितों. दोन्हीं आम्ही आटोपतों. कर्नाटकची मसलत करणें त्यास पादशाही बुडविली [ आहे ]. पूर्वींचीं राज्यें विजापूर, भागानगर याजखालील मुलूख साध्य जाले च आहेत. हे घरांतील मसलत आहे. हुजुरांत व मोठे सरदार यांतील कोणीतरी रवाना होऊन मसलत जाली म्हणजे सहज साध्य होईल. हे प्रतिनिधींनीं मसलत संभाळावी. थोरले महाराजांचा संकल्प हिंदुस्थान काबीज करावे ऐसा राहिला. त्याजसाठी स्वामींचा अवतारउदय जाला. पुण्यप्रतापहि तसाच आहे यास्तव आधीं हें साध्य करावें आणि संकल्प शेवटास न्यावा. पादशहानीं आपण होऊन

बलाऊन नेऊन तह करावा ऐसे दिवस श्रीनें प्राप्त केले. त्यास बाळाजीपंत नाना जाऊन सर्व राजकारणें, हिंदुस्थानचे राजे रजवाडे यांचीं करून सिद्धता जाली आहे. महाराजांचा प्रताप जें कार्य मनीं धरिलें तें घडोन यावें ऐसा आहे. यास्तव यासमयीं हा उद्योग करावा हें उत्तम आहे. '' ऐसे बोलिले. यावरून महाराज बहुत संतुष्ट होऊन बोलले जे '' बाळाजीपंत नानाच्या उदरीं तुम्हीं जन्मला तें युक्त आहे. तुम्हांसारखे कर्ते पदरीं असतां हिमालया पलीकडील हि किंन्नरखंडीचें राज्य साधता येईल. मग या मसलतीचें काय अशक्य आहे ? तुम्ही हिंदुस्थान प्रांतीं जावें. इकडील सर्व सरदार व हुजरात व मानकरी फौज आहे. तेव्हां निजामउन्मुलुख याणीं शेखी केलियास पाहता येईल व कर्नाटक प्रांतीं हि फौज रवाना करून सोडिता येईल. '' ऐसें सांगोन महाराजांनीं बाजीराव यास वस्त्रें बहुमान व सनदा देऊन निरोप दिल्हा.

मल्हाररामरावकृत शाहू महाराजांचें चारित्र पृ- ४४- ४६.

---

# राजबंधूंचा समेट.



१

तह जाहला त्या समयीं प्रथम स्वारी साधारण नाम संवत्सरीं सन इहिद्दे सल्लासीन माघमासीं साताऱ्याहून श्रीमन्महाराज शाहूराजे यांजकडून श्रीमन्महाराज राजश्री संभाजीमहाराज छत्रपति यांसि न्यावयास आले व नांवनिशी श्रीपतराव प्रतिनिधी व नारोराम मंत्री व अंबाजी पुरंधरे पेशव्यांचे मुतालिक व कृष्णाजी दाभाडे व निंबाळकर व पांढरे व कित्येक नामीनामी सरदार किल्ले पन्हाळियाच्या मुक्कामीं फौज सुद्धां आले. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति साहेबांस सर्वत्रांनीं नजरा व दुस्त

व जडजडाव, जवाहीर, हत्ती, घोडे नजर करून सत्के करून जोहार केले त्या उपरि पद्धतीप्रमाणें चादरा त्यांसि देऊन विडे होऊन ते किल्ले खालीं उतरले. उपरांतिक महाराज स्वामींची स्वारी किल्ल्याखालीं होऊन देवळें नावली एथें मुक्काम जहाला. तेथून कूचदरकूच जाऊन वाठारावरी मुक्काम केला. शाहूराजे उमरजेवरी होते. श्रीपतराव व नारोराम मंत्री वाठाराहून पुढें ऊमरजेस गेले आणि शाहूराजे यांसह कऱ्हाडा पुढें जखीणवाडीच्या नजीक माळावरी घेऊन आले. त्यांजबरोबर संपूर्ण सरकारकून व नामीनामी सरदार वगैरे फौजा लक्ष पावेतों जखीणवाडीहून रावताची कोरगिरी वाठारा पावेतों म्हणतां दोन्ही सैन्यें मिळून दोन लक्षपर्यंत जथ जहाला. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति सोन्याच्या अंबारींत स्वार होऊन समागमें सरकारकून व सरदार व नामीनामी खासे सरदार दहापांच हजारपर्यंत होते, कोरगिरींतून मुजरे घेत स्वारी जहाली. श्रीमन्महाराज उभयतां बाणाचे खास्तीवरी उभे राहून मध्यें लोक फरक करून बनवा टाकिल्या. नामीनामी लोकांनिशीं शाहूमहाराज घोड्यावर स्वार होऊन आले. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतींची स्वारी हत्तीवरी होती ते घोड्यावरि स्वार होऊन बनवा बिछावल्या होत्या तेथें येऊन उभयतां महाराज घोड्यावरून उतरले. परस्पर संनिध येऊन, ऐक्यता होऊन शाहूमहाराज यांच्या पायावरि डोई श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांणीं ठेविली. महाराजांनीं परस्परें उभयतां बंधूंनीं आलिंगनें केलीं त्या वेळेस मोहरा व रुपये व सोन्याचीं फुलें व रुप्याचीं फुलें परस्पर सत्के जहाले. त्या समयीं तोफेची सरबत्ती व नानाप्रकारचीं वाद्यें व शहाजानें वाजवून आनंद जाहला. फाल्गुन शुद्ध ३ तृतीया मंदवारीं दोन प्रहरां याप्रमाणें भेटीचा समारंभ जाहला. तदनंतर शाहूमहाराज याणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांचा हात धरून उभयतां बंधू एक अंबारीमध्यें हत्तीवर स्वार झाले, खवासखान्यांत दोन मोर्चलें घेऊन संभूसिंग जाधवराव बसले. संपूर्ण फौजेच्या कोरगिरीमध्यें जोहार घेत कऱ्हाडापर्यंत गेले कऱ्हाडा नजीक कृष्णातीरीं मुक्काम जाहला. दक्षिणतिरीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी

महाराज छत्रपतींचा मुक्काम, उत्तर भागीं श्रीमन्महाराज राजश्री शाहूराजांचा मुक्काम होता; त्या डेरियापर्यंत उभयतां महाराज गेले. त्या वेळेस शाहूमहाराज यांची ज्या हत्तीवर स्वारी होती त्या हत्तीस व दुसऱ्या हत्तीस व दोन रंगविलेले घोडे एक रुप्याच्या जिनाचा व एक जरी बादली जिनाचा व दुस्तबादली व जडजवाहीर व ढालतलवार याप्रमाणें देऊन श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति नदी आलीकडे आपल्या डेऱ्याच्या मुक्कामास आले. कऱ्हाडाहून उमरजेस उभयतां बंधू महाराजांची सडी स्वारी जहाली त्यांणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतीस हजार रुपये सत्का करून बादली दुस्त व जडजवाहीर व हत्ती व रंगविलेले घोडे बादली जिनाचे दिले. शाहूमहाराजांच्या आग्रहानें उभयतां ऐक्यता असून साताऱ्यासि शिमगी पौर्णिमा व्हावी म्हणून ममतायुक्त बोलून श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांसि घेऊन सातारियासि गेले, त्यासमयीं संपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयतां बंधूंचा समारंभ पाहून सत्के व खैरात बहूत झाली. आणि साताऱ्यांत पेशव्यांच्या वाड्यांत मुक्काम जहाला. दोन महिने मुक्काम होता. संपूर्ण सरकारकून व नामीनामी सरदार यांणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज यांसि मेजवानी केली. नऊ हत्ती व चाळीस घोडे व जडजवाहीर व दुस्त असे बहुमान आले. शाहूमहाराज यांणीं रवानगी समयीं हत्ती व रंगविलेले घोडे सामानसुद्धां व ढालतलवार व जडावाचा खंजीर व दुस्तबादली दिली, व रोख दोन लक्ष रुपये दिले, आणि रवानगी केली. बरोबर सरकारकून फत्तेसिंग भोंसले फौजेनिशीं देऊन श्रीमन्महाराज यांची स्वारी पन्हाळियासि पावती केली. शाहूमहाराज चार कोस घालवीत येऊन माघारे सातारियासि गेले. त्या वेळेस तहनामा जहाला त्याची यादी अलाहिदा असे. कलम.

[ काव्येतिहास सं. पत्रें, यादी पृ. ३९३. ]

---

२

सातारचे शाहु छत्रपति व कोल्हापूरचे संभाजी यांच्या दरम्यान शक १६५३ च्या चैत्र वद्य २ स जो तहनामा झाला त्यांतील कलमें अशीं होतीं.

तहनामा चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसि प्रति राजश्री शाहूराजे याणी लिहून दिल्हा. सुरुसन इहिदे सलासीन मया व अलफ फसली ११४० छ १६ साबान विरोधिकृत संवत्सरे चैत्र वद्य २ बितपसील:—

कलम १. इलाखा वारुण महाले[1] तहत संगम दक्षिणतीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणीं व किल्ले तुम्हांस दिले आसत.

कलम २. तुंगभद्रेपासून तहत रामेश्वर देखील संस्थानें निंमे आम्हांकडे ठेवून निंमे तुम्हाकडे करार करून दिलीं असत.

अलम ३. किल्ले कोपळ तुम्हांकडे दिल्हा. त्याचा मोबदला तुम्ही रत्नागिरी आम्हांकडे दिला.

कलम ४. वडगांवचें[2] ठाणें ( किल्ला ) पाडून टाकावें.

कलम ५. तुम्हांशीं जे वैर करितील त्यांचें पारिपत्य आम्हीं करावें. आम्हांशीं वैर करितील त्यांचें पारिपत्य तुम्हीं करावें. **तुम्हीं आम्हीं एकविचारें राज्याभिवृद्धी करावी.**

कलम ६. वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम[3] तुंगभद्रेपावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तुम्हांकडे दिलीं असत.

कलम ७. कोंकणांत साळशी पलीकडे तहत पंचमहाल अकोले पावेतों दरोबस्त तुम्हांकडे दिले असत.

कलम ८. इकडील चाकर तुम्हीं ठेवूं नये. तुम्हांकडील चाकर आम्हीं ठेवूं नये.

---

१ हल्लींच्या सातारा जिल्ह्यांतील बत्तीस शिराळ्याचा पेटा म्हणजे वारुण महाल
२ करवीरकरांनीं हें ठाणें पाडलें नाहीं. ३ कृष्णा तुंगभद्रेचा संगम.

कलम ९. मिरज प्रांत-विजापूरप्रांतींचीं ठाणीं देखील-अथणी, तासगांव वगैरे तुम्ही आमचे स्वाधीन करावीं.

एकूण नऊं कलमें करार करून तहनामा लिहून दिल्हा असे, सदरहू प्रमाणें आम्हीं चालू. यास अंतराय होणार नाहीं. [ इचलकरंजी संस्थानचा इतिहास पृ. ४२. ]

---

# सरंजामी पद्धतीची अवश्यकता



शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत सरंजामी पद्धति व जहागीरदार यांची वाढ होऊ न देण्यासंबंधीं विशेष खबरदारी घेण्यांत आली होती; पुढें राजारामाच्या वेळीं या पद्धतीचा आश्रय केल्यावाचून मराठी राज्य टिकत नाहीं असें समजून तत्कालीन मुत्सद्यांनीं ती पत्करली, आणि शाहूच्या वेळीं आपसांत माजलेल्या यादवीतून मार्ग काढण्यासाठी कोल्हापूरकर व सातारकर या दोघांनीं हि ती वाढविली. तिची बेसुमार वाढ होऊन मुख्य सत्तेस बाधा पोचूं नये अशी तजवीज करण्यासाठी माधवरावाच्या कारकीर्दीपर्यंत थोडे बहुत प्रयत्न झाले; पण ते व्यर्थ गेले. तथापि त्या काळीं सरंजामी पद्धति एका दृष्टीनें राज्याभिवृद्धीस अवश्यक होती असें कै. रा. ब. गणपतराव जोशी यांचें मत होतें. त्याचा मथितार्थ असा आहे ( मराठी रियासत मध्य विभाग पृ. १३८–१३९ ) :—

राज्यकारभाराच्या हल्लीच्या स्थितीवरून आपण तत्कालीन स्थितीचा अंदाज करितों; त्या वेळचे स्थितिभेदाचे कित्येक महत्वाचे प्रकार आपण ध्यानांत ठेवीत नाहीं. अलीकडच्या पांच पन्नास वर्षांत दळणवळणाचीं साधनें सरकारास चांगलीं उपलब्ध झाल्यानें एखाद्या मध्यवर्ती राजधानींतून दूरदूरच्या कोनाकोपऱ्यांचा व सरहद्दीचा बंदोबस्त योग्य रीतीनें होऊं शकतो. तशीं साधनें नसल्यास दूरच्या सरहद्दीच्या बंदोबस्तासाठी कांहीं

तरी विशिष्ठ तजवीज सरकारास करावी लागते. या कामीं किल्यांची योजना शिवाजीनें केली; परंतु राज्यविस्तार झाला म्हणजे ही किल्यांची योजनाहि पुरी पडत नाहीं. किल्लेदार फितूर होऊन शत्रूस सामील झाल्याचीं उदाहरणें पाहिजे तितकीं आहेत. अशा स्थितींत दूरदूरच्या प्रांतांत जहागिरी देऊन आपल्या भरंवशाचे अनेक स्वतंत्र व जबाबदार सर. दार पेशव्यांस मुद्दाम बनवावे लागले. स्वतःच्या बचावासाठी व निर्वाहा- साठी या जहागीरदारांस जिवावर उदार होऊन शत्रूशीं लढावें लागे; आणि सभोंवार शत्रु प्रबळ असल्यामुळें, आपल्या सरकाराशीं निष्ठेनें वागून त्यांजकडून आपणास वेळेवर मदत येईल अशी तजवीज त्यांना ठेवावी लागे. बुंदेलखंड, माळवा वगैरे दूरचे प्रांत पेशव्यांनीं जिंकिले. तेव्हां तेथें शिंदे, होळकर, बुंदेले वगैरे शूर सरदारांस कायमचें वास्तव्य करून देऊन पेशव्यांनीं ठेविलें नसतें तर त्या अंदाधुंदीच्या काळांत सातारा राज- धानींतून तेथील प्रदेशाचा बंदोबस्त राहूं शकला नसता. अक्कलकोटास फत्तेसिंग भोसल्याची स्थापना झाल्यानें निजामाच्या छातीवर दडपण बसलें; आणि मुरारराव घोरपड्यानें गुत्तीस राहून कर्नाटकास शह दिला. गुजरा- थेंत गायकवाडांची व वऱ्हांडात भोसल्यांची स्थापना याच हेतूनें झाली. पुढें दक्षिण महाराष्ट्रांत पेशव्यांनीं पटवर्धनांची स्थापना याच उद्देशानें केली. अशा जहागिरी निर्माण करितांना होतां होई तों जहागीरदार आपल्या हुकमतींत वागतील असेच इसम प्रथम नेमण्यांत येत असत. पण पुढें अनेक कारणांनीं ते बंडे करीत तो प्रकार वेगळा.

एक छत्री राज्य कोणत्याहि कारणानें मोडलें तरी त्यांत असलेले बरेचसे जहागीरदार अवशिष्ट राहतात. मराठ्यांचें राज्य नाहींसें झालें. परंतु त्या वेळचे अनेक जहागीरदार आज इंग्रजी राज्याखालीं संस्थानांच्या रूपानें नांदत आहेत. परंतु मोगल बादशाहींत जहागीरदार नसल्यामुळें तें राज्य नाहीसें झाल्यावर मागें अवशेष कांहींच राहीला नाहीं. आज सुद्धां हिंदुस्था- नांत एकंदर पांचशे संस्थानांपैकीं मुसलमानी संस्थानें अवघीं पांचच आहेत. इराणदेश मुसलमानांनीं अल्पकाळांत जिंकिला. बंगालप्रांत इंग्र-

जांच्या हातांत जाण्यास पांच वर्षें पुरलीं. परंतु महाराष्ट्र देश जिंकण्याचा प्रयोग इंग्रजांना शेपन्नास वर्षे चालवावा लागला.

---

# ५ स्वराज्याचें साम्राज्य



वारणेच्या तहानें कोल्हापूरकर व सातारकर यांमधील यादवी तात्पुरती बंद पडली; तरी तिचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न,निजाम,स्वार्थ साधण्यासाठी, करीत होता.तेव्हां निजामाची समूळ सत्ता उलथून पाडण्यासाठी दिल्ली येथील राजकारणांत मराठ्यांचें वर्चस्व प्रस्थापित होणें अवश्यक आहे असें बाजिरावानें ठरविलें. रजपूत राजे देखील या वेळीं मुसलमानांच्या विरुद्ध उभे राहण्यास उत्सुक झाले होते यामुळें सर्व हिंदूनीं मिळून मुसलमानी पादशाहीची सत्ता हस्तगत करावी ' असा हिंदुधर्म रक्षणाचा मुद्दा बाजीरावास रजपुतांच्या मनांवर बिंबवितां आला. यापूर्वी फारतर ' स्वराज्याभिवृद्धी ' विषयींचे उद्गार मराठी मुत्सद्यांच्या तोंडून अधून मधून निघत; पण यापुढे हिंदु-धर्माचा व दिल्ली सर करण्याचा विचार मराठे बोलू लागले. यामुळें हळुहळु स्वराज्याचें साम्राज्य बनलें.

---

## मल्हारजीच्या तरवारीचा प्रताप



[ शके १६५३ ]

रजपूत रजवाडे यांचा इरादा, कसेंहि करून, सर्वांनीं एकदिल होऊन बादशाहीस धक्का द्यावा. सवाई जयसिंगास पुढें करून दक्षणी घोडेवाले यांस बगलेंत घेऊन,देवदर्शनाचें मिसें उज्जनीस आले. एकाएकी उघड होता नये.

सबब इंदुरकर मंडलोईस मल्हारजी होळकरांकडे पाठविलें. कीं 'तुम्ही जुवा_मर्दीचा इरादा धरला आहे. त्यापक्षीं तुम्हांस तमाम राजेरजवाडे लहानमोठे सामील करून देऊं. दयाबहादूर, सुभा उज्जन–पादशाई–आहेत, त्याचें पारिपत्य करून धारा उज्जन येथें अंमल तुमचा होऊन पुढे चाल चालू झाली म्हणजे एक समयावछिन्न लहानमोठे रजवाड्यांचे वकील तुम्हापाशीं आणितों. ' अशी मसलत करून इंदूरचे जमीनदार मल्हारजीकडे पाठविले. मल्हारजी व बाजीराव यानीं मसलत करून बाजीरावास माघारे पुण्यास रवाना करून, आपण सडा, घोडा राऊत मर्दाना उतरावयाचे उद्देशांत; तों नंदलाल मंडलोई दोनशें स्वारानिशी येऊन दाखल झाले. भेटी झाल्या. सवाई जयसिंगानीं रवानगी करतेसमयीं जे पर्याय बोलण्यांत आले ते सर्व बोलून आशा दुराशाही विशेष दाखविली. त्यास मल्हारजीनीं आज्ञा केली ' आम्हांस घांटांतील वाट निटोप्याची दाखवावी. दोन प्रहरचे संधीस आम्हांस त्याजवर नेऊन सोडावें, इकडे दयाबहादर धारचे मुक्कामीं येऊन घाटाचा बंदोबस्त करून होते. परंतु इंदूरकर जमीनदार व वढवाणीकर या उभयतांनीं अनोळखी घाटवाट काढून सुभ्याकडील बंदोबस्त जागच्चे जागींच राहून, नर्मदा उतरून, सूर्योदयापूर्वी घाट चढोन गेले. उदाजी पवारहि त्याच वाटेनें उतरून घांटावर होळकरास सामील झाले. उन्हाळ्याचे चैत्राचे दिवस. अदकोशावरून ' हरहर महादेव ' करून घोड घातले. बाहेरचे बाहेर एकसहा कत्तल केली. तोफखाना आपलासा केला. पायदळ कडब्यासारखें कापलें. दयाबहादर पांच हजार स्वार घेऊन आला ते नाहीसें करून दयाबहादुराचें डोकें हत्तीवर कापलें.* विठोजी बुळे याजपाशीं दोन हजार स्वार मागे ठेऊन मल्हरराव आठ हजार स्वारानिशीं उज्जनीस येऊन अंमल चालू केला. कांहीं एक अवघड पडलें नाहीं. एवढा सुभा एका छाप्यांत बुडविला. हा दक्षण्यांचा बेत. काळ श्रीमंतांचा प्रताप मल्हारजीचे तलवारीचा. रजवाड्यांचे वकील आले त्यांस घेऊन पुण्यास आले. तेथें वकीलांची बोलणी होऊन बाजीराव यांजला समागमें घेऊन माळव्यांत आले. सवाई जयसिंगाचे विचारें दिल्लीचे आसपास धुमाकूळ उडविला. जाळपोळ अशी केली कीं दिल्लीचे बाहेर

चाळीस कोस ना दिवा ना बत्ती. कुंजपुरा लुटला. फौजेंत सुवर्णांचा संग्रह झाला. बादशाही हालवून माघारे फिरले. सवाई जयसिंग, बाजीराव व होळकर यांच्या भेटी झाल्या. जयसिंगाजवळून तीस लाख रुपये घेतले. तेथून निघोन देशांत आले. [ होळकरांची कैफियत पृ. ९—१० ]

---

# दयाबहाद्दरावरील स्वारी



मुसलमानांचा पाडाव करून हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन करण्यासाठी बाजीराव बल्लाळाच्या वेळीं रजपूत व मराठे किति एकोप्यानें वागत होते याची कल्पना पुढे दिलेल्या पत्रावरून होण्याजोगी आहेः—

मराठी रियासत मध्यविभाग पृ. ३६९. ] [ १६५३ कार्तिक शु. ७

सिद्धीश्री[1] १०८ महाराव नंदलालजी प्रधान व भाइजी ठाकर नरहर दासजी कानुनगो संस्थान इंदोर जोग. श्री अमरगढसुं[2] महाराजाधिराज श्री सवाई जसिंगजीकृत प्रमाण बंचजो[3]. अत्र कुशल. तत्र कुशल श्रीजीकी कृपासुं चाहिजेजी[4]. अपरंच[5]. हकीकत एसी के मालवेकी हकीकत आपकी तरफसुं लिखी आई थी वो सब मालुम हुवी. और ता। २९ रबिलाखरका पत्र राजश्री बाजीराव बल्लाळ पेशवा प्रधान दखनसु[6] लिख्यो* की ' आपके संकल्पके माफिक ता। २१ कें रोज मालवेमे फत्ते हुई. ओर दयाबहादुर सुबा रणमे काम आया. इसमे रावसाहेबजी[7] व ठाकर नरहरदासजी व मयारामजी वकील इननें अपने तनमनधनसे भाई बेटे सरदार मुदार्मत[8] दी.

---

* हें युद्ध धारनजीक तिरला या गांवीं शके १६५३ अश्वीन वद्य ८ रोजी झाळें.

१ यांसि २ सुं=हून ३ वाचावें. ४ पाहिजे ५ विशेष ६ कडून * येथून अवतरण संपेपर्यंतचा मजकूर बाजिराव बल्लाळ नें सवाई जयसिंगास पाठविलेल्या पत्रांतला आहे. ७ रावसाहेब = इंदूरचे जमीदार नंदलाल मंडलोई. ८ सहाय

परंतु मांडवघाटपर पादशाका सुबाने बंदोबस्त ऐसा करा था, कि रस्तेमे तीन सुरंग लगाई थी. और फोज पचीस हजार तयार थी. घाट चढते मेरठी फौज बहोतसी मरने लगी. और जरासो कदम उपर चढे तो मांडव-वाले सुरंग दागे, तो कुल फोज गारद होवे. ऐसे मोकेपर रावसाहेबने खबर दी. ओर मांडवघाटका रस्ता बदलाकर दूसरे रस्ते-भेरो घाटसे—फोज चढाली. और अपने भाई, बेटे व सरदारोके धाटपर सुरंगमे उडाये. और मुकाबलेमें कट गये. बहोतसी मदत करी के उसका हाल[9] लिख नही सकता.' ऐसा लिखा आया. सो[10] आपकुं लिखते हैं कि यहबातं आपने तप-सलिवार लिखी नहीं. हजारें[11] शाबास है के फकत हमारे[12] कोलके उपर आप सब मालवे के सरदार रहकर, अपना धर्मका कल्यान होना, और मालवेमे धरमकी यह बात बिचारकर मालवेयेसे मुसलमानोकु[13] चोपट किये. और धर्म कायम रखा. हमारा मनोरथ आपने पुरा किया, इसबद्दल हमने पेशवाको लिखा है की ' आपके मरजीके माफीक मालवेके सब सरदारोंका बंदोबस्त अच्छा होगा. जैसा तुम इनकु बहादरीसे लाये हो, इसी माफक उनका मालवेमे जमाव डालना. ऐसा न हो कि इनके पाव पहिले सरीके उठ जावे. तीन बखत मालवेमे आनकर पीछे गये कुछ मिला नहीं. सो इसका पूरा बिचार रखना. और दुरंदेश[14] बिचार समजना. जादा आपकु लिखनेमें आता नहीं. आप दोंना सरदार हो. तारीख ५ जमादिलअव्वल सन इसन्ने सलासीन मया व अलफ.

---

# शनवारवाड्याच्या कोटास मनाई



तीर्थरूप* राजश्री राऊ तथा राजश्री आप्पा स्वामीचे सेवेसी. विनंति. आजि मंदवारीं प्रातःकाळीं दरबारास गेलों होतों. राजश्री नारबोवा व

---

९ हकीकत. १० तें. ११ बहुत, फार. १२ वचन. १३ चोपट = हाकलणे, नष्ट करणें. १४ सूज्ञ.

*हें पत्र बाजीराव व चिमाजी यांना लिहिलेलें आहे. शाहूच्या दरबारांत (साता-

आणीकहि कित्येक लोक मुजऱ्यास आले होते. तेव्हां राजश्री स्वामी बोलले कीं " राजश्री प्रधानपंत पुण्यास कोट बांधितात, येविषयीं पाहिले हुजरे व कागद पाठविले. परंतु ते गोष्ट न ऐकतां आपलाच हेका करून किल्ला बांधितात. तस्मात मोंगलाचें पुण्याचें ठाणें बसावें असें त्याच्या मनांत आहे की काय ? सिंहगड किल्ला जवळ, तेथें चिरेबंदी कोट पक्के काम करितात. द्वाही हुजुरे याणीं दिली, तथापि मोजीत नाहींत आणि कोट बांधितात. राजश्री सचीव पंताचा किल्ला सिंहगड जवळ आहे. ऐशियास सचिवाकडील किल्यास मोंगलाचा मोर्चा बसवावा असें त्याचे चित्तांत आहे [ कीं काय ] हें कांहींच कळत नाहीं. तसेंच जागा जागा किल्ले वाघोली व नांदडे व वाडी व आंबी वगैरे जागीं किल्ले बांधितात. मोंगलाची आवाई जाली तरी यांतून एकहि ज गा रुजणार नाहीं; आणि आपलें आपल्यासच प्रतिबाधक कर्म कां करितात ? व वडीलही उगेच डोळे झांकितात. परंतु गळफास बसेल. पूर्वी पिलाजी जाधव वाडा बांधीत होते, तेव्हां आम्ही मनाई करीत होतों. परंतु राजश्री चंद्रसेनराव जाधव थोराताची पाठ राखीत यामुळें वाडीस कोट जाला. शेवटीं राजश्री बाळाजीपंत धरिले. तेव्हां तीच वाडी पुरंदरास मोर्चा जाहला व मुलूख हैराण जाहला. आम्हीं सांगत होतों तें न ऐकिलें. शेवटीं त्याच गोष्टीस आलें. तसेंच हेंही कर्म आहे. राजश्री प्रधानपंतांनीं कांहीं पुण्यांत कोट बांधावा असें कांहीं नाहीं. " म्हणून बहुत श्रमी होऊन बोलले. चोरपाळतीनें बातमीहि पाठविणार आहेत. "किल्ला कसा बांधितात " ? असें आहे. तरी स्वामींनीं राजश्री स्वामीचे आज्ञेप्रमाणें

---

ऱ्यांत) पुण्यासभोवतीं कोट बांधण्याविषयीं काय चर्चा चालत असे याची माहिती या पत्रांत दिली आहे. १ शाहू छत्रपति. २ शाहू महाराज ' गढी बांधू नका,' म्हणत असतां पिलाजी जाधवानें चंद्रसेनाच्या सल्ल्यानें दिवे घाटावर जाधवाच्या वाडीस कोट बांधिला. तो कोट आश्रयाला घेऊन दमाजी थोरातानें पुरंदर किल्ल्यापासून पुण्यापर्यंतचा मुलूख मारून काढिला. त्या गर्दीत बाळाजी विश्वनाथ दमाजी थोरातच्या हातीं सुप्याकडे जात असतां सांपडला. जाधवाच्या वाडीच्या कोटानें पुरंदरला जशी मोर्चेबंदी झाली तशी शनवारवाड्याच्या कोटानें सिंहगड किल्ल्याला होईल व पुढें संकट येईल, हा शाहूच्या म्हणण्याच्या रोख.

किल्ला न बांधावा. हवेली भोवतीं बुरूज न घालितां चार दिवोळी[3] मात्र करावीं. जुनें काम आहे तें कांहीं फार पक्कें तों नाहीं. परंतु उगीच भ्यासुर दिसते. त्यास पांढरे मातीनें भिंतीचे बाहेरील अंग सारवावें म्हणजे डोळे-फोड दिसणार नाहीं. अर्थसूचना लिहिला आहे. स्वामी खावंद आहेत. खातरेस येईल तें करावें. विदित जालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ खं. २ पृ. ६६

---

# इचलकरंजीकर व घोरपडे



तालीक ] श्री [ १६५७ कार्तिक वद्य ३

राजश्री व्यंकटराव नारायण गोसावी यांस

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित राणोजी घोरपडे सेनापति. दंडवत. विनंति उपरि. येथील क्षेम जाणून स्वकीय लेखन करणें. विशेष. नांदणीचे मुक्कामीं तुमचे आमचे भेटी जाली. कितेक मनसुबीचे बोली जाली. ते समयीं तुम्ही विनंति केली जे " राजश्री संताजी घोरपडे सेनापति कैलासवासी यांणीं आमचे बाप तीर्थरुप कैलासवासी यांस पुत्र-पणें नवाजून त्यांचे हातीं सेवा घेऊन त्यांचें ऊर्जित करून चालविलें. त्यामागें आमचे बापांनीं राजश्री राणबासाहेब नेणते होते त्यांस हातीं घेऊन भाऊपणें चालोन जंगनामोश[1] करून सेवा केली. त्यामागें राजश्री पीरसाहेब लहान असतां आमचे बापांनीं त्यांचे नांवें दौलत करून श्रमसाहस बहुतच केला. जंग राखिला. पीरसाहेब प्रबुद्ध जाले ( तेव्हां ) त्यांपाशीं पूर्वपद्धती-प्रमाणें एकनिष्ठेनें सेवा केली. सेवा करीत असतां आमचे तीर्थरूप यांस

---

३ कोनाड्याची भिंत.

१ लौकिक, पराक्रम.

# परदेशी व परप्रांतीय लोकांचीं नांवें.



नानासाहेब पेशव्यांची स्तुती करतांना ' पंतप्रधानाख्यान ' कर्त्यानें पर-देशी व परप्रांतीय लोकांचे उल्लेख केले आहेत ते असे.

ताम्रास्ताम्राननाः स्युस्तलतरहृशः श्यामलाः श्यामलाः स्युः ।
फैरंगा. फेरुरगा भयभरितगिरो भंगुरा इंगरजाः ॥
डिंडीरा डिंगमाराश्चरणशरणगा आरवा आरबाः स्युः ।
शाहोः कोटीरहीरप्रबलभुजबलत्वद्भुजोद्यत्प्रसंगे ॥ १ ॥
तावत्सूरत कच्छ मच्छ भखरा जंगाल बंगालजाः ।
फराशांन खलीन चीन बलख ब्बोखार घोगारजाः ॥
तावत् सिंद वलिंद बंदर पुरुत्कालेषु ते त नृपाः ।
यावत्ते नृप मौलिमंडन दृढः खड्गो न दोर्दण्डगः ॥ २ ॥

---

# दीक्षित पाटणकर



काशी येथील नारायण दीक्षित पाटणकर यांना चिमाजी आप्पा व नाना साहेब यांनीं पाठविलेल्या ९ कलमी पत्रांतील चार कलमें येथें दिलीं आहेत. त्यावरून पेशव्यांचा दीक्षितांशीं कशा प्रकारचा संबंध होता हें दिसून येईल. [ का. इ. सं. पत्रें ]

' कोणी मंत्रशास्त्री भेटतील आणि अनुष्टान करा म्हणतील तर ते गोष्ट न करणें. कोणाचा मंत्र न घेणें. शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्टानें करीत जाणें.' म्हणून लिहिलें. तर आज्ञे-प्रमाणें च करीत जाऊं. ' स्वधर्मेंकरून आचरण करणें, कोणी दुराचरण

करीत असतील त्यांस शासन करावें' म्हणून लिहिलें. त्यांस अवश्यमेव लिहिल्या प्रमाणेंच वर्तणूक करूं.

रायाचें ( = बाजीरावाचे ) वैभवाची वृद्धी व्हावी यास्तव आपण बहुत श्रम आज पावेतों केले. पुढें जोपर्यंत आपण आहे तोंपर्यंत तुमच्या कल्याणास्तव श्रम करावयास अनमान न करूं ' म्हणून लिहिलें; तर राऊ, स्वामीस, मातापितराचे ठायीं मानीत होते. त्यांच्या कल्याणास्तव स्वामीनीं श्रम केले तर ते गोष्टीचें अपूर्व काय आहे ? बालकाचें कल्याण इच्छावें हें मातापितरांस सांगावें लागतेंसें नाहीं. पुढें हि आम्ही लेकरें स्वामींचीं आहों. आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कार्यांच्या ठायीं दिवसें दिवस [ लागून ] यशाची अभिवृद्धी होय ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच व देवाची प्रार्थना करतीलच यांत संशय नाहीं.

राज्यप्राप्तीकरितां पूर्वी सत्तावीस लक्ष दूर्वा वाहिल्या आहेत. बाकी त्र्याहात्तर लक्ष राहिल्या आहेत. त्याचा विध राजश्री वासुदेव दीक्षितास ठांवका आहे. तेविशीं त्यास सांगितलें असें ते दूर्वा देवास वाहतील.

---

# पेशवाईतील प्रौढ मराठीचा प्रारंभ



१

थोरल्या आबासाहेबांनीं जो स्वराज्यवृक्ष लावला तो पुढे एक शतक, सवाशतक पावेतों चांगलाच फोफावला. महाराष्ट्राचें महत्तर राष्ट्र या काळांत झालें. सर्वत्र महाराष्ट्राचा वचक व दरारा ' न भूतो ' बसला ! त्या काळांतील बाळाजीपंत नाना, बाजीराव, नानासाहेब, माधवराव, हरीपंत तात्या, पटवर्धन मंडळी, भाऊसाहेब, चिमाजीआप्पा, हिंगणे, नाना फडणवीस, माणकेश्वर, विंचूरकर, शिंदे, होळकर, दाभाडे, जाधव, आंग्रे,

भोसले, घायगुडे, रास्ते, गायकवाड, बिवलकर, घोरपडे, रघुनाथरावदादा, गोपिकाबाई, अहिल्याबाई, आनंदीबाई, गंगाधर यशवंत, जिवबादादा, पानशे इ. इ. शेकडो वीर मुत्सद्यांचीं हजारो पत्रें मिळालीं असून त्यांचे पाच पन्नास खंड छापून प्रसिद्ध आहेत. ते वाचून पाहतां फारसी भाषा पोटीं पचवून पुनरपि संकृताभिमुख होऊन आमचे मुत्सद्दी कशी डौलदार, घाटदार, ऐटबाज, 'राजाश्रिया विराजित राजमान्य' भाषा बोलूं,लिहूं लागले होते त्याचा ठसठसीत प्रत्यय येतो.

स्वराज्याचें साम्राज्य झालें! व्यवहार अफाट अफाट झाला. राजकारणें दाही दिशाला खेळूं लागलीं! त्यावेळीं वाणीला वैभवाचें तेज चढलें! तिला विलासाची चटक लागली व ती अधिक नटवी, लज्जतदार व प्रौढ बनली. नानासाहेब पेशवे, चिमाजी आप्पा, नाना फडणीस इत्यादिकांचीं पत्रें, खलिते वगैरे वाचतांना युरोपियन मुत्सद्यांच्या डिस्पॅचेसची आठवण होते. पूर्वीची तीं लहान लहान, मार्धी, सोपीं वाक्यें व शुद्ध मराठी वळणाचे शब्द जाऊन, प्रौढ, संस्कृत समास व लांबलचक व घोसदार वाक्यरचना त्या जागीं आली.

[ प्रो. पोतदारकृत मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ]

---

२

श्री

चिरंजीव राजश्री नाना यासी. प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशीर्वाद. उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. या प्रांतीं प्राचीन हिंदू राजे सर्व संस्कृतप्रवीण. वेश्यामद्यादिकांचा अति अनादर.साता पिढ्यांचे श्रीमंत्,साता नृत्यगीतवाद्यव्युत्पत्तिप्रवीण, स्वजातीय अनेक स्त्रिया प्रवीण, त्यांसी रत; किंचित् जितेंद्रियहि आहे; नर्माची रीत; देवब्राह्मणाची विशेष मर्यादा व शोभा; जिचे अवलोनमात्रें अधर्मिष्टास धर्मरती उत्पन्न होणार. गाणार कम्पतम स्वर, वर्जावर्जादिक

---

१ हें नामांकित पत्र नानासाहेब पेशव्यांनीं पुरंदऱ्यास लिहिलें आहे.

शास्त्रप्रमाणरीतीनें गाणार; वेदशास्त्र किंचित जाणतात; त्यांत जे मुख्य ते तों पाहिलेच्च नाहींत; जे मुख्य ते निरापेक्ष, सर्वथीसमृद्धि. त्यांचे शिष्यवर्ग अनेक; प्रयत्ने आणून विद्यादृष्टीनें पाहतां अतिश्रेष्ठ स्वदेशज; स्थूलदृष्टीनें पाहतां मात्र अरमणीय; बाग, फुलें, सरोवरें, कमळें इत्यादि शोभा जे महाप्रयत्नें लहानशी करावी त्याची तो गणना नाहीः ज्याचें तेज पाहतांना असें वाटतें कीं, यांची प्रार्थना करून स्वदेशास न्यावें; परंतु ते विदेश भूमी जाणून प्रार्थना केली असतां न येत; इकडील नद्या अमृतोपम; बहुत जनास स्वजलप्रदानें समृद्धिवंत करितात, व पांथांस आनंद व राज्यास द्रव्य-वृद्धि करितात; ज्यांचे सहचारें वोढ्याची उपमाहि आसध्या राक्षस स्वभाव नद्यांस न ये; उत्तर प्रांतांतील सर्व मनुष्य शुभ्र; त्यांत एक रामचंद्र व कृष्णजी शाम त्यांचें वर्णन करितात; देशीं एक ईश्वर श्रमयुक्त जाले; इकडील सर्वही नीलांबुदसंभ्रम; परंतु धर्मरूपें पाहतां जे हंसोपम; सर्वही मर्यादशील; आयापेक्षां व्यय थोडा; अधर्मापेक्षां धर्म फार. शैव्यमध्वालिंगधर्ते सर्वही स्वमताभिमनित; शौर्य घर्माविषयीं नायमाराव्यतिरिक्त सर्वही युक्ती-योद्धे; हे सर्व तुम्हांसवर्तमान पाहावें उचित असतां, अनेक शोभा टाकून, एक स्वलम्न शोभा अंगीकरून गेलां, हे उत्तम न केले ! ! ! पुढें तरी स्वकीयागमनेंकरून या प्रांताचे अवलोकन करणें उचित असे. तुम्हांसवर्तमान इकडे येणें झालिया उर्वरित शृंगारसाधनें प्रयत्न पूर्वक पाहण्यांत येईल. राजकार्यप्रसंग विचार करितां भागिरथसमान कैलासवासीयांनीं उत्तरेहून दक्षिण पावेंतों सुवर्णनादिप्रवाह चोवीस वर्षें वाहविला. त्यांचे आशीर्वादें अलीकडेही निरंतर वर्धमान वाहात असतां, देशाधिकारी व सेनामुख्य व अकृत्रिमास पूर्ण त्या नदीनें संतुष्ट केलें. एक तृष्णामात्र त्या सुवर्ण वोघानें वर्धमान केली. दक्षण देशांतून सुवर्णनदी मागें रघोजी, फत्तेसिंग बावांनी आणिली परंतु जागां जागा जिरली. मध्यें बहूत दिवस दक्षिण नदी न वाहिली. श्रीइच्छेनें या वर्षीही कालानरूप द्रव्य—नदी उत्तमच या सैन्यांत आहे. परंतु पुण्याकडे जातां रुक्षदेश फार आहे, यामुळें सर्व जिरून जाईल. एकदां उत्तरेकडील सुवर्ण नदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम सगरकूप समान पुणें या स्थळीं, मध्यें न जिरतां पूरयुक्त योग घडणें तेव्हां ऋणोद्धार

श्रमसार्थक इहलोक, परलोकीं उत्तम होईल. भागीरथी सगरासाठीं उत्पन्न परंतु विश्वातें उद्धार करिते. तशी या काळीं हे उत्तर-दक्षिण-नदी वाहते, बहुत जनांस उपकार होतें. सर्वही नद्या जलोघें समुद्रास जातात. एक कावेरी मात्र बहुत लोकांनीं उपयोगास आणिली. तशी हे द्रव्यनदी मुख्य-कार्य थोडें व गौणजनकार्य मात्र बहुत करिते. हा न्याय अन्याय, हा विचार साक्षी दृष्टींवत अमतील त्यांनीं विचारून, पुण्यातील रुक्षता दूर होय, व मध्यें कार्याकारण जिरे, ऐसें करणें, हें योग्य असे. रा छ ९ जिल्काद. बहुत काय लिहिणे ? हे आशीरवाद.

[ खं. ६ ले, १६०. ]

---

# पेशव्यांच्या अधिकाराची गुणदोषचर्चा



पेशवाईच्या अधिकारासारखा अधिकार दुनियेंत कधीं कोणी चालविला नसेल ! पेशवे दिल्लीच्या बादशाहाचे सुभेदार, छत्रपतींचे प्रधान व आपल्या स्वत:च्या राज्यापुरते मालक होते. हे तीन विजातीय संबंध एके ठिकाणीं आल्यामुळें त्या व्यक्तींचे म्हणजे पेशव्यांचें राज्ययंत्र बरेंच बिकट व नाजूक झालें होतें ! बादशहाचे नोकराशीं म्हणजे सुरत, जंजिरा, सावनूर अर्काट वगैरे संस्थानांच्या नबाबांशीं दोस्त-सरकार या नात्यानें त्यास वागावें लागे. हे संस्थानिक चौथसरदेशमुखीच्या ऐवजीं फक्त खंडणी देण्यास पात्र होते. निजामाशीं पेशव्यांचा संबंध त्याहून अधिक निकट होता. कारण कीं मोंग-लाईच्या सहा सुभ्यांत ठाणीं बसवून चौथ सरदेशमुखीचा वसूल परभारें घेण्याचा प्रघात पेशव्यांनीं यापूर्वीं पुष्कळ पाडिला होता, त्यामुळें मोगला-ईचे व पेशवाईचे नफानुकसान एकच असल्यामुळें हर्षामर्षाचे प्रसंग वारंवार येत. हे सर्व परके संस्थानिक वगळले म्हणजे राज्यांत पेशवाईस स्वतः-हून हि वरिष्ठ अशीं दोन संस्थानें होतीं. त्यापैकीं पहिले सातारकर छत्रपतींचें संस्थान पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत होतें. पण दुसऱ्या म्हणजे करवीर संस्था-नाचा प्रकार निराळा होता. तें संस्थान कोणासही खंडणी देण्यास पात्र

नसून स्वतःपुरतें स्वतंत्र व पृथक झालें होतें. इतकें असून पुनः शिवशाही-मध्यें त्याचा अंतर्भाव होतच होता ! त्या खालचा दर्जा नागपूरकर व अक्कलकोटकर भोसले, गायकवाड, प्रतिनिधि, सचीव, आंग्रे व वाडीकर सावंत इत्यादि संस्थानिकांचा असून ते पेशव्यांच्या बरोबरीचे होते. त्यांनीं जेथपर्यंत राज्यांत कांहीं फंदफितूर केला नाहीं तेथपर्यंत त्यांच्या संस्थानांत ढवळाढवळ करण्याचा पेशव्यास अधिकार नव्हता. हे सर्व सालिना जुजबी खंडणी देण्यास पात्र होते. यापैकीं कांहींजणास कवींकाळीं तर कांहींस दर वर्षीं लष्करी चाकरी करावी लागे. आंग्रे, सचिव व सावंत यांस लष्करी चाकरीचें कलम लागू नव्हतें. आसपास कोठें काम पडलें तर तितक्यापुरती त्यांनीं जुजबी फौजेनिशीं मदत करावयाची असे. तसेच पाटणकर, घोरपडे वगैरे हुजरातीचे मानकरी होते तेहि सर्व मानानें पेशव्यांच्या बरोबरीचेच होते. त्यांनींहि जेथपर्यंत फंदफितूर केला नाहीं तेथपर्यंत त्यांच्या वाटेस जाण्याचा पेशव्यास अधिकार नव्हता. या मानकऱ्यांत मातबर होते त्यांच्या सरंजामास लहान मोठे तालुके होते. पण गरीब–पांच दाहा स्वारांचे धनी होते त्यांच्या सरंजामास एखादं खेडेंच लाऊन दिलेलें होतें. हे सर्व मानकरी फक्त लष्करी नोकरी करणारे होते. त्या खालचा दर्जा पेशव्यांनीं ज्यांच्या सरदाऱ्या उत्पन्न केल्या होत्या त्यांचा. ते शिंदे, होळकर, रास्ते, पटवर्धन, विंचूरकर, वगैरे असंख्य होते. त्यांवर मात्र नारायणराव साहेबांच्या खुना-पर्यंत पेशव्यांची सत्ता अबाधित चालत होती. सर्व दर्जाचे लोक वर सांगि-तलें आहेत, त्या सर्वांचा सांभाळ होऊन त्यांचें ऊर्जित व्हावें, त्यांचे पर-स्परांत कलह होऊन रयतेची पायमल्ली न व्हावी व ती रयत निर्भय व संतुष्ट रहावी म्हणून शाहू महाराजांनीं मराठी साम्राज्य ‘ शिवस्व ’ म्हणून पेशव्यांच्या हवालीं केलें. थोरल्या मुलावर संसाराचा व कुटुंबाचा भार सोंपवून एखाद्या मनुष्यानें महायात्रेस जावें त्याप्रमाणें महाराजांनीं पेशव्यावर राज्य सोंपवून कैलासवास केला. ती जबाबदारी ओळखून पेशव्यांनीं हें ‘ शिवस्व ’ यथाशक्ति संभाळिलें यात काय संशय ? त्यांनीं कोणाच्याही दौलतीचा अभिलाष केला नाहीं, अपराधावांचून कोणास शासन केलें नाहीं. सामर्थ्यानें उन्मत्त होऊन कोणास पायाखालीं तुडविलें नाहीं, रावापासून

टकापर्यंत सर्वांचे मानमरातब व सरंजाम यथास्थित चालविले हें त्यास मोठें भूषणास्पद आहे. महाराजांनीं भोसले, गायकवाडास अधिकार दिला असता तरी याहून अधिक त्यांचे हातून क्वचित झालें नसतें ! नाना फडणीस हयात होते तोंपर्यंत पेशवाईचे हे सर्व कायदे निर्बाधपणें चालले. रावबाजीच्या कारकीर्दीत मात्र त्यास हरताळ फासला गेला. त्याचें फळहि त्या उल्लू पेशव्यांस तत्काळ मिळालें !

शाहूमहाराजांच्या स्वार्थत्यागानें मराठी राज्याचें आत्यंतिक कल्याण झालें असें मात्र मुळींच नाहीं. आजचें मरण उद्यावर ढकललें गेले इतकेंच काय तें झालें ! असें होण्याचें कारण ' धड ना धनी ना नोकर ' अशी पेशव्यांची स्थिति हेंच होय. शाहूमहाराजांच्या ज्या सनदेनें पेशव्यास अधिकार मिळाला त्याच सनदेनें मराठी राज्यांत आपापल्या क्षेत्रापुरते असंख्य पेशवे आपोआप निर्माण झाले ! राज्यकारभाराचे सर्व चातुर्य काय तें ' जुनें मोडूं नये. नवें करूं नये ' या वाक्यद्वयांत समाविष्ट होऊन बसलें ! महाराजांच्या वेळचे सरंजाम, तैनाता, अधिकार या सर्वांस मिरासदारीचा हक्क प्राप्त झाला ! पेशव्यास एखादा किल्ला पाहिजे असला तरी त्यांस किल्लेदाराचा मिराशी हक्क आडवा येऊं लागला ! कारण कीं सरकारचें धान्य, खजिना व बंदिवान हें सर्व हवालीं करून घेऊन राखणें व परचक्र आलें तर त्याशीं लढाई करणें हें जेथपर्यंत आपण करीत आहों, जेथपर्यंत आपण राज्याशीं हरामखोरी केली नाहीं, तेथपर्यंत आपणास काढण्याचा पेशव्यास अधिकार नाहीं हें किल्लेकऱ्यास माहीत होतें ! एखाद्या शंभर स्वारांच्या पथक्यास तूं स्वारांचें पथक मोडून पायदळाचें पलटण तयार कर असें पेशव्यांनीं सांगितलें तर तो पथक्या म्हणणार कीं " महाराजांच्या वेळेस जसा सरंजाम होता तसा बाळगून मी चाकरी करीत आहे. त्या बाहेरची गोष्ट मला करावयास सांगण्याचा तुम्हांस अधिकार नाहीं" ! यद्यपि एखादा पथक्या कबूल झाला तरी त्याचे कारभारी, मुजुमदार, फडणीस व स्वारसुद्धा असली गोष्ट कबूल करावयाचे नव्हत. कारण ते हि सारे मिरासदारच! महादजी शिंद्यांनीं पलटणें तयार केलीं तीं दिल्लीच्या बादशाहाच्या दौलतींतून ! तें काम ते मराठी राज्याच्या दौलतींतून करूं जाते तर मिरासदा-

रांनीं उलट त्यांचेंच उच्चाटण केलें असतें. या मिरासदारांमुळें सरदारांस भय नाहींसें झालें, कशीबशी चाकरी करून दिवस काढण्याची चाल पडली आणि त्यामुळें राज्याची वाढ खुंटली. राज्यांतल्या फौजा गोळा करून, पेशव्यांनीं परमुलखीं स्वाऱ्या करून महाराष्ट्रांत दौलत आणावी, राज्य वाढवावें व त्यांतलें तेज व उत्साह कायम राखावा अशी शाहूमहाराजांची मनीषा होती. एक दोन पेशवे बरे निघाले तोंपर्यंत त्या मनीषेचें साफल्य होतें गेलें. परंतु पुढें तो प्रकार बंद पडतांच मराठी राज्य इंग्रजांच्या तडाक्यात कपाळमोक्ष करून घेण्याची वाट पहात बसलें !

[ खरेकृत इचलकरंजी संस्थानाचा इतिहास, प्रस्तावना पृ. ९४. ]

---

# पद्धती घालोन काम चालवावें



शिक्षा किंवा पद्धति यांची अवश्यकता सांगतांना नारायणव्यवहार-शिक्षाकार म्हणतो:—

मनुष्याचा उपयोग राज्यांत व्हावा एतन्निमित्त शिक्षेचा सारांश लिहिला आहे. हा सर्व व्यवहारीं उपमेस घ्यावा. सर्वांस शिक्षा एकरूप असावी. शंभर अश्व एक शिक्षेनें शिकवून तयार केले तर त्यांचे स्वभाव, कार्य एकरूप होत असतें. तसें जें जें कार्य करणें त्या व्यवहाराचे मनुष्यास एक सारिखे शिक्षेनें शंभर माणूस तयार केले तर तितके माणूस एक कार्यास उपयोगी पडेल. त्यास म्हणावें “ शंभर शहाणे, अक्कल एक. ” नाहींतर आपलाले बुद्धीनें शहाणें झाल्यास एकाचे शहाणपण एकास मिळणार नाहीं. तीं माणसें व्यर्थ श्रम करून त्यांच्यानें कांहीं संरक्षण होणार नाहीं. यास्तव राजानें जपोन शिक्षायुक्त वर्तविल्यास तोच विश्वकुटुंबी म्हणावा. न केल्यास राजाचा व प्रजेचा हि नाश आहे. यास्तव जागा जागा पद्धति घालोन काम चालवावें. [ खंड ४ पृ.८. ]

# मराठे व इंग्रज यांचा समकालीन उत्कर्षापकर्ष



मराठे व इंग्रज यांच्या परस्पर संबंधाच्या कालावधीचे चार विभाग करतां येतात. ( १ ) १६४८ ते १७६१. इंग्रज मराठ्यांशीं नमून वागत असून त्यांच्यांशीं स्नेह जोडूं पहात होते. ( २ ) १७६१ ते १७८६. इंग्रजांचे बस्तान इतर प्रांतांत पुष्कळ बसलें. मराठ्यांशीं कलागत करून आपली शक्ति अजमावावयाचा त्यांनीं प्रयत्न केला. पण त्यांचा पराभव होऊन तो फसला. (३) १७८६ ते १८००. मराठे व इंग्रज हे परस्परांस तुल्यबल असे लेखून परस्परांशीं बरोबरीच्या नात्यानें व सहकारितेनें वागूं लागले. ( ४ ) १८०० ते १८१८. मराठे कमकुवत होऊन इंग्रजांचा पक्ष वरचढ झाला.

पहिल्या कालावधींत इंग्रजांनीं आपला व्यापारी पेषा पुरा राखला होता. मराठे म्हणजे छत्रपति व त्यांचे पेशवे वगैरेकडे आपले वकील पाठवावे, नजराणे द्यावे, व्यापारी सवलती मिळवाव्या, जकातींची माफी करवावी, रंगीबेरंगी मनोवेधक किंवा उपयुक्त माल विकून गिऱ्हाईक जोडावें व स्वस्थपणें व्यापार करण्यास परवानगी द्या म्हणजे झालें —आम्हांस कोणाच्या भांडणांत पडावयाचें नाहीं किंवा आम्हांला मुलूख मिळविण्याची अपेक्षा नाहीं— असें भासवावें असें त्यांचें धोरण होतें. इंग्रज व मराठे यांचा उत्कर्ष बराच काळपर्यंत एकसमयावच्छेदेंकरून समांतर असा हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत होत होता. पण ज्या काळांत मराठ्यांच्या सत्तेचा चढ होऊन उतार हि झाला त्या काळांत इंग्रजांच्या सत्तेचा चढ मात्र एकसारखा होतच होता. त्यांच्या सत्तेचा उत्कर्ष सावकाश संथपणें पायरी पायरीनें होत होता; व तिनें माघार अशी सहसा खाल्ली नाहीं. इंग्रजांनीं हि कित्येक लढायांत हार खाल्ली; तसेंच मराठ्यांशीं झालेल्या पहिल्या युद्धाच्या प्रकरणाप्रमाणें इतर कित्येक प्रकरणांत त्यांच्या धोरणाची थोडी बहुत पिछेहाट झाली. पण भरतीच्या वेळीं समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर फुटून परत येतातशा दिसल्या तरी एकंदरीनें पाण्याची प्रगतीच असते;

त्याचप्रमाणें लढाईत तात्पुरता पराभव किंवा राजकारणांत तात्पुरती पिछे- हाट झाली असली तरी एकंदरीनें इंग्रजांच्या सत्तेला व ऐश्वर्याला भरतीच भरत होती.

इंग्लंडांत ज्या वेळीं हिंदुस्थानच्या संपत्तिमत्तेविषयीं आश्चर्यपूर्ण चर्चा होऊन व्यापारी कंपनी बनवून व्यापार करण्यास निघण्याचा इंग्रजांचा बेत चालू होता, त्या वेळीं इकडे हिंदुस्थानांत मोंगलांचा अंमल दक्षिणेखेरीज बहुतेक सर्व हिंदुस्थानांत बसला होता. दक्षिणेत मोंगलांचा अंमल नव्हता तरी इतर मुसलमानांचा होता. या वेळीं मराठ्यांची स्थिति चमत्कारिक होती. त्यांनीं या तीन हि मुसलमानी दरबारांत सरदाऱ्या व मनसबदाऱ्या व त्या बरोबर येणारें पारतंत्र्य पत्करलें होतें. इतकेंच नव्हे तर निरनि- राळ्या मराठे घराण्यांमध्यें हाडवैर माजलें असून मुसलमान पातशहांनीं मरा- ठ्यांतील अंतःकलहावर मुख्य भिस्त ठेवली होती व तो कलह शांत न होईल अशी ते व्यवस्था करीत. ज्या सालीं लंडन येथें ईस्टइंडिया नामक इंग्रजी व्यापारी कंपनी स्थापली गेली त्याच्या आदल्याच सालीं मालोजीचा मुलगा शहाजी भोसले याचें जाधवराव याची कन्या जिजाबाई इच्याशीं लग्न झालें. या वेळीं शहाजी अवघा पांच वर्षांचा होता. १६१२ सालीं इंग्रजांनीं सुरतेस वखार स्थापली तेव्हां शहाजी सतरा वर्षांचा होता. शिवाजीच्या जन्मापूर्वीच इंग्रजांनीं जहांगीर व शहाजहान यांजकडून परवा- नगी मिळवून बंगाल्यांत व्यापारी वखारी घालण्यास सुरवात केली होती. त्यांनीं मच्छलीपट्टणास वखार घालून मद्रास इलाख्यांत आपला पाय रोवला, तेव्हां शिवाजी चार वर्षांचा होता. व शिवाजीच्या वयाच्या बाराव्या वर्षी इंग्रजांनीं खालीं मद्रासेस फोर्ट सेंट जार्ज किल्ला बांधण्याइतकें आपलें बस्तान बसविलें होतें ( १६३९.). शिवाजीनें महाराष्ट्रांतील प्रमुख किल्ले हस्तगत करून, अफजुलखानाचा वध करून, विजापुराकडून कल्याणापासून गोव्यापर्यंत व भीमेपासून वारणा नदीपर्यंत मुलूख हस्तगत केला त्या सुमारास इंग्रजांना मुंबई बेट मिळून मुंबई इलाख्याच्या कोकण- पट्टीच्या तोंडीं त्यांचा प्रवेश झाला होता. डच हतप्रभ झाले होते. मात्र पोर्तुगीज अजून जोरांत होते. शहाजी वारून शिवाजी हा विजापूर दरबारा-

पासून सर्वस्वी स्वतंत्र झाला त्याच सालीं इंग्रजांची व शिवाजीची सुरतेस प्रथम लष्करी सलामी झाली व इंग्रजांना बंदरावरील जकातीपैकीं शेकडा एक इतका कर शिवाजीनें माफ केला. शिवाजीच्या राज्यारोहणाच्या सुमारास इंग्रजांचें बस्तान मुंबई इलाख्याकडे यथातथाच होतें. पण बंगाल्यांत व मद्रासेकडे त्यांची प्रगति होत होती. राज्यारोहणापासून दुसऱ्या सालीं इंग्रजांनीं चंद्रनगर येथें वखार घातली. त्यांचे व फ्रेंचांचे युद्धप्रसंग अद्यापि व्हावयाचे होते.

शिवाजीच्या मृत्यूपासून पांचवे सालीं ( १६८५ ) मुंबई बेटांत ईस्ट इंडिया कंपनीची प्रतिष्ठापना झाली. व तिकडे बंगाल्यांत हि पुढच्याच वर्षी त्यांनीं कलकत्यास आपलें ठाणें बसविलें. दक्षिणेंत औरंगजेब मराठ्यांशीं लढत असतां इंग्रज हळूहळू आपला व्यापार वाढवीत होते; व ज्या सालीं झुलफिकारखानानें जिंजीचा किल्ला हस्तगत करून राजाराम महाराज व त्यांचे बरोबर सर्व मराठेशाही संकटांत घातली त्या सालीं कलकत्यास इंग्रजांनीं फोर्ट वुइल्यम किल्ला बांधला. १६८७ सालीं इंग्रजांनीं औरंगजेबाशीं युद्ध करण्याइतकें मनःसामर्थ्य संपादन केलें होतें; या युद्धांत अर्थातच त्यांचा टिकाव लागला नसता व या अविचाराच्या कृत्यामुळें ' आपण फार संकटांत आलों आहों ' असें सर्व इंग्रज वसाहतींना वाटूं लागलें असतें; पण दक्षिणेंत संभाजीनें औरंगजेबाशीं विरोध करण्यास याच वेळीं गांठ पडून इंग्रजांस मोठें सहाय झालें. इंग्रजांचा मुलूख बंदरानजीक असल्यामुळें व औरंगजेबाचा सर्व रोख घाटमाथ्यावरील प्रदेशाकडे असल्यामुळें इंग्रज एका अर्थानें त्याच्या सपाट्यांत सहसा सांपडण्यासारखे नव्हते. शिवाय इंग्रज हीं घुंगुरटीं आहेत, तीं केव्हांच चिरडून टाकूं; पण मराठ्यांचा समाचार मात्र आधीं घेतला पाहिजे असें त्यास वाटत असावें.

संभाजीच्या वधाच्या दुसऱ्याच वर्षापासून ( १६९० ) इंग्रजांची निवळ व्यापाराची दृष्टि जाऊन तिच्याबरोबर इकडील मुलखापासून वसूल उत्पन्न करण्याची दृष्टी आली होती. याच सुमारास त्यांनीं विलायतेंत आपणाकरितां एक सैन्य उभारण्याची व्यवस्था केली असून हिंदुस्थानांतील

राजेरजवाड्यांशीं जरूर तर युद्ध करण्याची परवानगी घेऊन ठेवली होती.

राजाराम महाराजांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं हिंदुस्थानांशीं तुटक व्यापार करणाऱ्या निरनिराळ्या इंग्रज व्यापारी कंपन्या मोडून युनायटेड ईस्ट इंडिया कंपनी नामक एकच संघटित व्यापारी कंपनी बनली. अर्थात कंपनीच्या व्यापाराला व सामर्थ्याला एकीमुळें बरकत आली. १७०७ सालीं औरंगजेब मृत्यु पावल्यापासून पुढील काळांत मराठ्यांची सत्ता वाढण्यास सुरुवात झाली. पुढच्याच वर्षी शाहूस राज्याभिषेक झाला. (१७०८) व पुढें दाहा वर्षांच्या आंत बाळाजी विश्वनाथ यानें दिल्लीहून चौथाई व सरदेशमुखी यांच्या सनदा आणून पादशाही राजकारणांत मराठ्यांचा हात प्रथम शिरकाविला. त्याच सुमारास (१७१५) इंग्रजांनीं हि दिल्लीच्या बादशाहापासून बंगाल्यांतील अडतीस शहरें व व्यापारावरील कराची माफी मिळविली. येथपासून पुढें एका बाजूस मराठे व दुसऱ्या बाजूस इंग्रज असें दुतर्फी राजकारण दिल्लीच्या दरबारीं सुरू झालें तें १८०३ सालीं इंग्रजांनीं शिंद्याच्या हातून दिल्ली शहर काबीज करीपर्यंत सतत सुरू होतें. पहिल्या बाजीरावानें दिल्लीवर स्वारी केली (१७३४) व निजामाचा पराभव करून त्याच्यापासून माळव्याची सनद दिल्लीच्या पातशहाकडून मिळवून देण्याची हमी घेतली (१७३८); चिमाजी आप्पानें वसई घेऊन इंग्रजांचे प्रतिस्पर्धी जे पोर्तुगीज यांचा पाडाव केला (१७३९), नानासाहेब पेशव्यानें माळव्याची सनद मिळविली, सदाशिवरावभाऊनें कर्नाटकावर स्वारी करून सावनूरच्या नबाबाकडून २५ लक्षांचा मुलूख मिळविला. या सर्व अवधींत इंग्रजांचें फ्रेंच्यांशीं कर्नाटकांत युद्ध सुरू झालें होतें; व ज्या सालीं रघुनाथरावानें उत्तर हिंदुस्थानावर स्वारी केली त्याच सालीं कर्नाटकांत फ्रेंच्यांना माघार घ्यावी लागून इंग्रजांची सरशी झाली. रघुनाथराव पेशवे व क्लाइव्ह साहेब यांचे पराक्रम अनुक्रमें दक्षिणेंत व उत्तरेंत समकालीन घडले. १७५७ सालीं इकडे दक्षिणेंत मराठ्यांनीं श्रीरंगपट्टणाला वेढा देऊन ३२ लक्षांची खंडणी घेतली, तर तिकडे बंगाल्यांत लॉर्ड क्लाइव्ह यानें प्लासीची लढाई जिंकून इंग्रजी राज्याची त्या प्रांतांत स्थापना केली. ज्या सालीं (म्हणजे १७५८ मध्यें) अटकेवर झेंडा लागला त्या

सालीं फ्रेंचांच्या हातून उत्तरसरकार हा प्रांत जाऊन मद्रासेकडे इंग्रजांची सरशी झाली. १७६० सालीं मराठ्यांनीं उदगीरच्या लढाईंत निजामाचा पराभव करून ६० लक्षांचा मुलूख मिळविला, त्याच सालीं इंग्रजांनीं बंगालचा संपूर्ण ग्रास केला. अशा रीतीनें अनेक वर्षे समांतर चालू असलेल्या इंग्रज व मराठे यांच्या यशाची जोडी फुटण्यास १७६१ सालीं प्रारंभ झाला. कारण, या सालीं पानपतास मराठ्यांचा मोठा पराभव झाला. व ह्याच सालीं इकडे मद्रासेकडे फ्रेंच सरदार लाली याचा पुरा मोड होऊन इंग्रजांनीं पांडिचरी शहर घेतलें.

[ मराठे व इंग्रज –उत्तरार्ध पृ.:१–५]

---

# पेशव्यांच्या दरबारांत घड्याळाचा प्रवेश



हू                    १६५७ कार्तीक शु.३०

अजम अकरम बाजीरावजी पंतप्रधानजी उस सलामत:—मेहरबान कदरदान फौजदास्त फौजरसा अजिदिल एखलास कपितान शामील वाकर मेहजर मुकाम जंजिर मुंबई सलाम बाजद सलाम. खैर अंजाम महवल मकसूद अंकी, मोहिनाचा किताबतनामा मुजरत फतेमार सोबत रवाना केला. तो मुकाम मजकुरीं दाखल होतांच, इंजानेबास मुफसल जाहाला. ऐसीयासी अजम कपितान इंचबर्ड तों स्वारीस रवाना जाहले असेत. ते इंजानेबास अजम मशारनिले तर्फेनें वकिलात फरमाविली असे. दिगर मोहिब्राकडील घडियाळ तयार करोन उतावळी रवाना केलें पाहिजे. तर हें घडियाळ दुरुस्त करोन मोहिबाचे फतेमार या सोबत जात असे. यासी खर्च लागला. तो आपण अजम मशारनिले कपितान याचे खातीं लिहिला असे.दराज काय लिहिणें? प्यार मोहबत असूं देणें.येथे सार शिकार खिजमत

फरमावीत जाणें. खिजमतेस हाजीर असो. तारीख २८ जमादिलाखर उर्फ इंगरेजी तेरीख ३ नोवेंबर सन १७३५. [ ऐ. टि. भा. ४ पृ. २ ]

---

# शाहू महाराजांचा मृत्यु व रामराजाचें सिंहासनारोहण.



श्री

[ सातारा दप्तर ] [ १६७२ वैशाख शुद्ध १४ ]

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः---

विनंति सेवक अमृतराव शंकर दिनकरराव साष्टांग दंडवत प्रा। विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता। छ १२ जमादिलावर महाराजांचे कृपावलोकनें करून यथास्थित असे. विनंति. सेवकावरी कृपा करून आज्ञापत्र छ ६ सफरीचें सादर जाहालें तें छ १३ रबिलाखरी पावलें. मस्तकीं वंदून सनाथ जहालों. "[1] श्रीमंत कैलासवासी महाराजांसें[2] आधिक मासांत अनारोग्यता प्राप्त जाहाली. उपाय बहुत जाहाले. तथापि होणारानुरूप छ १५ मोहरमीं राजश्री स्वामींनीं कैलासवास केला. सौ॥ बाईसाहेबांनीं सहगमन केलें. मोठी अनुचित गोष्ट जाहाली. ईश्वर इच्छेस उपाय नाहीं. कैलासवासी महाराजासारिखा गरीबनवाज[3] राजा होणें नाहीं. परंतु भावी पदार्थ ऐसाच होता. कैलासवासी महाराज वर्तमान असतां, आम्हांस समीप बोलावून, स्वकीय सार्थकाविसीं व सलतनतेच्या[4] बंदोबस्ताविसीं कित्येक प्रकारें सांगितलें. त्यावरून आगाव पंचवीस तीस हजार फौज जमा करून सातारां

---

१ येथून अवतरण संपेपर्यंत नानासाहेबांच्या पत्राचा सारांश २ शाहू-महाराज ३ सौजन्याविषयीं प्रासिद्ध ४ राज्याच्या

राहिलों. राजश्रींनीं परलोकसाधन करितांच, तमामें[५] पुंरजात[६] व कारखाने व राजमंदिरीं चौक्या ठेवून बंदोबस्त केला. राजश्रीस माहुलीसंगमीं नेऊन यथोचित सार्थक केलें. राजश्री राजारामसाहेब पानगांवीं होते. त्यांस आणावयाच्या विचारांत कैलासवासी महाराज होते. तेव्हां प्रसंग जाहालियावरी आणावयास फौज पाठविली. छ २६ मोहोरमीं आले. तमाम राज्यांतील सरदार, सरकारकून, अरकानीदौलतानी[७], समस्त लहानथोरीं तसलीमात[८] बज्यां[९] आणिली. श्रीनें राज्यपदारूढ केलें. छ ६ सफरीं सिंहासनारूढ जाहाले. मोठा जलूस[१०] जाहाला. उमर बेवीस, तेवीस वर्षांची. तारुण्य राजतेजयुक्त, प्राक्तनवान आहेत. तदनुरूप किमपि व्यंग न पडतां, राज्याचा बंदोबस्त उत्तम रीतीनें जाहाला. उभयतां सरदार माळवा प्रांतें रवाना जाहाले." म्हणून लिहिलें तें कळलें. कैलासवासी महाराज केवळ अवतारी, पुण्यवान होते. दिग्विजय संपादून तमाम राजप्रजा स्वामींस निरवून परंधामास गेले. स्वामींनीं यथोचित सार्थकता करून, त्यांच्याच मनोभिष्ठानरूप राजश्री छत्रपति स्वामींस पदारूढ केलें. राज्यभाराचा बंदोबस्त उत्तम रीतीनें केला. या गोष्टीचा कीर्तिघोष या दिशेस आगाऊ पंधरा दिवस प्रविष्ट जाहाला. मित्रशत्रूंस आल्हादखेद प्राप्त जाहाला. राजश्री छत्रपती स्वामींचे व स्वामींचे पदरीं अगाध पुण्य. तन्मुळें किमपि व्यंग पदार्थ न पडला. पूर्वी श्रीमंत कैलासवासी रावसाहेब[११] व श्रीमंत आपासाहेब वर्तमान[१२] असतां सेवकासमक्ष चर्चा केली कीं "राज्यांतील सेवा व खावंदाचे चितवातीं असते तरी, एक वेळ प्रजापाळण करून दाखवितों." त्यास उभयताचे मनोभिष्ट पूर्वपुण्यें स्वामींचे पदरीं आलें. उत्तर, दक्षण, पश्चम, तीन दिशेचा बंदोबस्त महाराजांच्या तेजप्रतापें सहजगतीनें जाहालाच आहे. राहिली पूर्वदिशा[१३]. येथील बंदोबस्त सेनासाहित्यें अथवा सामदामदंडभेदें

---

५ सर्व ६ पेठा ७ दौलतीचे खांब=मुख्य मुत्सद्दी. ८ वंदन, प्रणाम. ९ बजाविलीं (?) १० उत्सव, समारंभ. ११ बाजीराव व चिमाजी १२ हयात. १३ बंगाल वगैरे प्रांत. अमृतराव या वेळीं बंगाल्याकडे स्वारींत गुंतला असावा असें दिसतें.

करून सेवकास शत्रुमित्रा देखतां यशस्वी करून चरणाजवळ नेणें हेंही सबळ कीर्ति महाराजांची आहे. नबाब महाबतजंग यांस थैला आला, तो त्याजकडे कौंसीद घेऊन मेदनीपुरास गेले आहेत. उत्तरें जाहालियावरी सेवेसी येतील, सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ इतिहाससंग्रह ऐ. टि. भा. १ पृ. ६६ ]

---

# रामराजाची जबानी.



थोरल्या शाहू महाराजांच्या नंतर जो रामराजा पदारूढ झाला तो बरेंच दिवस अज्ञातवासांत असल्यामुळें त्याला खुद्द राणी सकवारबाईचे पक्षाभिमानी लोक ( भोसले कुळांशीं ) अनौरस मानीत. पण हा रामराजा धाकट्या शिवाजीचा मुलगा होता; हें ऐतिहासिक सत्य ढळढळीतपणें सिद्ध झालें असून सुद्धा तंजावर येथील वारसाच्या खटल्यांत ' हल्लींचे सातारकर, भोंसल्यांचे अस्सल वंशज नव्हेत ' असें प्रतिपादन, कांहीं स्वार्थी लोकांकडून केलें गेलें ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे. पुढील पत्र हें, या दुर्दैवी रामराजाची, प्रत्यक्ष अस्सल जबानी आहे.

श्री १६७१ फाल्गुन शु. ५

स्वस्ति. श्री राज्याभिषेक शके ७६ शुक्लनाम संवत्सरे, फालगुण शुद्ध पंचमी, गुरुवासरे, क्षेत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति यांणीं समस्त

---

१४ जासूद.

राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित अमात्य हुकमतपन्हा व राजश्री शिवराम पंडित छंदोग अमात्य मुतालीक यांसी आज्ञा केली ऐसीजेः—

निळो सोनदेव यांसी, तीर्थस्वरूप कैलासवासी थोरले शिवाजी यांणीं राज्य संपादन केलें. ते समयीं वतनी मजमू सांगोन, त्यासी सर्व लिहिण्याचे मुख्त्यार करून दिल्हा. महाराजांनीं व त्यांणीं बहुत प्रेत्नें किले कोट जुने होते त्याचा पुस्तपन्हा करून नवे किले बांधिले. उपरांत, विज्यापूर, भागानगर दौलताबादच्या पातशाहांनीं फौजा रवाना केल्या. त्यांसी लढाया देऊन पराभव केले. पुढें दिल्लीहून सुभे आले तेहि पराभविले. जैसिंग यांणीं थोरले महाराज व संभाजी महाराज दिल्लीस नेले. ते समयीं निळो सोनदेव यांणीं राज्य रक्षिलें. दिल्लीहून आल्यावर निळो सोनदेव मृत्य पावले, नंतर राज्याभिषेक जाला. त्याजवर तुमचे बाप रामचंद्र नलिकंठ यांसी मजमूचे दरख दिल्हे. तीर्थस्वरूप कैलासवासी संभाजी राजे व शाहू राजे पातशहास हस्तगत जाले. तीर्थस्वरूप कैलासवासी राजारामसाहेब चंजीस गेले. मागें पातशाहासी रामचंद्रपंतांनीं लढाया देऊन राज्य संरक्षिलें. तीर्थस्वरूप महाराज, मातुश्री आईसाहेब व आमचे तीर्थरूप शिवाजी महाराज व तीर्थस्वरूप संभाजी महाराज रांगणियाचे मुलकीं असतां तीर्थस्वरूप कैलासवासी शाहू महाराज दिल्लीहून आले. ते समयीं त्यांसी अनकूल न व्हावें म्हणोन मातुश्री साहेबीं व तीर्थरूपांनीं रामचंद्रपंताजवळ शफत घेतली. यामुळें शाहू महाराज सातारियास राहिले. आमचे तीर्थरूप व चुलते पनाळियास राहिले. त्याजवरून शाहू महाराज आबासाहेब यांणीं तुमचें अमात्यपद दुसरियास दिल्हें. आमच्या तीर्थरूपांस आमच्या चूलत्यांनीं नजरबंद ठेविलें. उपरांत तुम्ही कीलक संवत्सरीं सातारियास येतांच तुमचें अमात्यपद व दरख तुम्हांस दिल्हें. याजकारिता बाबासाहेब यांणीं वारणेचा तह करून तुम्हांस घेऊन गेले. पनाळियास तीर्थरूप नजरबंद असतां आमचा जन्म जाला. ते काळीं वडिलांनीं आम्हांस शिवराम पंडित यांचे स्वाधीन केलें. त्यांणीं आपली स्त्री सौ दुर्गाबाई याजवळ बावडियास ठेविलें. त्यांणीं पंधरा सोळा वर्षे पुत्रापेक्षाहि लोभ करून

संगोपन केलें. ते वेळेस मातोश्री साहेबांनीं राजश्री भगवंतराव हरी दप्तरदार यांस तीर्थस्वरूप आबासाहेब यांच्या अनुमतें नेहमीं बावाडियास जाऊन साहेबांस व महाराजांस हरवख्त वर्तमान कळवीत आले. तेथें बोभाट होऊं लागला. याजकरितां पानगांवीं पोहोचाविलें. तेथें व तुळजापुरीं हा कालपर्यंत आज्ञातवास कमिला. हल्लीं आबासाहेब याणीं सातारियाचे मुकामीं आणून प्रकट करावयासी तुम्हांस शिराळियाहून आणिलें. तों त्यांचे शरीरीं स्वस्थ नाहीं. आरोग्यता जालियावर प्रकट करावें. इतकियांत कैलासवास जाला. हल्लीं मातुश्री साहेबीं राजश्री बाळाजी पंडित प्रधान व गोविंद खंडेराव चिटणीस यांसी आज्ञा करून आम्हांस आणून सिंहासनरूढ करून लग्न केलें.तुमचे दरख पूर्ववत् तुम्हांस द्यावे म्हणोन आज्ञा जाली. त्याजवरून पेशजी दरखदाराकडून दूर करून तुमचें अमात्यपद व सर्व लिहिण्याचे दरख करार करून दिल्हे. [ ग्रंथमाला, १२० वा अंक ]

---

# शिंदे होळकरांचा पराक्रम.



श्री. १६७२ ज्येष्ठ शु. ९

बाळाजी बाजीरावाचें जयाजी शिंदे यांस पत्रः—

तुम्हीं जयनगराहून निघालियावर एक पत्र आलें. त्या आलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तुमची व नबाब[1] वजीर यांची भेटी जाली, यमुना पार होऊन कादरगंजाजवळ दहा हजार पठाण सरदारसुद्धा बुडविला; तेंहि वर्तमान भरभारेंच येऊन पोहोंचलें. तदोत्तर अहमदखा पठाण बंगस प्रयागास म्हासरों[2] करून होता तो उठवून फरोखाबादेस येऊन लढाईस नमूद

---

१ अयोध्येचा नबाब सफदरजंग २ आसरा ( ? )

जाहाला. त्याची तुमची लढाई सुरू जाहली. अहमदखा बंगशांनीं फरोका-बाद गंगातीरास बेहडों अडचण जागा पाहून आरावों रचून त्याची तुमची नित्य लढाई होऊं लागली. तथापि वर्तमान लिहिलें नाहीं. याजवरून अपूर्वता, आश्चर्य वाटलें. प्रस्तुत राजेश्री दामोदर महादेव यांचें पत्र छ ७ जमा-दिलावरचें छ ५ रजबीं येऊन पावलें कीं " अहमदखा बंगस बहादूरखा रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहा बारा हजार स्वारप्यादे यांशीं कुमकेस आणिलें. सरदारांची फौज व जाटांची फौज व नवाब वजीराची फौज गंगापार होऊन छ ३ जमादिलाखरीं लढाई जाली. बहादुरखा रोहिला बुडाविला. हजारों घोडीं घेतलीं. हत्ती पाडाव केले. हें वर्तमान बंगसांनीं ऐकून घाबरा जाला. दुसरे दिवशीं पळून गंगापार गेला. लष्कराच्या लोकांनीं घोडीं पाडाव आणलीं तोफखाना पाडाव केला." म्हणोन लिहिलें. तें श्रवण होऊन संतोषाच्या कोटी जाहल्या. शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी रूस्तुमीची ! व शाबास लोकांची. आमच्या दक्षिणच्या फौजांनीं यमुना गंगापार होऊन रोहिले पठाणांसीं युद्ध करून आपण फत्ते पावावे हें कर्म लहान सामान्य न जालें! तुम्ही एकनिष्ट, कृतकर्म सेवक; या दौलतीचे स्तंब आहां ! जे चित्तावर धरितां ते घडून येतात. पाहिलीं यशावह कर्में संपा-दिलींत ततोभ्याधिक हें यश संपादिलेंत. या यशास जोडाच नाहीं. परंतु केल्या मनसुबियाचा अर्थ किमपि लिहीत नाहीं ऐसें नसावें. सर्वदा आपलें कुशल वृत्त लिहित जाणें. तेणें करून संतोप होत जाईल. मोठा मनसबा कठिण होता. नाना प्रकारचीं येथें वर्तमानें उठतात. तुमचें पत्र तों येत नाहीं. याजमुळें चित्त चिंतेंत होतें. इराण, तुराण, पावेतों लौकिक जाला कीं वजीर मोडला, पळाला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर बसाविला. याजहून यश कोणतें अधिक आहे ? या उपरि तेथील रंग भरून, स्वकार्य

---

३ नाल्याच्या प्रवाहामुळें झालेली खोल भेग. ४ तोफखाना ५ हिंगणे ६ शिंदेहोळकरांची. ७ सुरजमल्ल जाट. ८ धरलें. ९ अति आनंद १० धारिष्टाची व पराक्रमाची ११ सफदरजंगास पठाण लोकांनीं पदच्युत केलें होतें त्यास पुनः वजीरी दिली.

साधून, आपले मुलुखांत येणें योग्य आहे. छ ७ रजब बहुत काय लिहिणें. लेखनसीमा. [ का. इ. सं. पत्रें ले. १८२ ]

# म्हैसूराकडील राजकारण



श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी. विनंती. सेवक मुकुंद श्रीपत साष्टांग दंडवत विज्ञापना. येथील क्षेम तागाईत छ २३ रबिलाखरपर्यंत स्वामींचे कृपेकरून सेवकाचें व प्रांत मजकूरांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पेशजी आज्ञापत्र सादर केलें कीं " नंदराज सर्वाधिकारी यांस व हैदर नाइकास जिद वाढला आहे. या समयीं अंतरंगीं संदर्भ लाऊन नंदराजाकडून करारनामा आणवावा कीं ' चौथाई व सरदेशमुखीचा अंमल बसवून द्यावा. ' येणेंप्रमाणे आपले मोहरेनिशीं लिहून दिलिया, हैदर नाइकाचें पारिपत्य करून नंदराजाची स्थापना करावी " म्हणोन. येविषयीं पेशजी लिहिणें तें लिहून पाठविल्यास नंदराजाकडील पत्रें मोघम आलीं होतीं. तीं पत्रें सेवेसीं रवाना करून सेवकाकडून सेवेसीं विज्ञप्तिपत्रें लिहिलींच आहेत. त्यांवरून श्रुत जाहलेंच असेल. अलीकडील वर्तमान. नंदराजाकडे सविस्तर लिहून पाठविलें कीं ' मोघम लिहिल्यास कार्यभाग समर्पक होणार नाहीं. आपले मोहरेनिशीं श्रीमंतांचे नांवे करारनामा,

---

१२ काव्येतिहाससंग्रहकार या पत्रासंबंधीं म्हणतात " हें पत्र वाचून हल्लीच्या हतवीर्य लोकांसहि क्षणभर स्फुरण येईल. तेव्हां ज्यांनीं असे पराक्रम केले त्या लोकांस हा स्वामिगौरव अमृताहून गोड लागून शरीर दुणावलें असेल."

चौथाई व सरदेशमुखीचे अंमल बसवून देवितों, फौजेचे खर्चास तरतूद करून लिहून पाठविल्यास फौजेसुद्धां कुमक करून तुमची स्थापना केली जाईल ' म्हणोन लिहोन पाठविलें आहे. करारनामा व खर्चाचे मजकुरास सेवकाचे नांवीं त्याचे कारभारी यांचे नांवचें पत्र पाठविलें आहे. सदर्हू पत्रें बहुत निकडीनें ब्राह्मण माणूस घेऊन छ २१ रोजीं रात्रीं येऊन होसकटेस दाखल जाहले. बजिन्नस त्यांचे मोहरेचा करारनामा येथें ठेविला आहे. त्याची नक्कल व कारभारी व्यंकटराव व श्रीनिवासराव बरकी यांचें पत्र आमचे नांवीं आलें तें पत्र, देखील नंदराजांनीं सेवकास लिहिलें पत्र, बजिन्नस सेवेसीं पाठविलें आहे. त्यावरून सेवेसी श्रुत होईल. म्हैसुराकडील वर्तमानः— नंजराजाकडील जमाव अर्धकोस अलीकडे चौकीबंदी करून उतरले होते. हैदर नाईक आपले जमावासुद्धां पट्टणापलीकडे दोन कोस उतरले होते. त्याचा यांचा अर्धकोसाचा तफावत होता. नंजराजाकडील कित्येक फिरंगी वगैरेनीं फितुरांत मिळाले. त्याजवरून वीस दिवसाखालीं लढाई जाहाली. ते समयीं फितुरीमुळें हैदर नाइकांनीं एक पेठ घेऊन किल्याचे समोर एक मोर्चा कायम केला आहे. हैदरनाइकाकडील जमावपैकीं कृष्णगिरीकडे कित्येक फौज गुंतली आहे. हल्लीं म्हैसूरजवळ दोन हजार स्वार व तीन हजार बार, तोफा वगैरे सामान आहे. नंदराजाचें मत जे ये समयीं कुमक पावलिया कार्यभाग विवेक होऊन आपली स्थापना होते. पुढें ऐसा समय मिळणार नाहीं. त्याजवरून जरूर जाणून राजश्री भगवंतराव त्रिंबक व राजश्री महिपतराव कवडे यांजकडे दोन आवर्तें पत्रें पाठविलीं. परंतु तिकडे बसालतजंगाचा शह लागला होता. हल्लीं बसालतजंग दरकुच अदवानीकडे जाणार ऐसी आवाई घातली आहे. त्याचे जाणें तिकडे जालिया कडपेकडील जमाव येईल. ते जमाव आलिया घोरपडेकडील जमाव आणून स्वामींचे पुण्यप्रतापेकरून राजकार्य घडऊं ये. या जरूरास इतके प्रयत्न होणेस गांठीं कैशी पडेल ? थोर राजकारण अनायासें येऊन बनलें आहे. फौज हाताखाले नाहीं. त्यावरून आणखी टाकोटाक कडपेकडील फौजेस लिहिणें तें लिहिलें आहे. येविषयीं हुजुरून फौज रवाना करून आणि कडपेकडील राजश्री भगवंतराव त्रिंबक व महिपतराव कवडे यांचें नांवें

लिहिणें तें लिहून सांडणस्वारास पाठवून, कुमक पोहचेसे आज्ञा केल्यास काम घडून येणेस संशय नाहीं. यावरी सेवकास जे आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. सडी फौज पांच हजार स्वार जलद रवाना करावे. बाहीर बुणगा माघारा येईल. सडी फौजेस ताकीद रुबरू व्हावें कीं 'कुच दरकुच बारा कोस, चवदा कोस येणेंप्रमाणें येऊन पावावें ' ऐशी आज्ञा व्हावी. येविषयीं राजश्री मुरारराव घोरपडे व महिपतराव कवडे यांचे नांवें ताकीदपत्रें सादर व्हावी. नंदराज यांजकडे हैदरनाईक यानीं राजकारण लाविलें होतें कीं ॰क्ष हो॰चे राज्य तुम्हांस देतों. खाऊन सुखी राहणें.' परंतु सेवकांनीं इकडून वरचेवर धीर देऊन पत्रें लिहीत गेले, व स्वामींचें अभयपत्र त्यांस होतें तें प्रविष्ट केल्यावरून त्यांस धैर्य येऊन, हैदरनाईकाची गोष्ट कबूल न करितां, स्वामींचे ठायीं निष्ठा धरून, म्हटल्याप्रमाणें कबूल करून, करारनामाहि लिहोन पाठविला. सारांश हल्लींचा समय पुढें येणें नाहीं. हल्लीं अल्प कष्ट करून नंजराजाची स्थापना होऊन चौथ सरदेश-मुखीचा अंमल बसतो, पुर्ते संस्थान आपलें होतें. राजेश्री नंदराज यांजवळ हल्लीं तीनशें फिरंगी, दीड हजार स्वार, तीन हजार बार, तोफखाना सरंजाम आहे. परंतु त्यास कुमक नाहीं. सरकाराकडून कुमक जाहलियास ते तिकडून, आम्ही इकडून त्याचें पारिपत्य यथास्थित होईल. सारांश, अंगेजी केल्यास हैदर नाईक याची बिशाद कांहींच नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. [ऐ. टि. भा. २ पृ. ६१-६२]

---

# ६ पादशाहीच्या संरक्षणाची जबाबदारी

थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत मराठ्यांच्या 'स्वराज्याचें साम्राज्य बनूं लागलें होतें. परंतु या साम्राज्याचें दिल्लीच्या पातशाहीशीं कशा प्रकारचें नातें असावें हा प्रश्न संदिग्ध राहिला होता. पातशाहीच्या

वजीरांशीं व नबाबाशीं लढत असतांना देखील पातशाही सनद मिळविण्याची इच्छा मराठे व्यक्त करीत होते; पण सनद मिळविणें याचा अर्थ पादशाही दरबारांतलि सर्व कारभाराचींच सूत्रें आपल्या हातीं घेणें असा असल्याचें हळुं हळुं त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. अबदालीच्या मोहिमांमुळें तर या सूत्रचालकानें पातशाहीच्या संरक्षणाचीहि जबाबदारी पत्करली पाहिजे असें दिसून आलें. अशा रीतीनें सनदा व राजसूत्रें यांच्या प्राप्तीबरोबरच उत्तरेकडील संरक्षणाची जबर जबाबदारी मराठ्यांच्या अंगावर येऊन पडली. या कामीं शिंदे व होळकर हेच प्रामुख्यानें वागत होते व त्यांच्यावर भिस्त ठेऊनच बादशाहाने पुढें दिलेला करारनामा मराठ्यांशीं केला. या वेळच्या दिल्लीच्या बादशाहाचें नांव अहमदशाहा व मुख्य वजीराचे सफदरजंग; ' नबाबबहादर ' व ' वजीरबहादर ' असे उल्लेख या अहदनाम्यांत म्हणजे करानाम्यांत येतात ते या सफदरजंगाचे. रोहिले व अहमदशाहा अबदाली यांचा दंगा मोडण्याकरिता या वजीरानें मराठ्यांना मदतीस बोलावलें होतें. मुलतान, पंजाब, सिंध, रजपुताना व रोहिलखंड इतक्या विस्तीर्ण प्रदेशावर चौथाई बसविण्याचा हक्क मराठ्यांना या करारनाम्याच्या जोरावर प्राप्त झाला व या हक्काच्या संरक्षणार्थ पुढें दहा वर्षें अबदालीशीं, रोहिल्यांशीं व रजपुतांशीं त्याना झुंजांव लागलें.

या करारनाम्याच्या पूर्वार्धांत ( अर्जांत ) अमुक अमुक कामगिऱ्या अमुक अमुक किफायतीसाठीं आम्हीं करूं असा मराठ्यांच्या तर्फे अर्ज केला आहे; व त्याचें उत्तर उत्तरार्धांत दिलें आहे. येथें पूर्वार्धाचें अधुनिक मराठींत भाषांतर दिलें आहे. मूळ करारनामा फारशींत लिहिलेला असावा. त्याचें तत्कालीन मराटी भाषांतर सापडलें तें इ. स. राजवाडे यांनीं शोधून व त्याचें भाषांतर करून तें म. इ. सा. खंड १ च्या पहिल्या लेखांकाबरोबर छापलें. त्यांतून हा उतारा घेतला आहे.

दिल्लीच्या पातशाहाशीं बरोबरीच्या नात्यानें करारनामा करण्याचा अधिकार त्यावेळीं हिंदुस्थानांत कोणालाच नाहीं असा सार्वत्रिक व लोकमान्य समज असल्यामुळें या करारनाम्याला अर्जीचें स्वरूप आलें आहे हें उघड आहे. बाजीरावानें इंग्रजाना जसें सर्व राज्य दान दिलें त्या

प्रमाणेंच दिल्लीच्या पातशाहानें सर्व हिंदुस्थान ह्या सनदेनें पेशव्यांना देऊन टाकिलें. ह्या सनदेंत साताऱ्च्या महाराजांचें नांव नाहीं !

[ खंड १ पृ. ३. ]

राजश्रिया विराजित बाळाजी बाजीराव यांस दिलेल्या उच्च फरमानाची नक्कल.

प्रस्तुत राजश्री मल्हारराव होळकर व पातशहाचे दोस्त आणि वीरशिरोमणी जयाजीराव शिंदे यांच्याशीं तह येणेंप्रमाणें केला कीं—

'श्री महादेवाची व खंडेरावाची व धर्माची व स्मृतीची शपथ व साक्ष तुम्हां आम्हांस आहे कीं आम्ही आमरणांत तुमची आज्ञा व सेवा व चाकरी व तुमच्या शत्रूचें पारिपत्य करण्याचा मनापासून प्रयत्न करूं—मग तो शत्रु अबदाली असो किंवा दुसरा कोणी राजा असो अथवा एखादा लहान मोठा जमीदार असो—सारांश जो कोणी सरकारचा हुकूम मोडील त्याला तंबी देऊं व हुजूरच्या पुढं आणूं आणि आपल्या हुकुमाच्या एक केसभरही कमजास्त वर्तणूक करणार नाहीं. जेणेंकरून आपल्या अखंड राज्याचे व खुद्द हुजूरचें कल्याण होईल अशीच तजवीज करूं; आणि जेणेंकरून हुजूरचें व नबाबबहादरांचें समाधान व वजीरबहादराची मर्जी राहील त्याच गोष्टी अमलांत आणूं; आणि जो कोणी हुजूरजनाब यांचा व नबाबबहादराचा दोस्त असेल त्याला आम्ही आमचा दोस्त म्हणूं व जो कोणी हुजूरचा व नबाबबहादराचा शत्रु व दुष्मन असेल त्याला आम्ही आपला शत्रु समजूं; आणि जो कोणी सरकारच्या हुकुमीं आपलें तनमन खर्चणार नाहीं त्याला आम्ही शिक्षा करूं. आणि पन्नास लक्ष रुपयापैकीं अबदालीच्या पारिपत्याकरितां तीस लक्ष रुपये आम्हांस पावते झाले व मुलतान, पंजाब, थटा व भकर या सुभ्यांची व त्याच्या फौजदारीची व चार महालांच्या साऱ्याची व हिसार, संबळ मुरादाबाद व बदाऊचे फौजदारीची चौथ आमच्या सैन्याच्या खर्चाकडे लावून दिली आहे; आणि दोन भाग हुजूरच्या खालसाकडे लावून दिली आहे. आणि एक हिस्सा वजीरबहादर व नबाबबहादर यांजवळ असणाऱ्या पातशाही सैन्याच्या खर्चाकडे लावून दिली आहे. येणेंप्रमाणें करार केला आहे.

आणि पवित्र अजमीर सुभ्याची सुभेदारी व नारनोल व सांभर वगैरेची फौजदारी व त्यांच्या मुतालकी व अकबराबादेची सुभेदारी व मथुरा वगैरे यांची फौजदारी व मुतालिकी व दुसऱ्या शर्तीतल्या सुभेदाऱ्या व फौजदाऱ्या व त्यांचे नजराणे सेवकास मुकरर केले आहेत व बक्षीस दिले आहेत. म्हणून आम्ही शपथपूर्वक कौलकरार करितों कीं ह्या सुभेदारीतील व फौजदारीतील राजांच्या व जमीनदारांच्या अन्नप्रमाणें मामूल वहिवाटीला अनुसरून सर्व अटी पाळीत जाऊं व त्या सुभेदारीचे व फौजदारीचे जे हक्क व लवाजम असतील त्यांचा कबजा घेऊं; व सुभ्यांचा व फौजदाऱ्यांचा पक्का बंदोबस्त करूं; व पातशाही राजे रजवाड्यांचे ताब्यांतील मुलुखापैकीं जुना प्रांत कोणी बळकाविला असेल तो त्याच्या ताब्यांतून काढून अर्धा सरकारांत देऊं व अर्धा सैन्याचे खर्चाकरितां आम्ही आपलेकडे ठेवूं आणि एखादा प्रांत खालसा करण्याचे वेळेस व फिसाद्यांचे पारिपत्य करण्याचे वेळेस जी अधिक फौज, सरदार, शिपाई व तोफखाना आम्ही ठेवूं ती हुजुरतैनातींतील समजत जावी. आम्ही दोघे व इतर अमीर उमराव नित्याप्रमाणं हुजूरच्या सेवेंत हजर राहूं. आणि अबदाली वगैरेंचें पारिपत्य करण्याचे कामीं आमचाच सल्ला हुजूर ऐकतील तर तें काम आम्हीं स्वतःच बजावूं. आणि तें काम करण्यास हुजूरची स्वारी स्वतःच जाणें जरूर पडेल तर आम्हीं आपल्या स्वारीबरोबर येऊं आणि जिवापाड मेहनत करूं. अथवा तें काम अमीरांच्या हातून होत असल्यास आम्ही विनंति करूं त्या अमीरांनाच पाठवावें; किंवा त्यांची सल्ला घेऊन तें काम आम्हीं करूं. आपण आज्ञा कराल त्या वेळेस हुजत घालणार नाहीं. आणि केलेल्या कौल कराराखेरीज हुजूरची आज्ञा विशेष मानून व धर्म व स्मृति यांचे जागीं आपली आज्ञा मानून, ह्या तहाच्या पूर्वी ज्या जागा हुजूरच्या खास ताब्यांत होत्या त्या आम्ही आपल्या ताब्यांत घेणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या जागांचा बंदोबस्त ठेवूं. जे जहागीरदार सरकार चाकरी करीत नसतील त्यांच्या जहागिरी सरकारांत दाखल करूं; आणि त्यांतून आपली चौथ काढून घेऊं; आणि केलेल्या कौलकराराशीं कधींहि फिरणार नाहीं. आणि जन्मापर्यंत आपले ताबेदार राहूं. आम्हांस जर दक्षणेस जाण्याचें अगत्य पडलें तरी

हुजूरच्या चाकरीकरितां व शत्रूंच्या पारिपत्याकरितां येथें फौज ठेवून जाऊं. तसेंच जो वायदा करूं त्याप्रमाणें बिनचूक परत येऊं. लहानथोरांची शिफारस आपल्यापाशीं विचारपूर्वक करूं. आम्ही मुसलमानांच्या व हिंदूच्या धर्माचें संरक्षण करूं. कोणाला अडथळा करूं देणार नाहीं. ज्या अर्थी अबदालीवर मोहीम करण्याकरितां तीस लक्ष रुपये आपण आम्हांस दिले आहेत त्या अर्थी अबदाली ह्या अगर पुढील वर्षी आल्यास त्याचें पारिपत्य करण्यास यत्न करूं. पंजाब, मुलतान, थटा, भकर व चार महाल मजारफ काबील व मुरादाबाद, संबल, हिसार व बदाऊं ह्या सुभ्यांची चौथ आम्हांला आपण दिली आहे. ती हुजूरचे दोन हिस्से व वजीरबहादर व नबाबबहादर ह्यांच्या फौजेच्या खर्चाकरितां एक हिस्सा देण्याचें ठरलें आहे; तर मुलूख मजकूरचा बंदोबस्त केल्यावर आम्हीं आपली चौथ घेऊं. सुभेदारी पेशकशा शिवाय पातशाही जमेदार व रजवाडे यांच्या पेशकशांच्या ज्या बाबती हुजूरचे कारकून लोक दाखवून देतील त्या वसूल करून, त्यांतून आपली चौथ काढून घेऊन बाकी सरकारांत पोचती करूं. सुभ्यांतील व फौजदारींतील अदालतीचे जे किल्लेदार व दरोगे नेमले आहेत यांच्या नेमणुका व बदल्या हुजुरनींच कराव्या. किल्लेदारांना सोंपविलेले किल्ले व गांव आणि दिवाणी व खानगी पातशाही खिदमता, तसेच त्यांचे लवाजमे व लवाहक व बागा व इमले ह्यांच्यावर आम्हीं जबरदस्तीनें हक सांगणार नाहीं. पातशाही मुत्सद्यांच्या भोगवट्यास अडथळा करणार नाहीं. त्यांना मदत करूं व करीत जाऊं. पातशाही शहराच्या आंत बाहेरचा बंदोबस्त करूं आणि रस्त्यांत उपद्रव करणाऱ्या व वाट मारणाऱ्या चोरांचे व हरामखोर किल्लेदारांचें पारपत्य करूं. जेणेंकरून व्यापारी व मुसाफर सुरक्षित रहातील असें करूं जे जहागीरदार जहागिरी खाऊन आज्ञेंत रहात नाहींत त्यांच्या जहागिरा हुकमाप्रमाणें जप्त करूं; व त्यांतून आपली चौथ काढून घेऊं. दीन व धर्म व महादवजी व खंडेरावजी दरमियान आहेत.

---

# सत्तेच्या केंद्रीकरणाचा अभाव.



बाळाजी विश्वनाथानें छत्रपति शाहू याच्या अमलाखालीं जे मोठ मोठे लोक होते त्यांची चांगली जूट केली. त्यावेळीं सर्वांचा भाव शिवाजी महाराजांच्या गादीकडे असे. पण या सर्व मंडळीस एकत्र करून सुरळीत-पणें कामकाज करावयाचें ही शक्ति शाहू महाराजांत नव्हती. मग राज्य चिरस्थायी करावयास जी रचना करावी लागते ती करावयाची कोठून असणार ? पेशव्यांनीं आपल्या अलौकिक बुद्धीनें ही जूट एकत्र करून त्या-पासून पुष्कळ कार्य केलें खरें, पण त्यास चिरस्थायीपणा जेणेंकरून येईल असें एखादें कार्य त्यांच्या हातून झालें नाहीं. त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं निःस्वार्थतेनें छत्रपतीच्या नांवानें राज्य केलें खरें. तरी त्यांच्या कर्तृत्वशक्तीनें अथवा छत्रपतीच्या कमकुवतपणानें त्यांचें प्रस्थ माजलें व ते स्वतःच मराठी राज्याचे चालक होऊन बसले. पेशव्यांनीं मराठी सत्तेचें प्रस्थ माजविण्या-संबधानें जिवापाड परिश्रम केले व तें त्यांनीं माजविलेंहि; पण त्याबरोबरच त्यांनीं आपलें स्वतःचेंही प्रस्थ माजविलें ! हें इंग्लंडच्या इतिहासावरून अधिक स्पष्ट रीतीनें सांगतां येईल. चॅथॅम, पिट, ग्लॅडस्टन, बीकन्सफील्ड इत्यादिकांनीं इंग्लंडचें वैभव वाढविलें व हेस्टिंज आणि क्लाइव्ह यांनीं हिंदु-स्थानांत तेंच केलें; पण आपआपला कार्यभाग आटपला कीं मग ग्लॅडस्टन कोण व क्लाइव्ह कोण ? तसें त्यांनीं केलें नाहीं. शिवाजीनें आपलें राज्य आधीं व्यवस्थित करून मग त्यांत अष्टप्रधानांच्या नव्या पद्धतीचें बीजारोपण केलें. पण तिकडेही जर कोणाचें नीट लक्ष गेलें नाहीं तर मग हजारों कोसांवरून आलेले विदेशी लोक या परदेशांतही आपआपला राज्यकारभार किती व्यवस्थित रीतीनें व सुरळीत प्रकारानें करीत आहेत हें पहावयाचें कोणी ? आपण म्हणजे राजसत्ता बळकवावी हा पहिल्या पेशव्याचा हेतूहि नव्हता. पण अधिकार, जागा आणि जाती या वंशपरंपरा चालावयाच्या दुष्ट व घातुक साधनानें आम्हांस आपलें हित तर साधतां आलें नाहींच, पण त्यायोगें इतिहासांत जो धुमाकूळ उडवून दिला आहे तो सांगतां

पुरवत नाहीं. हें सांगावयाचे कारण हेंच की पेशव्यांनीं जें केलें तेंच पुढें होळकर, शिंदे, गायकवाड, पवार, भोंसले इत्यादिकांनीं केलें. ज्याप्रमाणें सूर्याचे किरण सूर्यकांत मण्यांतून जाऊन केंद्रांत मिळतात व पूर्वींची असमर्थता सोडून साधारण जिन्नस जाळावयास समर्थ होतात त्याप्रमाणें मराठी सत्तेचें झालें नाहीं. कारण त्या राज्याची रचना सूर्यकांत मण्याप्रमाणें नव्हती. त्यामुळें त्यांच्या प्रभावाचीं किरणें एकत्र होऊन जो परिणाम व्हावयाचा तो झाला नाहीं. पेशव्यांनीं आपल्या सरदारांस वाढवून मराठ्यांच्या राज्याचा विस्तार केला खरा, पण त्यामुळें प्रत्येकाचें लक्ष आपआपल्या प्रांताकडे लागलें. त्यामुळें आपणास एकत्र राहून कांहीं कार्य करावयाचें आहे इकडे कोणाचें लक्ष लागेना. ह्या प्रांतविस्तारांतच भावी अधःपतनाचीं चिन्हें बीजरूपानें दिसतात. हा राज्यविस्तार करण्यापेक्षां आपल्या राज्यास स्थाइकत्व कशानें येईल, याचा विचार करण्याकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. त्यांचें लक्ष आपल्या संस्थानाकडे लागल्यानें जितकीं संस्थानें तितकीं केंद्रस्थानें झालीं. त्यामुळें उद्दिष्ट कार्य करावयाचें सामर्थ्य मराठी राज्यास राहणें शक्य नव्हतें.

पेशव्यांनीं आपल्या हाताखालच्या सरदारास जे मुलूख दिले, त्यांचे त्यास मालक केलें नाहीं. पेशव्यांनीं आपल्या सरदारांशी असा नियम केला होता की त्यांनीं आपल्या सैन्याच्या पोषणार्थ जमीनीचें अर्धें उत्पन्न घेऊन बाकीचें उत्पन्न पुण्याकडे पाठवावें. या सरदारांनीं आपल्याकडे सोंपविलेल्या गांवांचें जर नीट संरक्षण केलें नाहीं तर त्या गांवकऱ्यास आपल्या मालका-विरूद्ध पेशव्याकडे गाऱ्हाणें करतां येत असे. पेशव्यांनीं प्रसंगानुरूप अशी गांवें जप्तहि केलीं होतीं. पण हा प्रकार पुढें पुढें बदलत गेला. ज्याप्रमाणें छत्रपति निर्बल होऊं लागतांच पेशव्यांचें प्रस्थ माजलें त्याप्रमाणें पेशवे निर्बळ होऊं लागतांच त्यांच्या सरदारांचें प्रस्थ माजलें व तें पेशव्यास डोईजड झालें. पेशवे ब्राह्मण म्हणून त्यांनीं छत्रपतीस मागें टाकलें नाहीं अथवा पेशव्यांचे सरदार हे मराठे म्हणून त्यांनीं भट पेशव्यास मागें टाकलें नाहीं. राणोजी शिंदे वारला तेव्हां ( इ. स. १७४५ ) मल्हाररावाकडे ७४॥ लाखांचा मुलूख होता. त्यापैकीं होळकरांनीं ३७। लाख आपणाकडे

ठेवून बाकींचे २७। लाख पुण्याकडे पाठवावे असें होतें. पण पुढें होळकर हळुहळु या गोष्टीकडे दुर्लक्ष करूं लागले. अशा प्रकारांत आपल्या स्वतः साठीं कांहीं राहत नाहीं म्हणून त्यावेळीं 'खानगी' हें एक निराळें प्रकरण काढलें. या प्रकरणामुळे दिवसेंदिवस राष्ट्रोदरांत कमी कमी खुराक जाऊं लागला. त्यायोगानें त्यास चिमटा बसून त्याच्या इतर अवयवांची हि वाढ खुंटली.

नवीन उत्पन्न झालेले सरदार ज्याप्रमाणें आपआपलें हित पाहूं लागले त्याचप्रमाणें त्यांचे कारभारी व भाऊबंद हेही आपआपलें हित पाहूं लागले ! इतकेंच नव्हे तर ही साथ लहानमहान अधिकाऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचली व ज्याप्रमाणें श्रीशिवाजी महाराजांच्या मूळ मराठी राज्याचे दोन भाग झाले त्याप्रमाणेंच या संस्थानापैकीं कित्येकांचे अनेक भाग झाले व कांहीं तर कायमची लुप्त झाली.

[ पुरुषोत्तमकृत देवी श्री अहिल्याबाई चरित्र पृ. ११९-२३ ]

---

# आम्ही शिवाजी महाराजांचे शिष्य



श्री. शके १६७४ कार्तिक वद्य १०

राजश्री पिलाजी जाधवराव गोसांवी यांस—

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. उपरि. येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेष. नबाबांनीं राजश्रीचे जावायाचे जागिरीचे मजकुरावरून वाईट मानून तुटता सालजाब तुम्हांसी केला. वरकड नासरजंगाचे मर्जीप्रमाणें गरमी दाखवावी ऐसा विचार अवलंबिला. त्यास थोर आहेत, जे इच्छितील ते करतील ! करोत. आम्हांसी स्नेह चित्तापासून करावा, सर्व-

प्रकारें आम्हांस निखालस करावें, यासाठी नबाबांनीं जानबास व खानास पाठाविलें. त्यापाशीं किल्ल्याचा मजकूर नबाबाचे मर्जीप्रमाणें आम्ही कबूल केला. वरकडहि कितेक अर्थ जे नबाबाचे उपयोगाचे, तेच सांगून पाठविले. आमचा स्वार्थ त्यामध्यें कांहीं नाहीं. असें असतां नबाबांनीं सर्व एकीकडे ठेऊन गरमी दाखऊ लागले तर, आम्हांस श्रीकृपेनें काय चिंता आहे ? किल्ल्याचा तर आम्हांकडून गरमनरम मध्यस्तां करवीं बोलवून इमान प्रमाण आम्हापासून घ्यावा व आमचे जावसाल उडवून द्यावे असें करूं पाहातात; तर तें कैसें आम्हांस अनुकूल पडतें ? जे जे अर्ज आम्ही मध्यस्थाबराबर सांगून पा। आहेत ते आयकून सर्व प्रकारे आपलें नानोकुरान करून देतील तेव्हां आम्हीहि किल्ल्याविसीं इमान देणें तें देऊं. नाहींतर जें त्यास बरें दिसेल ते ते करतील. आम्ही गनीमलोक शिवाजी महाराजांचे शिष्य आहों ! छ २३ मोहरम बृहस्पतवार संध्याकाळ ( लेखनसीमा )

श्री [ खंड ६ पृ. ३५६ ]

राजा शाहु नरपति हर्षनिधान
बाळाजी बाजीराव मुख्यप्रधान

---

# साऱ्यांनीं एकमतें विचार करावा



श्री [ १६७५ वैशाख व. ९ ]

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर येशवंत स्वामी गोसावी यांसी पोष्य बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती. उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करणें. विशेष. मोगलाचा आमचा तह जाहला. तेव्हां तुम्ही व राजश्री मल्हारबा होते च. जें होणें तें तुमच्या साऱ्यांच्या विचारें च जाहालें. ऐसें असतां मोगलांचे किले मल्हार-

यांनीं व किरकोळ लोकांनीं घेतले. त्याम किल्याच्या जागिरा सरकारांत जप्त जाहाल्या तेव्हां किल्ले यावयास कांहीं अगाद आहे ऐसें नाहीं. सहजांत येतील; व आले. परंतु आम्हीं त्यासी करार केला तो करार लटका होऊन आपल्याकडे अंतर येतें. याजकरितां हे गोष्ट न करणें उचित. त्याम किल्ले घेतले तेव्हां इमानास अंतर आलें. मोंगलाचे मनांत विकल्प जाहला. तो दूर करून करारावर नजर देऊन आपले वजनानें त्यास किल्ले देऊन तह पक्का करावा अथवा या गोष्टीवर मोंगल न आइके तरी जो विचार करणें तो सारियानें एकमतें करून करावा. जुजावें. मोगल नाहींसा करावा. दोहींतून जो विचार करणें तो केल्यासिवाय न जावें. आम्ही हि येतों. याप्रो मल्हारबास व तुम्हांस येक दोन पत्रें लिहिलीं असतां मल्हारबा गेलेच म्हणून वर्तमान आहे. तुम्ही मात्र नासिकाजवळ आहां. त्यास आधीं तों मल्हारबा जवल असल्याम त्याणीं माघारें लक्ष प्रकारें यावें. आणि आम्हीं हि आठा चहूं दिवसीं पुणियास येतां उपरांतिक जो विचार उचित तोच करूं. जर हे गोष्ट न बनली, त्याचे येणें न जाहालें तरी तुम्ही जवल आहां. पत्र पावतांच कोण्हे गोष्टीचा उजूर न धरितां जलदीनें स्वार होऊन पुणियास येणें. तुम्हासी या गोष्टीचा विचार आचार बोलणें तो बोलोन तुमची रवानगी केली जाईल. तरी सत्वर येणें. आम्ही कुरुंदवाडानजीक कृष्णा उत्तरतीरीं आलों. सौ मातुश्री जिजाबाई किरकोळ कामासाठीं भेटीस आली. एका दो रोजीं जातील. श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेबाचा दर्शनाचा आग्रह आहे. त्याम त्याणीं निखालसपणें कृपा केलिया भेट घेऊन तेथलि हि निर्गम एका दो ती रोजांत करून लौकरीं च पुणियास येतों. तुम्हीं हि येणें. दिरंग न लावणें. तुम्ही सत्वर यावें. येथील विचारानरूप करावें. येणें करून लौकीक उत्तम व चित्तास प्रसन्नता आहे. विस्तार काय लिहिणें १ छ २२ रजब बहुत काय लिहिणें हे विनंति. [ चंद्रचूड दप्तर पृ. ३५ ]

२५२

# कर्जापुढें इलाज नाहीं!



श्री

पु॥ राजश्री मल्हारजी होळकर, जयाजी शिंदे गोसावी यांसि.

आशीर्वाद उपरि. नबाब लौकर आले तर गंगे आलीकडे भेट होईल. तूर्त नदीस पाणी आहे. अथवा नबाबास तूर्त एकाएकीं जवळ नेतां येत नाहीं, सबब एव्हां नबाबाची भेट महकूब करून जलद तुम्ही आम्ही मिळोन कामास जावें. ते नरम केलियावर नबाबांनीं जवळ यावें. ते समयीं सावकाश भेट होईल. परंतु भेटीस गुंतून काम नासावें ऐसें नाहीं. सैद लष्करखान, जानबा कित्येक तजविजांनीं आज पावेतों रहाविले. इतक्यांत नबाबाकडील तितके माणूस येऊन पावल्यास पुढेंही रहातील. सेवटेंत भरंवसा नाहीं. कां कीं, सलाबतजंगाचे कुचाचे गरमीनें दुदील[१] होतात. नबाबानीं जशी न करावी एतद्विषयीं लिहिविलें त्यास जशीची तांतड सहसा नव्हती. नालबंदीस तोटा तूर्त दहाचा आला, तुम्हींही ऐवज न पाठाविला, यास्तव जरूर पोटाचे संकटासाठीं रसदा घेतल्या. सर्वांपुढें इलाज आहे; पोटापुढें, कर्जापुढें, इलाज नाहीं. तो विचार पत्रीं काय लिहावा? भेटीनंतर समक्ष एक वेळ फार वाईट तुम्हाशीं बोलूं यांत संशय नाहीं. हणमंतराव निंबाळकरास लौकर एखादा मान्य पुरुष पाठवून भेटीस न्यावें. आम्हाशीं बोलले ते बेमान केलें. तें खरें लटकें हें परीक्षा जलद पाहावी. सारांश तुमचे भेटीसाठीं व पुढील तोडजोडीसाठीं इतके दिवस मुक्काम केला. या उपर जलद येणें. सहसा विलंब न करणें. छ २९ जिलकाद बहुत काय लिहिणें. लेखनसीमा. [ का. इ. सं. ले. ३९१ ]

---

१ दुदील= हिकडे तिकडे, अनिश्चित.

# दीक्षितामार्फत राजकारण



श्री

पौ॥ पौष वद्य १ सोमवार शके १६७६. छ १५ रबिलावल

वेदशास्त्रसंपन्न राजश्री वासुदेव दिक्षित स्वामींचे सेवेसीः--

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनंती उपरि येथील क्षेम जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. आपलें पत्र प्रविष्ट जाहलें. आमचा उदासीनतेचा अर्थ व त्यांचें समाधान करावयाचा विचार लिहिला तो अक्षरशहा अवगत जाहला. आम्हांसही खानाचें पत्र, मक्केस जातों, दस्तक व साहित्य हीं लागल तें द्यावें, म्हणून आलें. ऐशास खान दीर्घदर्शी, खेरीज यामारखें मनुष्य या जिल्ह्यांतून उदासीनतेनें गेल्यास आमचे नुकसान व नवाबाचें बहुत च नुकसान, ऐसें शहाणे लोक मानतील. इतकें उदास त्यानें व्हावें हें योग्य नाहीं. विवेकेंकरून नवाबाजवळच राहावें. त्याजविशीं नवाबास आम्ही कधीं ही सांगावयास अंतर करणार नाहीं. व आम्ही सांगितल्यावर नवाब ही त्याचें महत्व रक्षूनच चालतील. कदाचित् हा विचार मनांत न ये तर दिल्लीस जावें. तेथें मातबर शेवा करावी. हा ही प्रकार चित्तास न ये तर आम्हाजवळ रहावें. हें ही दौलत स्नेहाचे मार्गें त्यांचीच आहे. असें कोणतें संकट पडलें कीं, सर्व सांगतात तें न ऐकतां मक्केस जावें? दोनी पक्षांतून एखादे पक्षाचा बळवोत्तर पाहून, त्याचा अवलंब करून रहावें, उदास न व्हावें हा उत्तम पक्ष आहे. तुम्ही त्यांस समजावून सांगून जितकें होईल तितकें करावें. करू तर नवाबाचा सर्वाधिकार, नाहीं तर काहीं च न करू असें म्हटल्यास कसें कार्यास येईल? ते खांवद, हे सेवक. खावंदाचे सेवकाचे अर्डीनें आजपर्यंत कोणाचेंही

चाललें कीं काय ? याचा विचार खान पुरें जाणतात. तो आपले ध्यानांत आणून, ज्यांत आपलें स्वरूप राहे, नवाबाची चाकरी घडे तें करावें, योग्य आहे. आम्ही ही यांचे स्वरूपास अंतर पडे असें कदापि करणार नाहीं. तुम्हीहि समजावून सांगोन, ज्यांत त्यांची मर्जी हमवार राहे तें करणें योग्य. मामोपचारें व आपलेकडून ही खानाचें बरें करावयास अंतर मागें केलें नाहीं, पुढें करणें नाहीं. परंतु तुटे तों त्यांनीं ही तोडूं नये. त्यांनीं ही तोडून गेलियास, शहानवाजखान सूखच मानतील. यास्तव यांनीं तुटे तों वोढावें, हें अति उत्तम. असें असतां मनास येई तर, सर्व प्रकारें जाहाजाचें साहित्य करूं. मुंबईस साहित्य करून देऊं. इंग्रजाजवळून साहित्य करून देऊं. जो पक्ष ते अवलंबतील त्याचें सर्व प्रकारें साहित्य करूं. परंतु त्यानीं न जावें, समजून रहावें, हेंच उत्तम आहे. छ ९ रबिलावल. हे विनंती.

म. इ. सा. खं. ६ ले. ४४८ पृ. ४९९

---

# शिपाइगिरी व मुत्सद्देगिरी यांतील भेद



श्री [ १६७७ भाद्रपद शु. १३

पु॥ राजश्री दत्ताजी शिंदे गोसावी यांसि.

आशीर्वाद उपरि. "बिजेसिंगास[1] उत्तम प्रकारें तंग[2] केलें आहे, वरकड कोणाच्यानें कांहीं त्याची कुमक करवत नाहीं, स्वामींनीं त्याचे वकिलास साफ सांगून निरोप द्यावा, कैलासवासी आपांनीं[3] जो अभिमान धरिला

---

१ बिजेसिंग=नागोर, जोधपूरचा राजा.

२ तंग करणें=गच्च बांधून टाकणें, ताण देणें, पक्या पेचांत आणणें.

३ आपा=जयापा शिंदे.

होता तो शेवटास नेलियानें लौकिक व स्वामीकार्य, सर्वास जयं' म्हणोन लिहिलें. त्यास आपानीं जें अवलंबिलें तें आम्हांस सर्व प्रकारें करणें; परंतु हा राजकार्य प्रसंग आहे. आपासही येथून बुद्धिवाद, आपा असतां, चार महिने पांच महिने मागे, लिहित गेलों. तीं पत्रें तुम्हीं पाहिलींच असतील. दूर पथ, दो वर्षांनीं हिंदुस्थानांतून फौज आली, एकाएकीं येऊन तयार करतां उशीर लागतो. हे लोकांची येथील रीत तुम्हांस ठाऊकच आहे. हंगाम, फौज सिद्ध, ऐसा असता तर एक खांविंद आज वीस हजार फौजेनिशीं तुम्हांजवळ प्रविष्ट झाला असता. परंतु नाइलाज. गैर हंगाम व दूर पथ याजमुळे विलंब लागला. श्रीकृपेने दीढ महिन्यांत पांच सहा हजार फौज येऊन पावेल. मागाहून खांसाही वीस हजार फौजेनिशीं येतच आहे. तुम्ही अवलंबिलें कार्य तें अगत्य आम्हांस करणें. परंतु होणारानुरूप आपानी हातेर वोढिले. शिपाईगिरीची रीत केली. सरदारगिरीचा प्रकार न केला. जेव्हां प्रथम भारथी लढाई मारली, त्या उपरि नव्या दबावांत तूट सोसून सल्ला हर प्रकारे, पुढील संकट दूर देशीनें जाणून, करून मोकळे जहाले असतें तर आज प्रयाग अंतरवेद व आलीकडील

---

४ सर्व संभव ? सर्वास भय ? भेट ?

५ दत्ताजीनें फौजेची कुमक मागितली होती त्यावर हें प्रत्युत्तर आहे. दत्ताजी मारवाडांत जयापाचा सूड उगवण्यांत गुंतला होता. हें पत्र नानासाहेबांनीं त्यांस लिहिलें आहे व तें सर्व खुद्द त्यांच्याच हातचें आहे. हें पत्र वाचून पाहिलें असतां दूरदर्शित्व व मुत्सद्दीगिरी वगैरे गुण ह्या राजकार्य धुरंधर पुरुषाच्या आंगीं कसे होते हें ध्यानीं येईल.

६ खांवंद=खांसा, धनी. पेशव्यांच्या घराण्यापैकीं कोणी तरी एक, असा भाव.

७ भारथी=जंगी, अरेतुरेची, भारथी युद्धाच्या तोडीची. ह्या लढाईचें वर्णन, भाऊसाहेबांची बखर पृष्ठ ११ ते २० यांत पहावें.

८ दबाव=दरारा. नव्या दबावांत = लढाईचा जो त्याजवर दाब, दरारा पडला त्या वेळीं.

९ दूरदेशी=दूरदर्शित्व, पुढील नजर.

खेचीचा मुलुक सोडविणें वगैरे कामें सर्व ही सरकारकिफायेतींची[10] होऊन गेलीं असतीं. परंतु होणारास इलाज नाहीं. तुम्हीहीं आज पावेतों शिपायगिरी केली. आतां सरदाराची रीत धरून तजाविजीनेंचे[11] कांहीं कामें करावीं. जरूर संकट पडेल तेथेंच नेटून शिपाईगिरी करावी. तुमचा अभिमान ईश्वरास आहे व मजवर ईश्वरी कृपा आहे तों तुमचे साहित्यास कधीं चुकणार नाहीं. ती पिढ्याचे एकनिष्ठ सेवक, कामाचे असतां, तुमचा अभिमान नसावा हें कधींही या घरांत घडणार नाहीं. सर्व प्रकारें समाधान चित्ताचें करून अष्टपैलूचे रीतीनें जसा जे समयीं प्रसंग पहाल तसा मनसबा करीत जाणें. सत्वरच येथून फौजही येऊन पोंचत आहे. विजेसिंगाचा वकील 'पन्नास लक्ष द्यावे, रामसिंगास थोडीशी जागा पोटापूर्ती द्यावी,' ऐसें बोलत होता. आम्हीं ते गोष्ट मान्य केलीच नव्हती. सांप्रत हा प्रसंग जहाला याजमुळें आम्हीं साफच त्यास जाब दिला कीं, 'या उपर आम्हांस तह करतां अनकूल पडत नाहीं. तुम्हीं जाणें.' ऐसें म्हणून निरोप दिल्हा. तेथें ते आतां चढीं लागले असतील. व मध्यस्थ मारले गेले, यामुळें मध्यस्तीसही कोणी शिरत नसेल. अद्याप त्यांनीं रामासिंगास पंधरा विसां-[12]ची जागा दिली व तुमचा शिबंदीखर्च मसलतखर्च फिटोन दहा लाख जाजती दिल्हे तर घेऊन सलूख करून त्या संकटांतून सुटावें. हें राज्यभार अष्टपैलूपणास उचित आहे. तेथील प्रसंगानुरूप करणें. फौज तों तुमचे साहित्यास रवाना करीत असों. छ ११ जिल्हेज बहुत काय लिहिणें.

शिक्का. (लेखन सीमा.) [का. इ. सं. ले. २५१]

---

१० किफायत=फायदा, लाभ.

११ शिपाईगिरी व सरदारी या दोहोंत जो भेद येथें दाखविला आहे तो ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. त्याप्रमाणेंच शिंद्याची स्तुति करतां करतां व कैवार घेतां घेतां त्यांस दोष दिला आहे तोही प्रकार मोठा खुबीदार आहे.

१२ पंधरा विसांची=१५-२० हजारांची. ह्या मारवाड प्रकरणाची हकीगत भाऊसाहेबांच्या बखरींत समग्र आहे.

# तप्त दिव्याचा प्रकार



न्यायाधीशामार्फत साक्षीपुराव्यानें अगर पंचामार्फत तंट्याचा निकाल लागण्याजोगा नसेल तेव्हां दिव्य करण्याची एक पद्धति पूर्वापार चालत आली आहे. त्याचे अनेक प्रकार आहेत. त्यांपैकीं एकाचें वर्णन येथे दिलेल्या उताऱ्यांत आलें आहे. हा वाद कल्याण प्रांतांतील एका देशपांडे-पणाच्या वतनाबद्दलचा होता. पंडित = नानासाहेब पेशवे.

त्यावरून पंडित मशारनिल्हेनीं राजश्री सदाशिव चिमणाजी यांजकडे तुम्हां हरदु वादीयांस पुण्यास रवाना केलें. ते तुम्हां हरदू वादीयांची समजावीस करीत होते. ते समयीं हि गणेश दत्ताजी समजावीस रजावंद जाहला नाहीं. दिव्य करावयास राजी जाहला. त्याजवरून श्रीवज्रजोगिणीचे स्थळ दिव्यास नेमून देऊन कल्याणास पाठविलें तेथें ब्राह्मणांच्या संमतें गणेश दत्ताजीचा भोगवटा जाहाला. याजकरितां त्याजला दिव्य बोलिलें नाहीं ऐसें जाहलें. तो निर्णय त्यांहीं पंडित मशारनिल्हेस लेहून पाठविला. त्यावरून तुम्हां हरदू वादीयांस पंडित मशारनिल्हेनीं फिरोन आपणांजवळ नेलें; तेव्हां सर्वांचे मतें तुम्ही दिव्य करावें ऐसा इत्यर्थ जाहला. त्याप्रमाणें तुम्ही दिव्यास रजावंद जाहलां. त्यावरून पंडित मशारनिल्हेनीं स्वारीस जाते समयीं तुम्हां हरदू वादीयांस समागमें नेऊन श्रीगोदातीरीं कसबे कोपरगांव परगणे कुंभारी येथें श्रीशुक्लेश्वर संनिध, उभय गंगातीरीचे व आपले जवळील शास्त्रज्ञ ब्राह्मण यांचे विचारें धर्मशास्त्र विज्ञानें, स्वारीसंमतें पंचाशत पळें (म्हणजे वजन लोखंडी गोळा तोळे १६६॥= एकशें साडेसाहासष्ट तोळे, दोन मासे) याचा, कोळसे अग्नि लावून, भातियानें फुंकोन, त्रिवार तप्त करून, तुज राघो नारायणाचे हात धुवून, चिन्हें लेहून ठेऊन, तुमचें कपाळीं भाळपत्र बांधून, तुमच्या हातावरी अश्वत्थाचीं सात पानें ठेऊन, कच्च्या सुतानें गुंडाळून, सदरहू तप्त गोळा

सांडसानें धरून, तुज राघो नारायणाच्या हातावरी ठेऊन सात मंडळें चालोन जाऊन आठवे मंडळीं गोळा ठेवावयास सांगितलें. त्याजप्रमाणें तूं सात मंडळें चालोन जाऊन आठवे मंडळीं कुड करून, कणीक घालून गोळा ठेवावयासी नियंत स्थळ केलें होतें तेथें ठेविला. तेंव्हां कणीक जळों लागली. भुलोजी पाटील ढमढेरे तळेगांवकर यांनीं सरमाच्या पेंढ्या गोळ्यावर ठेविल्या. त्यांनीं अग्नि घेऊन अग्निच्या ज्वाळा निघों लागल्या. याप्रमाणें शालिवहान शके १६६६ रक्ताक्षीनाम संवत्सरे, पौष्य शुद्ध एकादशीस तुम्हांपासून तप्त दिव्य घेतलें. उपरांतिक तुमचे हात सर्व सभेनें व गणेश दत्ताजीनें पाहिलें. अणू मात्र अग्निस्पर्श जाहला नाहीं. फिरोन तुमच्या दोन्ही हातांस थैले घालून लाखोटे केले. दुसरे दिवशीं द्वादशीस समस्तांनीं व वादीयानें तुमचे हात पाहिले. पूर्वीचीं चिन्हें लेहून ठेविलीं होतीं. त्यांस तिळप्राय पालट जाहला नाहीं शुद्ध, खरे दिव्यास उतरलां. सत्यपूर्वक पुरातन वतन तुमचें होतें तें श्रीनें तुम्हांस खरें करून दिल्हें. गणेश दत्ताजी लायेणी काजिया करीत होता तो खोटा जाहला. त्यानें येजितखत तुम्हांस लेहून दिल्हें. इत्यादि.... [ वतनपत्रें, निवाडपत्रें वगैरे पृ. ५५ ]

---

# अटकेवर झेंडें ।



१

अटकेवर झेंडे लावल्यानंतर, नानासाहेबांनीं बोलावल्यामुळें तिकडील व्यवस्था न लावतां रघुनाथरावानें परत फिरण्याचा विचार कायम केला. पुढें दिलेलें पत्र रघुनाथरावानें नानासाहेबांकडे पाठविलें असून त्यांत इराणपर्यंत मराठ्यांचा पत्रव्यवहार चालत असल्याचें लिहिलें आहे. [ इ० सं० ऐ० स्फु० ले० इ० स० १९१६ ] १६८० चैत्र वद्य १२

"लाहोर, मुलतान, काश्मीर वगैरे अटकेकडील सुभ्यांचा बंदोबस्त करून अंमल बसवावा; त्यास कांहीं जाला, कांहीं होणें; तोहि लौकरच करितों. तयमूर सुलतान व जहानखान यांचा पाठलाग करून फौज लुटून घेतली. थोडीशी झडत पडत अटकेपार पिशावरास ते पोंचले. अबदली इराणावर चालून गेला, त्याची फौज इराणच्या पातशहानें लुटून घेतली. अबदाली कंदाहारास आला. इराण्याची फौज पाठलाग करीत आली आहे. जबरदस्तखान व मुकर्रबखान या प्रांतींचे सरदार व जमनिदार अबदालीचे जबरदस्तीमुळें त्यास रुजू होते, तेहि बदलोन हंगामा करितात. हल्लीं "रफीकें होऊन सेवा करून दाखऊं, अबदालीस तंबी करूं" ऐशा त्यांच्या अर्ज्या आल्या आहेत. अबदालीचा धर सुटला आहे. सारांश त्याचा जोर तिकडून होतो ऐसे नाहीं. तिकडून इराणचे शहानें जेरदस्त केलें. इकडून जोरा पोंचवून सरकारचा अंमल अटकेपार करावा. त्याचा पुतण्या व दौलतेचा वारस स्वामीपाशीं देशास आला, तो स्वामींनीं आम्हांकडे पाठविला होता. त्यास अटकेअलीकडे थोडीशी जागा बसावयास देऊन अटकेपार काबूल पिशावरचा सुभा देऊं. अबदालीच्या फौजेवर अबदुल समदखान सरहिंदेत होता तो सरकारांत पाडाव आहे. तो व आणखी या प्रांतीची फौज, इराणी, मोंगल देऊन मशारनिल्हेची रवानगी करितों. हे तिकडील पैरवी करितील. स्वामींचे पुण्यप्रतापें अबदालीस जोरा पोंचवून तंबी करितील. पारिपत्य उत्तम प्रकारें करून अटकेपार अंमल बसावितील. लाहोर प्रांतीं रेणको अनाजी व रायाजी सखदेव ऐसे ठेविले. गोपाळराव गणेश यांचाहि पैगाम आहे तेहि राहतील. इराणचे पातशहाचे स्वदस्तुरचे कागदहि आम्हांस व मल्हारबास आले होते कीं "लौकर कंदाहारेस यावें आणि याचें पारिपत्य करून अटकेची हद्द करावी." परंतु आम्हीं तर काबुलचा सुभा अबदुल रहीमखान स्वामींनीं पाठविला, त्यास देतों. फौज वगैरे थोडे बहुत साहित्यहि करितों. काबूल व कंधार हे अटकेपारचे सुभे, हिंदुस्थानाकडे

---

१ मान्य २ दंगाधोपा ३ दोस्त, स्नेही ४ शिक्षा, मारामारी ५ विनंतिपत्रें ६ कमजोर ७ स्वारी शिकार, पाठलाग. ८ जोर, शह ९ संधान, संबंध

अकबरापासून आलमगीरपावेतों होते ते आम्हीं विलायतेंत कां द्यावे ? यास्तव तूर्त येथें सुभे देतों; त्यांसहि ( = इराणच्या शहास ) या सुभ्यांची दरकॅार नसेल. तो इराणचा अंमल करील. आम्ही कंधारपावेतों अंमल बसवून तूर्त त्यास गोडच जाब पाठविणार आहों. जंबू काश्मीर वगैरे तमाम वकील आले आहेत. मामलत थोडीबहुत अटकेअलीकडील करीत आहों. पलीकडील तूर्त होत नाहीं. खटपट मात्र होईल. तूर्त तांतडींमुळें[11] जें होईल तें करितों. पुढील स्वारीस जो कोणी सरदार मोतबर[12] येईल तो बंदोबस्त करील. मुल्ख दो, चौ करोडीचा वसूली. परंतु जमीदार मेवास[13] मोठमोटे आहेत. आम्हीं नांवास मात्र खंडणी करितों. जेथें पंचवीस लक्षांचा मुल्ख तेथें एक दोन लक्ष येणेंच कठिण आहेत. तूर्त माघारे फिरावयाचा डौल स्वामींचे आज्ञेवरून धरिला आहे. याजमुळें जें होतें तेंच करितों. तर्टी लावीत नाहीं. तूर्त अदिनाबेगावरच सारा यखतियारें[14] दिल्हा आहे. त्यासच कमाविसीनें लाहोर, मुलतान दिल्हें आहे. यंदा तर सारें शिबंदीखालीच[15] जाईल, शिबंदी वारतांच कठिण पडेल. दोन तीन वर्षांनीं कांहीं सोईस लागेल. स्वामींस कळावें. ''

## २

श्री १६८० चैत्र व. १२

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे सेवेशीं विनंति सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना सेवकाचें वर्तमान ता। चैत्र वद्य १२ शुक्रवार मुकाम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनें करून यथास्थित जाणोन स्वकीय लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष. सेवकास स्वामींनीं कृपा करून पत्र छ ९ साबानचें पाठविलें तें पावलें. वर्तमान

---

१० जरूरी ११ घाई, गडबड १२ मोठा, मोठ्या सैन्यानिशीं १३ स्वतंत्र संस्थानिक, पुंड १४ अधिकार,सत्ता १५ प्रासंगिक उपयोगासाठीं ठेवलेल्या फौजेच्या खर्चापार्यीच सर्व वसूल संपून जाईल.

लाहोरचें फत्तेचें व शत्रूचें पारपत्याचें व तिकडील मुलूख काबीज केल्याचें लिहिलें तें सविस्तर वाचून परम आनंद जाला. तो पत्रीं कोठवरि ल्याहावा ? हिंदुस्थानांत कीर्ति, लौकिक मातबर जाली. कुल् राजे, उमराऊ, सुभे, यांस दहशत पडली. सारे हिंदुस्थानचा सूड अबदली पासून एक स्वामींनीं घेतला. तेणेंकरून यशाचे पर्वत जाले ! स्वामी यशस्वी च आहेत. याचा विस्तार सेवकास लेखन करावयासी सामर्थ्य कैचें ? हें वर्तमान वजीरानीं ऐकोन बहुत च हर्ष मानिला. शत्रूनीं बहुत उन्मत्तता करून मथुरा क्षेत्रीचा कट्टा केला होता. त्याचें फल ईश्वरें लवकरी च दाखविलें! स्वामींस यश आलें याचा संतोष वजीरांनीं फारच मानिला. त्याचा परिवार कोठवर लिहावा ? स्वामी अवतारी पुरुष आहेत. त्यांची स्तुत मनुष्यांनीं काय करावी ? वरकड इकडील सविस्तर वर्तमान आलाहिदा पुरवणिया लिहिल्या आहेत. त्या ध्यानास आणून त्यांचीं उत्तरें वेगळालीं पाठवावयास स्वामी समर्थ आहेत. सारांश गोष्ट, सेवकास आश्रा स्वामींचे पायाखेरीज कोठें हि नाहीं. येविषयीं वारंवार सेवकांनीं लिहावेंसें नाहीं. स्वामींच्या दृष्टीस थोडकेच दिवसांत पडेल. जरि स्वामींची छावणी लाहोर प्रांतीं जाली तरी वजीर पातशाहास घेऊन छावणीस आपल्याजवळ घेऊन येतों. जरि करितां आपण कांहीं आपली दहा हजार फौज ठेऊन इकडे येतील तरी हे दोघे सरदार आपल्या सरदारांजवळ ठेवितील. आपण जेथें खासा छावणी करतील तेथें च हे खासा बजीर छावणी आपल्याजवळ करतील. आपणा वेगळें कोठें खांसा निराळे रहात नाहींत, परंतु वजीर व लहान मोठे सर्वत्र म्हणतात 'खांसा छावणी न जाली तरि पठाण मागतीं लाहोर प्रांतीं पाऊसाळां येतील.' उगे च लोक म्हणतात तें सेवेशीं लिहिलें. करणें न करणें यख्त्यार खावंदाचा. वजीराच्या यावयाचा निश्चय कोणे प्रकारचा कोणे स्थळीं ती आज्ञा निवडून सेवकास व वजीरास ल्याहावी. त्याप्रमाणें त्या स्थळीं दाखल होऊन राजश्री विठ्ठल शिवदेवहि सत्वर च सेवेशीं येतील. त्याज हि प्रमाणें राजश्री कृष्णराव हि येतील. सर्व विनंती करतील. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पैा छ५ रमजान [का.सं.पृ.२१२]

# तुपाच्या घागरीवर उंदराचें पिटकुलें



लाहुराकडून रघुनाथराव दादा मसलत फत्ते करून देशास जात असतां मार्गी जनकोजी शिंदे यांस भेटावयास आले. तों जनकोजी शिंदे यास वर्तमान कळतांच फौजेसुद्धां भेटावयास गेलें. दादासाहेबहि मुक्कामापासून दोन कोस आडवे आले. उभयतांच्या भेटी झाल्या. जनकोजी शिंदे यांचे डेरियास येऊन एकांतीं जनकोजी शिंदे यास मनसबा दिला कीं, "तुम्हीं आवंदाची मसलत बुडविली तरी पुरवेल. क्रोड रुपये शिबंदी वाढली तरी देऊं. परंतु नजीबखान रोहिला याचें पारिपत्य करून त्यास जिवें न सोडावें. एवढी जोड आम्हांस द्यावी. आम्हींच पारिपत्य केलें असतें, परंतु मल्हारराव यांस त्यांचे अगत्य पडलें. त्यांचा धर्मपुत्र म्हणोन त्यांनीं अगत्य धरून आपले तर्फेनें अंतर्वेद प्रांत व कुरुक्षेत्रापासून कुंजपुरा देखील चाळीस लक्षाची मामलत त्यांचे स्वाधीन केली. मल्हारराव यास पुत्र बहुत ! माधवसिंग जयनगरकर व बिजेसिंग मारवाडी व आणखी बहुत आहेत. त्यांत हा नजिबखान रोहिलाहि पुत्र जाहला आहे ! जितके यांनीं पुत्र म्हणाविले त्यांचा फळादेशहि भोगीतच आले. परंतु त्यांचा अभिमान जाईना. त्यांचे जितके धर्मपुत्र तितके मात्रागमनी आहेत. आम्ही त्यास पिसाळलिया कुतरियाची गत केली असती. परंतु 'तुपाचे घागरीवर उंदिराचे पिटकुले बसतें' तैसा प्रकार जाहाला. आतां तुम्हांस पदर पसरून जोड एवढीच मागतों," असें म्हणतांच जनकोजी शिंदे यांनीं तसलीम करून अर्ज केला कीं, "दादासाहेब, आम्ही आपले बारगीर, आज्ञा कराल त्याप्रमाणें वर्णतूक होईल. नजीबखान म्हणजे कोण जिन्नस ? याचें पारिपत्य आम्हांकडे लागलें. पण आपण लाहूर, मुलतान, पंजाब, देखील आटके पायेतों मुलूख काबीज केला, आतां आम्हांस मोहिमेस रान कोणतें ?" असें म्हणतांच दादासाहेब यांनीं

---

१ तुपाची घागर=मल्हारराव, पिटकुलें=नजीब. नजीबावर घाव घालावा तर मल्हारराव दुखवतो.

उत्तर केलें कीं, " नजीबखान याचा शिरच्छेद केलिया आम्हांस तुमची सर्व जोड पावली " याप्रकारें तीन वेळां जाबसाल जाहाला. मग परस्परें बहुमान हत्ती, घोडे, जवाहीर देऊन राजश्री रघुनाथराव देशास येण्यास चालते जाले.

आठ पंधरा दिवसां मागाहून मल्हारराव त्याच मार्गानें आले. त्यांस यास बारा कोसांचें अंतर होतें. शिंदे होळकर यांची चित्तशुद्धता नव्हती. तेव्हां मल्हारराव यांनीं गंगोबा तात्यास जनकोजी शिंदे यांजकडे पाठविले. गंगोबा तात्या भेटून सविस्तर वर्तमान ममतापुरस्कर केवळ अजीज होऊन जाबसाल केला कीं, " सुभेदार यांचें वृद्धापपण; आणि तुम्हीं सुज्ञ मनुष्य आहां, सुभेदार भेटावयास येतात तुम्हीं अव्हेर न करावा, " म्हणोन बोलतांच जनकोजी शिंदे यास तिरस्कार आला आणि उत्तर केलें कीं, " त्यांची आमची भेट आतां स्वर्गीं. अझूनहि जें तुम्हांस उचित दिसेल तें करावें ! "

मल्हारराव यांनीं वर्तमान ऐकून अधिक उणें जाबसाल ध्यानास न आणून विचार केला कीं, ' मूल आहेत, ' म्हणून कूच करून शिंदे यांचे लष्करानजीक दोन कोसावर मुक्काम केला. मान, महत्त्व ध्यानांत न आणितां मल्हारराव तयार होऊन जनकोजी शिंदे यांचे डेरियास चालले. हें वर्तमान जनकोजी यानीं ऐकून निश्चय केला कीं, " आतां आडवें जावें हें उचित. नाहीं तर अश्लाघ्यता येईल. म्हणोन जनकोजी शिंदे तयार होऊन आडवे जाऊन भेटले. त्यांस डेऱ्यास आणोन सत्कार केला. नंतर आठ पंध्रा दिवस मल्हारराव यांचे येथें रात्रादिवस राहून चित्तांतील किलाफ तोडिला. [होळकरानीं] मुलास हातीं देऊन देशास जावयास निरोप मागितला. ते समयीं जनकोजी शिंदे यानीं अर्ज केला कीं, " सुभेदार, तुम्हीं आम्हांस वडील आहां, तुम्हीं अटके पावेतों मुलूख काबीज केला. आम्हांस मोहिमेस रान असुंदे कोणतें ? " तेव्हां मल्हारराव यानीं उत्तर केलें कीं, " तुम्हांस रान एक आहे. भागीरथीस पूल बांधोन अयोध्येवर जावें. मु

२ मोकळें, ताजें.

जाउद्दौला यास तंबी पोंचवून पाहिजे ते रुपये मिळतील. रान असुदें आहे,"
जनकोजी शिंदे यानीं उत्तर केलें कीं, "भागीरथीस पूल बांधणें कसें घडेल?"
तेव्हां मल्हारराव यानीं सांगितलें कीं, " नजीबखान रोहिला यास हातीं
धरून त्यांचे हातून हें काम करून घ्यावें, " हें वचन ऐकतांच जनकोजी
शिंदे यानीं जाबसाल केला कीं, " नजीबखान रोहिला मात्रागमनी गाजुदी-
खान याचे येथें वाढला, त्याचें सार्थक केलें ! हें तुम्हीं जाणतच आहां.
त्यांत कार्यातुर होऊन काळावर नजर द्यावी तरी खावंदांचा द्रोही. त्यानीं
आम्हांस मोहीम नजीबखान याजवरील नेमून दिली आहे, असें असतां हें
कर्म केलियास श्रेष्ठ स्वामिद्रोही व्हावें ! त्यांत आम्हांकडे केवळ शिलेदारी
कर्म नाहीं. आम्ही सरकारचे पागेचे बारगीर असें आहे. आम्हांकडून हा
विचार घडूं नये, " असें म्हणतांच मल्हारराव यानीं उत्तर केलें कीं,
" बाबा तुमचा मूल-स्वभाव. अटकेपासून रामेश्वरपर्यंत एक छत्री राज्य
जाहालें, हिंदुस्थानांत एक नजीबखान मात्र खूळ राहिलें आहे. त्याचें
पारपत्य केलिया पेशवे आटकेपासून जासुदाहातून पैसा आणवतील. मग
तुम्हीं आम्ही सहजच निर्माल्यवत जाहलों. मग कोणी पुसणार नाहीं.
यास्तव एवढें खूळ रक्षून जें करणें तें करावें, " याजप्रमाणें सांगोन मल्हा-
रराव होळकर यानीं आपला पालक पुत्र तुकोजी होळकर दोन हजार फौजे-
निशीं शिंदे यांजपाशीं टाकून, निरोप घेऊन देशास चालिले.

[ भाऊसाहेबांची बखर पृष्ठ ४४—४७ ]

---

# उत्तर हिंदुस्थानांतील राजकारणें.



श्रीराम.

छ २९ जिल्काद. १६८१ वैशाख व. १

श्रीमन्महाराज राजश्री पंत प्रधान स्वामींचे सेवेसीं:— विनंति सेवक
रामराऊ नीलकंठ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत

वैशाख कृष्ण १ पर्यंत मुकाम यमुनातीर नजीक रामड्याचा घाट यथास्थित असे. विशेष, स्वामी महाराजांचें आज्ञापत्र सादर जालें. महाराजांनीं आज्ञा केली येणेंप्रमाणें:—

" राजश्री दत्ताजी शिंदे व राजश्री जनकोजी शिंदे यांजकडील पत्रें अलीकडे येऊन वर्तमान कळत नाहीं. मारवाड्यांचा निर्गम होणें, तेथील पैका मातबर उगवणें, त्याचा विचार कसा केला तो लिहिणें " म्हणोन आज्ञा केली. ऐसीयासी तेथील गुंता विशेष केला नाहीं, जे श्रम, बहुत, फळादेश स्वल्प; डोंगर कोरून उंदीर काढावा. दुसरें, अनृत भाषण करणें हें तों त्या लोकांचा स्वभावधर्म परंपरागत आहे. यास्तव पूर्वी मुलूख निमे-निम घेतला तो करार व कांहीं ठाणीं बसवून, मुलुखाची खराबी जाली. दमदिलासा देऊन कमाविसदार ठेविले आहेत. बांजेसिंगाकडील पैका येणें बहुत. त्यामध्यें त्यांजला संशयपूर्वदोषांचा बहुत. त्यामध्यें पारिणाम, स्नेहसं-पादिल्याखेरीज, निर्वाह त्यांनीं न देखला. मग कांहीं वाट केला. त्यामुळें त्यांचा दील खुलासा जाला. आणि पुढें आणखी कामावरी दृष्टि देऊन, त्या प्रांताच्या आग्रहास न गुंतोन, दिलीकडे येणें जालें. त्याचा वृत्तांत, पूर्वी श्रीमंत उभयतांनीं सेवेसी विनंति लेखन केली आहे. त्यावरून विदित जालेंच असेल.

साहेबीं पत्रीं आज्ञा केली कीं " लाहूर प्रांताकडील ऐवज आणून जरूर हुजूर पाठविणें. " त्यास त्या ऐवजाचा कांहीं वसूल आला. रबीचा ऐवज येणेंच आहे. जो येईल तो वरचेवर आपणाकडे येत जाईल. वरकड तोफा तरीक जिन्नस या प्रांतीं सांप्रत पठाण्यांच्या दंग्यामुळें प्रांत हैराण बहुत जाहला. याचकरितां गोचर पदार्थ पाहतां घोडे तुर्की आहेत. श्रीमंत उभयतांनीं कांहीं मिळविले आहेत ते या खजानासमागमें पाठवितील.

" अंताजी माणकेश्वर यांस हुजूर बोलाविलें असतां नानाप्रकारचे बहाणे करून राहिला, येत नाहीं हवाल्याबद्दल बाकी राहिली असली तरी सख्त तगादा करून उगवावी. वजीर व ते मिळोन घालमेल करीत असतील

१ जनकोजी व दत्ताजी शिंदे.

यांत संशय नाहीं. तरी त्याची भीड न धरतां चौकशी करणें तऱ्ही खावंदगिरीनें सख्तीनें करणें. नाहींतर मोघमच चौकशी करू नये. येथें आलियावर जैसें बनेल तैसें केलें जाईल.'' म्हणोन आज्ञा केली. याजकारितां पंत मशारनिल्हेस हुजूरच पाठवितात; यांत मुलाहिजा काडीइतका नाहीं.

'' प्रांत लाहोर व बंगाला व पटणें हे तिन्ही मनसबे तुम्हांस करणें आहेत. त्यास लाहुरीं श्रीमंत राजश्री दादासाहेबीं अदिनाबेखान सुभेदार करून ठेविला, तो मृत्यु पावला. सरदार फौज देऊन तिकडे पाठवावा. त्या प्रांतांचा बंदोबस्त करावा. बंगाल, पटणें यास स्वारी करावी. मातबर पैका मिळवून कर्जाबद्दल क्रोड दोन क्रोड मिळवून, कर्जाचा परिहार करून फौज ताजी राखावी असा विचार जाला पाहिजे. खासा उभयतांनीं मातबर फौजेनिशीं तिकडे जाऊन पटणें घ्यावें. तेथें छावणी करावी. तों श्रीमंत राजश्री दादासाहेब बादज बरसात येतील. तदोत्तर बंगालयाची स्वारी करावी बंगालयाखेरीज मातबर पैका मिळावयाची जागा नाहीं'' म्हणोन आज्ञा केली. त्यास लाहोर प्रांतीं आलियाउपर, सरहंद वगैरे, श्रीमंत दादासाहेबीं सादिकबेग यास अदिनाबेगाची जामिनी घेऊन स्थापिलें आहे. त्याप्रमाणेंच करार ठेऊन सांप्रत स्वारीमुळें पांच लक्ष रुपये जास्ती नजराणा नरीख ठराऊन त्याचें काम त्याजवरील बहाल ठेवलें आहे. आदिनाबेगाचा तालुका लाहोर व जालंधर वगैरे आहेत तो मृत्यु पावला. त्याची स्त्री व दत्तपुत्र घेतला आहे, तो भेटीस यजमानांच्या आलियावरी मागील द्रव्याचा भ्रम लोकांनीं विशेष सांगितला. परंतु तहकीक करितां कांहीं द्वेषामुळें अधिक न्यून सांगू लागले. सद्यकाळ हातास येणें दुर्लभ. मुख्य त्याच्या माथा चौदा लाख रुपये ठहराविले. लाहोर प्रांतीचा मुलूख बहुत. पलीकडे अटक व मुलतान, कंदाहारपर्यंत मोकळा पडला. दुसरें, पठाणाचा मार्ग. आपला सर्व बंदोबस्त जालियावरी मग त्यांजला तोषीस देणें ते द्यावी. तोंवरी त्याच्या रजावंदीप्रमाणें द्यावें. दहावीस हजार माणूस आज्ञेंत राहतील येणें करून तो बंदोबस्त होईल. आबादी जालिया हा प्रांत क्रोडीचा आहे. दुरदस्त आहे. यास फौजेचें बल पाहिजे. सांप्रत

राजश्री साबाजी पाटील त्या प्रांतीं आहेत परंतु, खातरजमा करून एकाजणास ठेवलें पाहिजे.

हल्लीं श्रीगंगापार होऊन बंगाला, पटणें या प्रांतीं जावें हाच उद्योग धरून मजल दरमजल गडमुक्तेश्वरास जातात.

' नजीबखान भेटीस येणार तो येतो किंवा नाहीं ?' तूर्त प्रथमतः कटकट याजशीं करावी तरी पुढील काम मातबर होणें त्यास दिमगत लागेल. याजकरितां तूर्त यास हातीं घेऊन गंगापार जालिया नंतर तिकडील बंगाला, पटणें इकडील कामे करावी. मातबर पैका आज्ञेप्रमाणें कर्जाच्या उपयोगी पडे ऐसे कार्य योजोन जातच आहेत. याजकरितां वजीरासहि समागमें घ्यावें म्हणजे बंगाल्याचा फितूर तुटेल. एक्या विचारें पैकाहि पुष्कळ मिळेल. पटण्याचाहि अंमल बसेल. काशी प्रयाग हीं क्षेत्रें हस्तगत करावी, हा विचार जाणोन त्यांजकडे राजश्री अंताजी माणकेश्वर गेले आहेत. वजीराचें येणें होतें कीं नाहीं हा निश्चय जाला नाहीं. ते आले तरी बरेच जाले; नाहीं तरी तेच हतभाग्य होतील. सुजायत दौल्याची मामलत करून पुढें बंगाल्याची व पटणाची स्वारी करणें ते त्याच्या विद्यमानेंच करावी लागेल; आणि हाच आला तरी मग सुजायतदौला सुद्धां बंगाला पटणें सर्व कामे होतील; आणि आपणाकडेही कांहीं वजीराकडील शब्द राहणार नाहीं. तुम्हांस बोलाविले तुम्हीं न आलां, येणें करून अनाहित त्यांचेंच आहे. त्याचें उत्तर, ते काय येतात कीं नाही, हें कळेल.

[ ऐतिहासिक टिपणें भाग २ पृष्ट ६९-७२. ]

---

# उदगीरची लढाई



श्री                १६८१ फाल्गुन शु. ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंद बलाळ स्वामी गोसावी यासिः— पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विंनति उपरी येथील कुशल

निजामाचे राज्य. [पश्चिमोत्तर भाग]



## पानिपतचा नकाशा.



साहरणपूर
हरिद्वार
— भाऊसाहेबांचा रस्ता
अबदालीचा रस्ता
नाना फडणीविसांचा रस्ता
कर्नाळ
देववन
जलालबाद
बिडोली
घोसगड
शामळी
पथरगड
पानिपत
शुक्रताल
नगीना
दारानगर
चप्राली
गणोर
हस्तनापूर
चांदपूर
सोनपत
रोहटक
बागपत
मीरत
शहाजहानपूर
मुरादनगर
जलालबाद
गडमुक्तेश्वर
मुरादाबाद
शहादरा
गाजुद्दीननगर
दिल्ली
पटपडगंज
संबळ
पादशाहपूर
शिकंदरा
चंदोसी
रेवाडी
बलभगड
बुलंदशहर
अनूपशहर
फत्तेपूर
शिकारपूर
जहांगीरपूर
हतीण
अलीगड
गंगा नदी
सक्रस
कृष्णगड
फिरोजपूर
कोळ
हसनगड
अकबराबाद
केतवाडी
वृंदावन
जवार
हात्रस
दर्यापूर
लींसवारी
दीग
मथुरा
बळदेव
लछमनगड
कुंमेर
उमरगड
माचेडी
भरतपूर
राजगड
आग्रा
फिरोजाबाद
फत्तेपूर
सकुराबाद
बाणगंगा नदी
मुरलीधर सराई

जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे. विशेष. तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी सविस्तर वरचेवर लिहीत जाणें. इकडील वर्तमान तरी निजाम आलीखानानीं जागीर व दोन किले देऊं केले असतां मागे पुढे पाहूं लागले. याजकरितां आम्ही बाहेर निघालों. फौज पाठवून नगरचा किला घेतला. मागाहून आम्ही नगरास येऊन तेथील बंदोबस्त करून दर मजल येऊन उदागिरीस मोंगलास गांठलें. पांच सात मजली पुढें चालिला. चंद्र १५ जमादिलाखरी चंडोलावर हल्ला करून मारून लुटून फस्त केला. तेव्हां मोंगल जेर होऊन व जागीर अशर, बऱ्हाणपूर, दौलताबाद, विजापूर, मुल्हेर किला याप्रमाणें तह केला. हें वर्तमान तुम्हांस कळावें यास्तव लिहिलें असे. सारांश, मोगल फार तरतुदीनें झुजला. बहुता प्रकारें त्यास झुजावयाची गांठ घालितां छातीचा कोट करून चंडोलावर फौजा उडवल्या. चार सा घटका तीर, तरवार, गोळागोळी, बाण, हात, धोंडा याप्रमाणें मारीत मारीत खामियाचे अंबारीपर्यंत मोकळा केला. कादरखान मातबर गाडद्याचा सरदार ठार झाला. शौकतजंग हत्तीसुद्धां धरून आणला. त्यास जखम होती. तो मेला. व सुरेराव निरमळकर जखमी आहे. तोफा पंधरा व हत्ती आठ, अंबारी हौदे निशाणाचे आले. सरकारचे मातबर बराणजी मोहिते व भगवंतराव शिंदे व महादजी सालोंखे व केशवराव पानशी व सखोजी घाटगे आणखी ठार झाले व जखमीही झाले. तीर्थरूपांच्या पुण्येकरून मोठी फत्ते झाली. या झुंजानें मोंगलांत बाकी न रहातां साठ लक्षांची जागीर व सदरहुप्रमाणें स्थळें घेतलीं. याउपरि इकडील गुंता उरकला. चिरंजीव राजेश्री दादा फौजेसुद्धां दरमजल त्या प्रांतीं येतील. इकडे मुलूख स्थळें चांगली मिळाली. परंतु खर्च जाहला. कर्नाटकची स्वारी न जाली. तिकडेही अबदालीचा पेच. पैका मिळायाचे जालें नाहीं. तिकडील पेचामुळें इकडे आटोपावें लागले. नाहींतरी सारी दक्षिण मोकळी होती. असो. तिकडील वर्तमान वरचेवर आठा रोजा आड तुम्हीं लिहीत जाणें मामलियाचा ऐवज फार आहे. दाहा वीस लाख जरूर पाठाविणें. चंद्र १ रजब बहुत काय लिहिणें हे विनंति. [म इ. खं. १ ले १६६ पृष्ठ. २५८]

---

# नानासाहेबांचें ऐश्वर्य.



बल्लाल राघव सदाशिव नामधेयास्ते भ्रातरोऽग्नय इवाप्रतिमप्रभावाः ।
राजाज्ञया भरतखंडमखंडमेतदावुः सुरेश्वरपदांबुजदत्तचित्ताः ॥
नाना नामा पुण्यमेवाधितिष्ठन् चक्रे राज्यं राजराजीव भानुः ।
सेनापत्यं राघवः स्वीचकार धीरो वीरो दानशूराग्रगण्यः ॥
भावुःशाहोराज्ञया यौवराज्यं चक्रे चाक्रिप्रीतिभाग् भाग्यशाली ।
एवं युक्तास्ते त्रयो लोककार्यं कारुण्येनापूर्णचित्ता अकुर्वन् ॥
पुण्याख्या पूर्वधते स्मातिमात्रं पुण्यैर्लोकैरावृतानावृतापि ।
अब्धिश्चंद्रे पर्वणीवोदिते सा तस्मिन्नाथे लोकरक्षातिदक्षे ॥
दादा सेनासार्धमागत्य वीरो जित्वासर्वामुत्तराशां द्विजानां ।
अप्यातन्वन् भूतले कीर्तिवासो दाता यातः पुण्यमेव प्रपुण्यः ॥
यो यो विप्रो यं यमर्थं ययाच तं तं दत्वा ते त्रयः स्वर्द्रुमत्वम् ।
आपाद्येदं भूतलं संररक्षुः रक्षंतः स्वं क्षात्रकर्मावलंब्य ॥
इतरवृक्षफलं फलमेव तन्नृपरसालफलं त्वमृतं मतम् ।
यदि तदीयरसः सितया युतः सघृतपोलिकयास्य न चोपमा ॥
सकलचंद्रसुवृत्तसुपोलिका--सहितमाम्रफलोद्धृतसद्रसम् ।
नवघृतेन विमिश्रितमत्ति यो द्विजपुरःसरमेष नरोत्तमः ॥

[ पुरुषोत्तम कवि विरचित--श्रीशिवकाव्य, उत्तरार्ध १२चमत्कारः ]

---

१ आवुः = रक्षण करते झाले. २ पुण्यांत राहून. ३ विष्णुभक्त. ४ सभोवार कोटाची भिंत नव्हती. ५ आशा = दिशा. ६ कल्पवृक्ष. ७ आपला ब्राह्मणी धर्म राखून. ८ साखर, तूप, पोळी यांची गोडी फळास केव्हही येणार नाहीं. ९ नानासाहेब ब्राह्मणादिकांना संपूर्णचंद्राप्रमाणें गरगरीत वाटोळी पोळी, उत्तम आंबरस व लोणकढ तूप खावयास घाली.

# पेशवाईतील शिक्षण



## १

[ खं. १ पृ. ९६ ] श्री [ १६६४ आषाढ व. ३ ]

चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. उपरि येथील कुशल ता। १७ जमादिलावल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें. विशेष. तेथून जाते समयीं जें सुचलें तें तुम्हांस सांगितलें आहे. त्याचें स्मरण निरंतर मनांत असूं देत जाणें. रघुवंश व विदुरनीत, चाणाख्य व जें तुम्हांस येत असेल त्याची नेमपूर्वक चिंतणिका करून थोडेंबहुत शास्त्री यांजवळ नित्य म्हणत जाणें. विराटपर्वापासून पुढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. नेमेंकरून शंभर दोन शे दंड निरंतर काढीत जाणें. केवळ घोडीं फेरावयाचे छंदास न लागणें. वजनी, केली, बेरीज, वरावर्द करावयाचा सराव बहुत करणें. चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें. जे आज्ञा करतील तेंच काम करावें. बहुतकरून भाऊबरोबरच जेवीत जाणें. घोडीं वेगळीं बांधीत न जाणें. क्षुद्र मनुष्यांशीं सहवास कोणें प्रकारें हि न करणें. मातुश्री बाई, ताई, अनुबाई यांसी एका दोहों दिवशीं अर्ध घटकाभर जाऊन बसत जाणें. शरीरप्रकृत नीट नाहीं यास्तव औषध कांहीं नेमेंकरून घेत जाणें. भाऊसमागमें घोडीं फेरावयास जात जाणें. कालानुरूप, वयास उचित, योग्य वेष करीत असावें. देवपूजा थोडी, परंतु एकांतीं, न बोलतां करीत जाणें. इतकें हि नेमें करून करावें आणि गर्व न करावा. निरंतर साधनवृत्तीनें वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावें. सर्व जें मनेंकरून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुसावें. शिष्यधर्मे असलिया फार उपयोग आहे. चिरंजीव जनार्दन बहुत कामहि करून पढतात. हे हरएक गोष्टींत अधिक जाहल्यास तुम्ही मान्य पुरुष यांस असें

व्हाल. विशेष काय लिहिणें ? येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचवीसा दिवसांत पावलों. श्रीकृपेनें मेहनत करून दिल्लीचे सुमारें जात आहों. जसें पुढील वर्तमान येत जाईल तैसी योजना होईल हे आशीर्वाद.*

---

२

[ का. सं. ले. १७१ ]. श्री १६८० वैशाख शु. ४

चिरंजीव राजमान्य राजश्री बजाबा यांसि. प्रति सदाशिव चिमणाजी आशीर्वाद. आम्ही मजल दरमजल नर्मदापार जालों. पुढेंहि दरकुच जात असों. घोड्यावर बसणें व लिहिणें, पढणें चांगलें करणें. तीर्थरूप बोलावतील तेव्हां पुण्यास जात जाणें. फार खेळत न जाणें. घरीं अबई मायेनें रागें भरणार नाहीं, लाडके व्हाल. तें कामाचें नाहीं. चांगलें, लिहिणें पढणें घोड्यावर बसणें करणें. छ २ रमजान हे आशिर्वाद.❀

पौ छ २२ रमजान.

---

# लाहोरचा अंमल उठला



[ चंद्रचूड दफ्तर ले. १२७ ] श्रीगजानन [ १६८१ कार्तिक वद्य १३.

राजश्री गंगाधरपंत तात्या तथा राजश्री आनंदराव अन्या गोसावी

---

* यावरून पेशव्यांच्या घराण्यांतील पुरुषांना लहानपणीं कशा प्रकारचें शिक्षण मिळत असे याची कल्पना करतां येते.

❀ हें पत्र सदाशिवराव भाऊनीं बजाबा पुरंदरे यांस लिहिलें आहे.

१ गंगाधर यशवंत चंद्रचूड मल्हारराव होळकराबरोबर जयपूराकडे होता.

यांसि. अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री जानरांव वाबले दंडवत विनंति. उपरि येथील क्षेम तां कार्तिक वद्य १३ मुा सुकरतलाव* श्री भागीर्थीतीर जाणून स्वकीय लेखन कीजे. यानंतर पेसजी पत्र महतपूरच्या मुकामच्चे आलें. त्याज अलीकडे कांहींच वर्तमान कलत नाहीं. तर सविस्तर वर्तमान लेहून पाठवावें. येथील वर्तमान श्रीमंतांनीं नजीबखानास येढा घातला आहे. त्यानें खळ्या व श्रीगंगा पाठीशी देऊन बैसला आहे. मार्गे येक दोन वेळां तो बाहीर निघाला होता. त्यास सिकस्त[3] करून बरे वजेन गोटांतं[4] घातला. त्याजवर दबा बराच आहे. त्यास श्रीमंतांनीं[5] फौज श्रीगंगा-पार केली होती ते फौज पलीकडे जाऊन रोहिलीयाची ठाणीं येक दोन घेतलीं व तमाम गांव जाळलें. ते फौज पलीकडे गेलियानें नजीबखानाचा धरच सुटला होता. तों इतक्यामध्यें अयोध्येहून सुज्यातदौला आला व धुंदेखान व अफतरहीम रोहिले[6] यैसे अवघेच जमा जाले. फौज भार जमा जाली. मग फौजा उतरून अलीकडे आल्या. अवघी फौज रोहिले व सुज्यातदौला पलीकडे आहे. अलीकडे उतरून येत नाहींत; व साबाजी पाटील व तुकोजी होळकर लाहूर प्रांतें गिलच्या[7] आला म्हणून हे मजल-दरमजल कुच करून येथें लस्करांत दाखल जाले. लाहूर प्रांतीचा अवघाच अंमल उठला. यमुने पलीकडे आपला अंमल अवघाच उठला. त्याचें जें

---

२ वाबळे हा होळकराकडील पथक्या शिंद्याबरोबर अंतर्वेदींत होता. ३ पराभूत ४ हटविला ५ शिंद्यांनीं ६ अबदालीचे सरदार ७ दहशत

* शुक्रताल येथें भागीरथी उत्तरवाहिनी येऊन पालखीच्या दांडी सारखी वळण पडून दक्षिणेकडे गेली आहे. तेथें परिक्षिति राजास शुकांनीं भागवत सांगितलें. ती जागा मोठी बिकट, खळया भारी; कांहीं ठिकाणीं वाट होती तेथें तोफा व खंदक खणून फौज ठेऊन असाध्य असें नजीब-खान यानें केलें. आणि ( पूल बांधून देतों अशी थाप मारून गुंगत ठेव-लेल्या शिंद्यास असा निरोप पाठविला कीं) " बरसात खलास झाल्याशिवाय पूल होत नाहीं; तुम्हीं येऊं नये. पुढें पाहूं. ( भेटीस ) येण्यास आम्हांस होत नाहीं." तेव्हां दत्ताजीस त्याचें कपट उमजलें. [खं.२पृ.१५३.]

वर्तमान तुकोजी होळकरांनीं लिहिल असल त्याजवरून विदित होईल. तर श्रीमंतांस सांगुन जयनगर प्रांतीचा निर्गम करून ये प्रांतास यावें म्हणजे सर्व बंदोबस्त होईल. तुम्ही व हे यैसे येक जागा असलिया सर्वांचें पारपत्य हाईल; व नक्ष सर्वांवर बैसोन अवघ्या हिंदुस्थानाचा बंदोबस्त होऊन येईल. तर सत्वर ये प्रांतास यावें. जयपूरचें पारपत्य यथास्थित मनोदयाप्रमाणें उभयता सरदार येकत्र असलिया होऊन येईल. कललें पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा असो दीजे हे विनंति.

---

# मोहिमेवर कोणी जावें ?



त्यानंतर हिंदुस्थानांतून राजश्री जनकोजी शिंदे यांचीं पत्रें आलीं कीं " आब्रदल्ली गिलचा दुराणी एक लक्ष फौजेनिशीं बळ धरून दिल्लीस आला. दिल्ली नजीक दोन कोसावर चाळीस हजार फौजेनशीं दत्ताजी शिंदे होते. ' गिलच्यानें दिल्ली घेऊन आपल्या तर्फेनें बादशाहा बसविला; म्हणजे आपला अंमल बुडेल, अशा मध्यें जाऊन तोंड टाकावें ' म्हणोन दोन शे स्वारानिशीं जाऊन गिलच्याचे फौजेंत मिसळलें; तों गिलच्याची फौज भारी चहूंकडून वेढा घालून दत्ताजी शिंदे यांजला निघावयास जागा नाहीं असें जालें. जातीनिशीं बहुत तरवार केली. इतकियांत छातीवर गोळी लागली. दत्ताजी शिंदे ठार जाले. तेथोन चढाई करून गिलच्याची फौज शिंदे यांचे फौजेवर आली. तेथें शिंदे यांची फौज व गिलचांची लढाई जाली. जनकोजी शिंदे यांचे दंडावर गोळीची जखम लागली. फौज कचरली. मोड जाहाला. फौजेस पळ सुटला. कत्तल करूं लागले. चार हजार फौज लुटून पस्त केली. बाकी राहिले ते व जनकोजी शिंदे खासा ऐसे पळत जाटाचे मुलकांत राहिले. " ऐसे वर्तमानाचीं पत्रें बसून एके

जागा वाचली. विस्मय जाला. पुढें हिंदुस्थानांत त्यांसे स्वारीनिशीं जावें अथवा फौज रवाना करावी हा मजकूर पडला. दुसरें वर्तमान आलें कीं " गिलचा यमुना नदीपार होऊन दिल्लीपाशीं आला. दिल्लीस दाखल होऊन हिंदुस्थानांतील सर्व संस्थानिक त्यास सामील जाले. दिल्लीचा किल्ला घेऊन, पूर्वील पातशहा त काढून आपले तर्फेनें पातशाहा स्थापिला; आणि दक्षिणेस चाल करावयाची उमेद आहे. या प्रांतींचे संस्थानिक कुल्[1] त्यांसि सामील जहाले आहेत. नजीनखान रोहिला बारा हजार फौज व सुजाद्दौला पंधरा हजार आणिक कित्येक संस्थानिक ऐसे त्यास सामील जहाले. आपणांकडील ठाणीं अंतरवेदीतील व जयनगर वगैरे देखील माळवा गडबडलीं आहेत. या समयीं फौजा पाठवून यास तंबी पोचली तरी उत्तम. नाहींतरी परिच्छिन्न ठाणीं या प्रांतींचीं उठतात अशीं पत्रें मल्हारजी होळकर व शिंदे यांचीं आलीं. तीं वाचून बहुत दिलगीर होऊन राजश्री दादासाहेबांची रवानगी हिंदुस्थानांत करावी हा सिद्धांत करून श्रीमंत[3] व राजश्री भाऊसाहेब एकत्र होउन दादासाहेबांस बोलावून सांगितलें कीं " हिंदुस्थानांत जावें. तुम्हीं गेलें पाहिजे. " तेव्हां दादासाहेब बोलिले कीं " पूर्वी आपण तर्हे[2] केलेत ते साठ लक्ष रुपये कर्ज जहालें. तें वारल्या-शिवाय आम्हांस जावयास अनकूल पडत नाहीं. " तेव्हां भाऊसाहेब बोलले कीं " मुलूखगिरीस जावें तें कर्ज घेऊन घरास जावें कीं काय ? किंवा द्रव्य मेळवून घरास यावें ? तथापि तिकडील तिकडे लोकांची सम-जाविशी करावी. " तेव्हां श्रीमंत बोलले कीं " दादासाहेबांचें कर्ज वारून जाऊं तेव्हां त्यास मुलूखगिरी सांगूं. सांप्रत आम्हीं जाऊं अथवा तुम्हीं जावें. " तेव्हां भाऊसाहेबांनीं सांगितलें कीं " सोहेबीं हिंदुस्थानांत मुलुख-गिरीस जावें ! [ मग ] आम्हीं जवळ असोन काय करावें ? आम्हांस आज्ञा द्यावी. आजच कुच करून जातों. " ऐसें बोलोन आज्ञा घेऊन, तेच दिवशीं कुच करून आंबे पडदुराहून स्वार होऊन बऱ्हाणपूरचे रोखे चालिले. तीन कोशावर डेरे दिल्हे. मुक्काम जाला. राजश्री विश्वासराव हि

१ सर्व २ कबूल ३ नानासाहेब

समागमें चालिले. चार दिवस मुक्काम होता. सौभाग्यवती गोपिकाबाई भाऊसाहेबापाशीं जाऊन बहुत प्रकारें सांगितले कीं " तुम्हीं जावें ऐसें नाहीं. दादासाहेब म्हणतील तें कबूल करून त्यांची रवानगी करावी. आपण येथोन त्यास सरंजाम पोहोंचता करावा. येणेंकरून बहुत उपयोग आहे " असें सांगितलें, परंतु विचारास आलें नाहीं. गोपिकाबाई फिरोन आंबेपडदुरास आली. [ भाऊसाहेबांची कैफियत. पृ. ७ ]



# रूमशाम येथें स्वराज्य करण्याची उमेद

नानासाहेब व भाऊसाहेब यांणीं आपल्या पराक्रमानें अटकेपर्यंत मुलूख काबीज केला. बारा वर्षेंसकलपृथ्वीचें[1] राज्य केलें. राज्याचा उदय दिवसें-दिवस होत चालला. सर्व प्रांतांतील किल्लेकोट व महादुर्ग सोडविलीं. एक सत्तेनें मांडलिक राजे सेवक होऊन दास्यत्व करू लागले. असा पराक्रम थोर सर्वांविशेष जाहला असतां, पुढें होणार भविष्य बलवंत. याजकारितां राजश्री नानासाहेबास बुद्धि जाहली जे राजश्री भाऊसाहेबास हिंदुस्थानांत फौज देऊन रवाना करावे. ते समयीं राजश्री महादाजीपंत पुरंदरे यांहीं श्रीमंत महाराज यांस विनंति केली कीं " भाऊसाहेबांस एकंदर हिंदु-स्थानचे मोहिमेस पाठवूं नये. भाऊसाहेबांचे कारभाराचा हावभाव दुसरे[2] कोणास येणार नाहीं. सर्व भार त्यांजवर आहे, " असें कित्येक प्रकारें सांगितलें. ते समयीं श्रीमंत राजश्री नानासाहेब यांणीं उत्तर केलें कीं " भाऊसाहेबांचे चित्तांत स्वारीस जाण्याचें आहे. याजकरितां त्यास पाठ-वितों. त्यांचा हि मानस फार दिवस आहे. याजकरितां ये विशीं स्वारी

१ शाहू महाराजांच्या मृत्यूनंतर १२ वर्षें. २ कांहींहि झालें तरी.

करून आले म्हणजे सर्वांची खातरजमा होईल. " तेव्हां महादाजीपंत पुरंधरे यांणीं उत्तर केलें कीं " कैलासवासी चिमाजी आपा यांणीं पूर्वी बहुत पराक्रम केला. त्यांचे चिरंजीव भाऊसाहेब हे लढाईस मागें हटणार नाहींत. शत्रूस पराभवितील किंवा आपण कैलासवासी होतील. त्यांत सहसा अन्यथा नाहीं. याजकरितां त्यास सहसा पाठवूं नये. " ते समयीं सौभाग्यवती गोपिकाबाई साहेब यांणीं अनुमोदन दिलें कीं ' त्यांस रवाना केलें पाहिजे. ' सबब दृढ निश्चय करून, मागील पराक्रम मनांत आणून ' पुढें हि रूमशाम येथें स्वराज्य करणें हीच उमेद भाऊसाहेबांचे हि मनांत आहे, दुसरा निजध्यास नाहीं; इराणी हि अटकेपार होता तो अटकनदी उतरून अलीकडे आला त्यास अटकेपार घालवावा याकारणास्तव सदाशिवपंत भाऊ व चिरंजवि विश्वासराव साहेब यांची रवानगी केली पाहिजे ' अशी मसलत करून समागमें प्रमुख सरदार नामांकित देऊन हिंदुस्थान प्रांतीं रवानगी केली.[रघुनाथ यादवकृत पाणिपतची बखर पृ. ८]

---

# विश्वासरावास बरोबर घेण्याबद्दलचा आग्रह



भाऊसाहेबांचा स्वभाव सडेतोड. देशी मोहीमशीर होण्याचे समयीं दादासाहेब यांणीं स्वारीच्या देण्याचा तगादा केला. हें भाऊसाहेबास बरदास्त न होतां जाब दिल्हा कीं " स्वाऱ्या शिकाऱ्या करून देणें घरास आणावें ही चाल कोठील ? " तेव्हां दादासाहेबांनीं उत्तर केलें कीं " आम्ही चाकर हरामखोर. श्रीमंतांचे पायांशीं प्रतारणा करून कुणगे वेगळे ठेवून देणें दाखवितों. इतक्यावर स्वारी आपणच करावी. " " उत्तम आहे. आम्हींच करूं. परंतु आम्ही कारकून, आम्हांस धनी

---

३ पोक्तपणा, तोलदारी. ४ तुर्कांची राजधानी कान्स्टंटिनोपल, इस्तुंबुल वगैरे. इटालीतील रोमचा येथें संबंध नाहीं.

पाहिजे; विश्वासराव यांस बरोबर द्यावें. " तेव्हां नानासाहेबांनीं उत्तर केलें कीं " मुलानें पाहिलें काय ? त्यानें येऊन तें काय करावयाचें आहे ? तुमचे तुम्हीं असल्यावर पोर कशास नेतां ? " भाऊसाहेबांचा आग्रहच पडला. तेव्हां नानासाहेबांस रुकार देणें प्राप्त झालें. हें वर्तमान गोपिकाबाईस समजतांच तिनें आग्रह धरिला कीं " माझें पोर मी जाऊं देणार नाहीं. " तेव्हां नाना, भाऊ उभयतांचाहि इलाज खुंटला. मग भाऊसाहेब जातीनें गोपिकाबाईकडे जाऊन पदर पसरून, साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली कीं " विदेशास लेंकरास कशास न्यावें हें खरेंच. परंतु बाळ सिंहाचें ! कोल्ह्याकुत्र्याचें नाहीं. तथापि विश्वासरायाच्या बालाग्रास[1] धक्का लागावयाचा नाहीं. मीच जातों. परंतु आमचे पदरीं इतकें पुण्य नाहीं. नाना पुरुष भाग्यशाली. त्यांच्या भाग्याचा प्रसर आहे. यास्तव विनंति मान्य होऊन विश्वासरायास बराबर द्यावें. " तेव्हां गोपिकाबाईस संकोच पडून रुकार दिल्हा. [ होळकरांची कैफियत. पृ. २७. ]

# पाणिपतच्या मोहिमेवर भाऊसाहेब निघतात.



[ खं. १ ले. १६८ ] श्री [ १६८१ फाल्गुन वद्य १४ ]

तीर्थ स्वरूप राजश्री गोविंदपंत दादा वडिलांचे सेवेसीः—अपत्यें बाबूराव साष्टांग नमस्कार विनंति ता॥ फाल्गुन वद्य ३० अमवाशा मु॥ शिंदखेड वर्तमान यथास्थित असे. इकडील वर्तमान तरी श्रीमंत राजश्री नानासाहेब आमदानगराहून कुच करून दरमजल पडदुरास आले. व श्रीमंत भाऊसाहेब मोंगलाचा उपमर्द करून तह करून आले. पडदूरचे मुकामीं उभयतां श्रीमंतांच्या भेटी फाल्गुन वद्य पंचमीस जाहल्या. तदोत्तर

१ केसास २ बाढ.

हिंदुस्थानचे रवानगीचा प्रकार जाहला. आठ रोजपर्यंत खलबत जाहलें. शेवटीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेबीं जावें ऐसा सिद्धांत होऊन पडदुराहून वद्य एकादशीस कुच करून मु॥ मजकुरास आले. तेथून फाल्गुन वद्य त्रयोदशीस श्रीमंत राजश्री भाऊसाहेब डेरादाखल जाहले. या लष्कराहून पुढें दोन कोसावर मुकाम केला आहे. दोन चार रोज मुकाम करून लोकांचे हिशेबकितेब आजमास मनास आणून दरमजलीनीं येऊन पोंहचतात. पावणालाखपर्यंत फौज जमा जाहली आहे. पन्नास हजार फौजे-निशी हिंदुस्थानांत येत आहेत. पंचवीस हजार फौज देशीं राहिली. निजामअल्ली व बसालतजंग व सलाबतजंग ऐसे त्रिवर्ग एकत्र जाहले. कलबुर्गे-यास जाणार होते. फौज दाहा पंधरा हजार पर्यंत आहे. लबाडी करावयास चुकणार नाहीं. याजकरितां श्रीमंत दादासाहेब यांजपाशीं पंचवीस हजार ठेवून गंगातीरीं ज्येष्ठमासपर्यंत दादासाहेब राहणार, श्रीमंत राजश्री नाना-साहेब दरमजल पुणियास जाणार. कर्नाटकांत रा। विसाजी कृष्ण बिनीवाले यांजबरोबर दाहा हजार फौज व दाहा तोफा देऊन रवानगी जाहली. बंदोबस्त यथास्थित केलाच आहे. पुढें अबदालीचें पारिपत्याबद्दल श्रीमंत येत आहेत. यांची सलाबत पुण्यप्रताप भारी आहे. त्याचें पारिपत्य होतें कांहीं चिंता नाहीं. मित्ती फाल्गुन वद्य १४. बहुत काय लिहिणें. कृपा लोभ असो दीजे हे विज्ञापना.

---

# मराठी सैन्याचा उत्साह



[खं. १ ले. २६५] श्री १६८२ अश्वीन वद्य १३

चिरंजीव राजश्री दिवाकर जोसी यासी. प्रति कृष्ण जोसी आशीर्वाद. उपरि. येथील कुशल तागाईत अश्वीन वद्य १३ बुधवारपर्यंत मुा। फणिपथ

( पाणिपत ) येथे सुखरूप असों. विशेष वर्तमान तरि श्रीमंतांहि महाष्टमीस समदखान व कुतुबशाहा मारून दहा हजार सेना लुटून कुंजपुरा घेऊन लुटला. गढी खणून जमीनीबरोबर केली. लोक आभर जाले. श्रीमंतांस भूमिगत सात लक्ष रुपये सांपडले. तेथोन कुच करून कुरुक्षेत्रास चालिले होते. इतकियांत ' अबदाली बागपतापाशीं यमुना पायाब उतरोन सोनपथास आला, ' हें वर्तमान श्रीमंतीं ऐकतांच माघारे फिरोन यवनांचे सन्मुख दरमजल फणिपथास आले. यवन तेथोन दोन कोसांवर राहिला आहे. नित्य थोडें थोडें युद्ध होत आहे. श्रीमंतांनीं चोहोकडे तोफखाना पसरला आहे. यवनास थोर भय जाहलें आहे. पुढें येववत नाहीं. आमचे सैनिक यवनांचे समक्ष उभे राहून नित्य शें पन्नास यवन मारून उंट, घोडा आणितात. दोन हत्ती पेंढारी यांनीं काल्ह आणिले. यवनांच्या सैन्यांत रसद बंद जाहली, त्यामुळें पीठ ८८३ व चणे ८८४, तूप ८८॥ याप्रमाणें महाग जालें आहे. आमचे सैन्यांत गहूं ८।६ व चणे ८।२ व तूप ८८२॥ याप्रमाणें सवंगाई आहे. आगखी दोन चार दिवसांत यवन चालोन तोफावरी येईल तरी क्षणमात्रें बुडेल. न ये तर आमचे लोक जाऊन युद्ध करणार. वरकड सर्व प्रकारें करून शुभ चिन्हें होतात; व स्वप्नें उत्तम श्रीमंतांस होतात. त्यांजवरून सैन्यास उत्साह आहे कीं " अबदाली व नजीबखा व सुजाउद्दौला क्षयास जातील असें दिसतें. " अबदाली शहानशहा म्हणवीत होता. त्यानें युद्धें बहुत केलीं आहेत. परंतु दो कोसावरी येऊन आठ दिवस बसोन कांहीं पराक्रम होत नाहीं; यामुळें आमची फौज बहुत शेर आहे. अबदालीनें स्वदेशास जावें तरी मार्ग नाहीं. युद्ध करावें तरी परिणाम नाहीं. उगेंच बसावें तरी भक्षावयास नाहीं. याप्रमाणें विचारांत पडला आहे. मागाहून युद्ध जाल्यावर सविस्तर होईल तें लिहूं. बहुत काय लिहिणें हे आशर्वािद.

---

# गिलच्यास मारून लुटून पराभव करावा.



बळवंतराव पडिल्यावर लहान लहान जुंजें वरचेवर होतच होतीं. परंतु दिवसें दिवस गिलचा बळावत चालिला. त्याचे लष्करांत सवंगाई, आपले लष्करांत महागाई, दिवसोदिवस होत चालली. यास्तव " हरएक प्रकारें सख्यत्व करून सांप्रत निघावें " हीच मसलत. याजकरितां श्रीमंतांकडे पुण्यास पत्रें पाठविलीं कीं " आपले लष्करांत धारण फार महाग जहाली आहे. सरंजाम कोणीकडून पोंहचत नाहीं. यास्तव आब राखून सलूख करून निघावें कीं काय ? " त्याचीं उत्तरें श्रीमंतांनीं पाठविलीं कीं " तह कोणत्या प्रकारें ? मुलूख कोठपर्यंत ? आपणाकडे काय देतो ? व नक्त ऐवज किती देतो ? हें लेहून पाठवणें. मनास आणून आज्ञा करणें ती केली जाईल. "

[ गोविंदपंताचे मृत्यूनंतर ] लष्करांत महागाई बहुत जहाली. दर रुपयास ८८१ शेर अन्न जालें. सर्व जिन्नस तीन दिवस याप्रमाणें जालें. अन्नाविणें माणसें मरों लागलीं. तेव्हां श्रीमंताकडेस पुण्यास पत्रें पाठविलीं कीं " लष्करांत महर्गता बहुत जाली आहे. सरंजाम येऊन पोंहचत नाहीं. अद्यापि सलूख करून निघावें कीं काय ? तह ' चमेलीपर्यंत मुलूख आम्हीं घ्यावा व पुढें अटकेपर्यंत चवथाई घ्यावी. गिलचानें निघोन आपले मुलकांत जावें ' यणें प्रमाणें करार केला आहे. आज्ञा होईल त्याप्रमाणें निश्चयांत आणूं. याचें उत्तर पाठवावे. " श्रीमंतांनीं उत्तर पाठविलें कीं " दहशत खाऊन सलूख करावा ! त्यास दादासाहेबीं लाहुरापर्यंत कांहीं मुलूख काबीज करून आपलीं ठाणीं बसविलीं होतीं तो मुलूख त्यास द्यावा आणि फक्त चवथाई घ्यावी ! येणेंकरून दादासाहेब तुम्हांस हंसतील ! ! असें न करावें. गिलचास मारून लुटून पराभव करावा. अटकेपर्यंत मुलूख आपला करावा. सख्यत्व एकंदर करूं नये. त्यास, नीट दिसेल तैसें करणें. खासा स्वारी तयार होऊन कुच दरकुच तुमचे कुमकेस

दाखल होत आहेत. चिंता न करावी. " ऐसें लिहिल्यावर सल्याचा मनसुवा करण्याची गोष्ट तों राहिली. त्या नंतर भाऊसाहेबास न कळतां रावसाहेबांनीं विनंतिपत्र लिहिलें कीं " गिलचांचा पेंच भारी पडला आहे. उलगडत नाहीं. आम्हांसारिखे पुत्र आहेत व पुढें हि होतील; परंतु भाऊसारिखा बंधु मिळणार नाहीं. अशा प्रसंगीं खाशानशीं येऊन कुमक करावी " म्हणोन. त्याचें उत्तर " आम्हीं जलद येऊन पोहोंचतों. " असें पाठविलें. आणि पुण्याहून कुच करून पैठणावर गेले. लोक वरचेवर जमा करून दादासाहेब व आपण खासे देखील हिंदुस्थानचे कुमकेस जावयाचा निश्चय करून पैठणास जाऊन दाखल जहाले. पुढें मजल दर मजल जाणार. [ भाऊसाहेबांची कैफियत पृ. २० ]

---

# लष्कर गलबललें आहे



( भारत वर्ष ऐतिहासिक पत्रे, यादी, वगैरे पृष्ट ४१ ले.१९. )

श्री. १६८२ मार्गशीर्ष व. ७

चिरंजीव राजमान्य राजश्री मोरोबादादा याप्रती.बाळाजी जनार्दन आशीर्वाद उपरि येथील कुशल तागाइत छ १९ जमादिलावल पावेतों मुक्काम पाणिपत येथें सुखरूप असो. विशेष-बहुत दिवस जाहले आपणाकडून पत्र येऊन कांहींच वर्तमान कळत नाहीं. तरी निरंतर पत्रीं संतोषवित जावें. इकडील मजकूरः—पूर्वी कुंजपुऱ्यास लढाई जाहली; अबदुल समदखान वगैरे मारले. त्याजवर अबदालीची गांठ पडली; कृष्णजोशी संगमेश्वरकर यास गोळा लागून देवआज्ञा जाहली; इतकें वर्तमान तपशीलवार लेहून पाठविलें होतें. त्यावरून साकल्य कळलेंच असेल. त्या अलीकडील मजकूर

तरी यांनीं तोफखान्याचा आराबा पसरून खंदक खणून पाणिपत गांव आपल्या पाठीशी घालून सड्या फौजा तोफाचे मागे उभ्या याप्रमाणें बंदोबस्तानें राहिले आहेत. बुणगे गांवाचे पुढें, फौजेचे मागें ठेविले आहेत. नित्य गोळागोळी होती. सभोंवत्या त्यांच्या फौजा आहेत. त्यापाशींहि चाळीस पन्नास तोफ चांगली आहे. साठ हजार पर्यंत फौज आहे. एके दिवशीं सरदाराकडील बाजूकडे त्यांची फौज वाढून आली. त्यांची यांची लढाई चांगली जाली. शिंद्याकडील लोकांनीं त्यांना गोटांत नेऊन घातले. सहाशे पावेतों माणूस जखमी व ठार त्याजकडील जाहाले. याजकडीलहि दोन अडीचशेपर्यंत ठार व जखमी जाले. अस्तमान जाले यास्तव लढाई राहिली. त्यानंतर पंधरा दिवशी छ.२८✽रबिलाखरीं श्रमिंताकडील मोर्चावर चालून चार पांच हजार आले. वरकड फौज त्यांची पाठीमागेंच उभी होती. त्यांची यांची लढाई होऊं लागली. लढाईस प्रारंभ होतांच अस्तमान जाले. ते दिवशीं बळवंराव गणपत यास छातीस गोळी लागली तसेंच घोड्याखालीं पडले. तों त्यांजकडील माणसें धावलीं त्यांतील एकानें तोंडावर तरवारीचा वार केला दुसऱ्यानें गळा कापून ते शीर नेऊं लागले. तों पाच सात राऊत धाऊन सोडविले. गळा अर्धा कापला होता तसेंच आणून दहन केले. समागमें स्त्री अग्नीप्रवेश केली. त्या दिवशीं त्याजकडील दीड हजार माणूस ठार (होऊन) आपल्या आराब्यापुढें पडले होते. त्यांचे पुढे किती होते हे कळलेंच नाहीं. आवशीची तीन घटका रात्र पावेतो लढाई जाली. आपल्याकडील दीडशे पावेतों ठार व पांचशे पावेतों जखमी जाले. ही लढाई फार चांगली जाली होती. परंतु बळवंतराव यांचा प्रकार असा जाला यामुळें ते सर जाले. त्यावर गोविंद बल्लाळ यास पूर्वीपासून पत्रें जात होती कीं अंतर्वेदींत उतरून अबदालीचा रस्ता बंद करणें. यावरून ते दरमजल दिल्लीच्या सुमारें आले. तेथील नारोशंकर यांचीहि कांहीं फौज मदतीस घेतली व पुढें रस्त मारावी तों अबदालीनें दाहा हजार फौज निवडक पाठऊन दगा केला. कोणी लढले व कोणी पळाले. गोविंद

---

✽ कार्तिक अमावास्या.

बल्लाळ यांचें शीर* कापून आणून श्रीमंतांकडे पाठवून दिलें. मग दहन जालें. गोविंदपंताकडील वगैरे तीन चारशें फौज ठार जाली. गोविंदपंताचे चिरंजीव बाळाजी गोविंद समागमें होते, ते पळून नारो शंकर यांजवळ दिल्लीस आले. कोणी कोणी पळालेलें लोक येत याप्रमाणें जाले. मोठे दगेबाज याजकरितांच आराबा पसरून खंदक खणून मोगलाई रीतीनें राहिले आहेत. दोन महिने यांची त्यांची लढाई होते. अद्यापि लढावे हाच निश्चय उभयतां पक्षीं जाला आहे. ईश्वर काय परिणाम लावील तो खरा. मनसबा भारी पडला आहे. पैसा नाहीं. महागाई फार. यामुळें लष्कर गलबललें आहे. याप्रमाणें वर्तमान आहे. आपले बुणग्यांत गोळे जातात. त्यांचीं बहुत पत्रें मी पाठविलीं. परंतु आपणास एक हि लिहावयास अनुकूल न पडलें! बरें. असो. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद. हें वर्तमान तीर्थस्वरूप रा॥ बाबांस लिहून पाठवावें. हे आशीर्वाद. पेटा फुलवरी येथील फडणविशी महादजीपंत कुंटे यास दिल्ही आहे. त्यास त्याचे वेतन उत्तम प्रकारें होय अशी विनंति श्रीमंतास करून घ्यावें. मी आपणास लिहावें असें नाहीं. असामी आपले घरचा परंतु महादजीपंत यांची पत्रें येतात त्यावरून लिहिले आहे हे आशीर्वाद.

---

# मारावें किंवा मरावें



दुसरे दिवशीं सर्वत्र सरदारांस व पतक्यास बोलावून मसलत केली कीं "गिलच्याचें बळ दिवसेंदिवस बहुत जालें. आपलें लष्कर सडत चाललें. बहुत घोडीं मेलीं. मातबर खासा घोड्यामुळें पायउतारा जाला. एक वेळां हा मुक्काम सोडून बाहेर मोकळें रहावें; दिल्लीचा राबता सोडून दुसरीकडे जावें. पण झाडी मोठी मातबर, मार्ग नाहीं. तोफखाना निभावणार नाहीं.

---

* मार्गशीर्ष शु. १५

यास्तव दिल्लीच्याच रस्त्यानें जावयास मार्ग उत्तम. परंतु गिलचा वाटेवर राहिला आहे. जाऊं देणार नाहीं. यास्तव बंदोबस्तीनें निघावें. यमुनातीरीं येऊन पांच कोशावर जाऊन नदी पाठीशीं घ्यावी. पुढें गिलच्याचे तोंडावर तोफखाना द्यावा. दिल्ली उजवे बाजूस राखोन दिल्लीहून सरंजाम आणोन सारें लष्कर आबादान करावें. हा मुक्काम सोडून यमुनातीरीं मुक्काम करावा." तेव्हां मल्हारजी होळकर बोलले जे "गिलचा मार्गावर असतां फाट करून जावयास निभाव कसा होईल ?" तेव्हां निश्चय केला कीं "कुल्ल बुणगे सुद्धा, जुंज देत, उडवीत, मार देत, मारीत मारीत जावें. आणि मुक्काम केल्यावर चहूकडून सरंजामहि येऊन पोंचेल. लोक आबादान जालियावर पुढें गिलचाचें पारपत्य करूं." हा सिद्धांत केला. तेव्हां शिंदे होळकर यांणीं सांगितलें कीं "निभाव जाला तर हा विचार उत्तम आहे. परंतु उद्याच निघावें ऐसें नाहीं. रविवारीं कुच करून जाऊं." तेव्हां भाऊसाहेब बोलले कीं "आज मंगळवार आहे. रविवार सहा दिवस आहे. लष्करचे लोक अन्नावीण कितीक मरतील. गिलचाचे लष्करांत जातील. मग जाऊन सार्थक काय ? इतके दिवस लष्करचे लष्करांत धीर पुरत नाहीं. तथापि उदईक कुच करावे. मारावें कीं मरावें." हा सिद्धांत करून, समस्त सैन्यास ताकीद करून, "कुल्ल सर्वत्रांनीं स्वार होऊन लढाईस निघावें; आपले आपले बुणगे पाठीशीं घालून संभाळून आणावे. तळावर कांहीं एक ठेवूं नये. जुंज करून पुढें दिल्लीच्या रोखें जाणें आहे. परंतु युद्धाचे सामानानशीं निघावें."

ऐशी समस्त सैन्यास बळकट ताकीद करून प्रातःकाळीं पौष शुा ८ बुधवारीं स्वारी तयार केली. भालदार चोपदार सरकारांतून जागजागा सरदारांसि बोलावूं पाठविलें कीं "स्वार होऊन लौकर निशाणापाशीं यावें. पुढें तोफखाना इभ्रामखान गारदी. डावे बाजूस शिंदे होळकर उजवे बाजूस वरकड कितेक पिछाडीस, बुणगे मध्यें याप्रमाणें रचना करून गोलचा गोल चालत सहा घटका दिवसानंतर निशाणें हत्तीवर देऊन नौबत चौघडा सुरु केला; आणि भाराचे भार चालिले. त्या समयीं दिढा कोसा-वर जाऊन उभे राहिले; आणि तोफखाना मातबर तोफा निवड करून

दिल्या. बाकी तोफा सभोंवत्या चालिल्या. तोफांचे मागें गारदी, त्या मागें सड्या फौजा, त्याचे मागें बुणगें, असा तळ सोडून दिढा कोसावर आले. छकडे व गाडे कितेक सरंजाम न चाले तो टाकला. मोंगल आपले तळावर आवळून तयार होऊन उभे राहिले. भाऊसाहेबांनीं मसलत केली कीं " आपण नीट चालून मार्गानें जावें. गिलच्या वाट देऊन एकीकडे जाला तरी लढाईचें प्रयोजन नाहीं. मार्ग मोकळा करीत नाहीं तरी मध्यें घोडीं घालावीं. मारामार करून उफळून मार देत जावें. " ऐसें मातबर सरदारांस सांगोन निशाणें सोडून चालिले. तोंड लागलें. प्रथम विठ्ठल शिवदेव, यशवंतराव व माणिकराव कापरे कांहींसे वाढून पुढें गेले. त्याजवर जुंज मांडिलें. तेव्हां ते कचरून माघारे तोफखान्यांत येऊन राहिले. तों दमाजी गायकवाड यांजवर गिलचानें येऊन कांहींशीं मारामार केली. तेही माघारे फिरले. डावे बाजूकडे मुक्कामीं गोटाचे गोट राहिले होते. त्याप्रमाणें पतकें होतीं. त्याजवर खासा अबदाली त्या जुंजावर डावेकडे होता त्याणें जुंज भारी केलें. कुल्ल आपणांकडील पतकें माघारीं फिरलीं हलके बहुत जाले. [ भाऊसाहेबांची कैफियत पृ. २१।२२ ]

---

# मोंगल भयाभीत आहे



[ खं. ६ ले. ५०७ ] श्री [ १६८२ मार्गशीर्ष वद्य १४ ]

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री गोविंद दीक्षित पाटणकर आशीर्वाद. उपरि. येथील क्षेम तागायत मार्गेश्वर कृष्ण चतुर्दशी जाणून स्वकीय लेखन करणें. विशेष. इकडील वर्तमान तरी दिल्लीस श्रीमंत राजश्री भाऊ व तथा रा। विश्वासराव फौजे सहवर्तमान चार महिने प्रजन्यकाळ दिल्लीस होते. दसरा जालियावर तेथून कुच करून पश्चमेस कुंजपुरा टाणें होतें

तेथें अबदालीचे लोक तिघे सरदार व स्वार चार हजार प्यादे पांच सा हजार होते ते सर्व मारून फौज तेथील बुडविली. सरदार दोघे मारिले. व ( एक ) धरिला. कांहीं खर्चास हि थोडें बहुत मिळालें. सांप्रत अबदाली यमुनेच्या उत्तरतीरीं होता तो तेथून दक्षिण तीरास आपण व रोहिला व सुजायतदौला ऐसे फौजेसहवर्तमान आले. हें वर्तमान श्रीमंतांस कळतांच तेच क्षणीं कुंजपुरीहून स्वार होऊन अबदालीसमीप दो कोशांचे अंतरें येऊन राहिले. रोज त्याशीं याशीं झटापटी होती. शत्रू दमला आहे. मोंगलाच्या लष्करांत रुपयास शेर दीडशेर अन्न जाहलें आहे. हरिभक्तांच्या लष्करांत चवदा पंधरा शेर अन्न आहे. उभयता फौजा आपलाल्या जागा कायम आहेत. परंतु मोंगल अंतरीं भयाभीत आहे. अवघी फौज गोळा होऊन बैसली आहे. दाणा पाणी रसद बंद आहे. पुढें जें होऊन येईल तें लेहून पाठवूं. हे आशीर्वाद. पौ पौष वद्य. ३ शुक्रवार शके १६८२.

---

# सैन्याची मांडणी



पेशजी इराण्यानें शुभ्र कुंजर भाऊसाहेबांस दिला होता. तो ऐरावततुल्य भयंकर, दुसरा शामसुंदर गज कज्जलप्राय, शूरत्वांत आगळा, रणरंगधीर. तिसरा गजानन बक्ष. हे तीन हत्ती शृंगारून आणून उभे केले. पंचरंगेकरुन चित्रविचित्र शुंडादंड मस्तकावर रेखिले; व बादेली[1] पाखरा गजपृष्टीवर घालून सुवर्ण मंडित पिंपळवनें मुक्तलेंडाच्या[2] झालरी व गळ्यांत रुप्याच्या घंटा व रुप्याच्या वांकी, तोडर पायीं, रुप्यासोन्याच्या अंबाऱ्या हत्तीवर ठेवून चौफेर मोत्यांचे घोस लाविले. रणरंगधीर गजावर सदाशिवपंत भाऊ आरूढ जाहाले; व गजाननबक्षावर खांसे विश्वासराव साहेब स्वार जहाले. व शुभ्रवर्ण गजबक्षावर जरी पटका ठेविला. तिसरी नौबत करवून भीमा

---

१ भरंजरी २ मोत्याच्या

ऐसी गर्जना करून खंदक पार जहाले. पुढें बाणाच्या खोचेंचे तफावतीनें उभे राहिले. संपूर्ण सरदार लहान थोर भाऊसाहेबाजवळ येऊन फिरून मुजरे केले. सर्वांचे मुजरे घेऊन सेनासभेत उभे राहिले. भाऊसाहेबांनीं सारी सेना गोचर केली. तों फौज असंख्यात, नजर पुरेनाशी झाली. तेव्हां भाऊसाहेबांनीं मल्हारजी होळकर यांस विचारलें कीं "कोणते तऱ्हेनें सैन्याचा विभू रचावा? एकदांच चालून घ्यावें किंवा तीन टोळ्या कराव्या? कोणते टोळीस कोण नेमावा? याचा विचार सांगावा." त्याजवर मल्हारजी होळकर यांनीं विनंति केली कीं "फौजेच्या तीन टोळ्या कराव्या." डावे बाजूस विश्वासरावसाहेब यांजकडे लोकांच्या नेमणुका जहाल्या. यशवंतराव पंवार पंचवीस हजार फौजेनिशीं; नामी नामी सरदार व धारकरी मिळोन एकंदर राऊत चाळीस हजार; शिवाय पायदळ इभ्रामखा गाडदी यांजकडील लोक पंचवीस हजार; व फुटपतकें पांच हजार; एकूण विश्वासराव साहेबांचे टोळीस फौज सत्तर हजार. दुसरी टोळी सदाशिवपंत भाऊ खासे अंबारींत बसून, सभोवतीं फौज पन्नास हजारांचा गोल घेऊन मध्यभागीं इराणीसमूर परम आवेशें उभे राहिले. तिसरी टोळी जनकोजी शिंदे व दमाजी गायकवाड व समशेर बहादर वगैरे किरकोळ पतके मिळोन साठ सत्तर हजार घोडेस्वार याप्रमाणें जमाव करून उभे राहिले. श्रीमंत भाऊसाहेबांची स्त्री सौभाग्यवती पार्वती बाईसाहेब व इतर सरदारांचे कबिले याचे संरक्षणास मल्हारराव होळकर दाहा हजार फौजेनिशीं मागे ठेविले.

हें पाहून इराणी दुराणी व दिल्लीपद बादशहाकडील व सुजातदौले व मनसूरअल्ली यांणीं आपले गोट सोडून फौजेचा पुस्तपन्हां राखून त्यांनीं हि तीन टोळ्या करून—इराणी मध्यभागीं सत्तर हजार फौजेनिशीं व डावेकडे मनसूर अल्ली चाळीस हजार फौजेनिशीं व उजवेकडे सुजातदौले येणेंप्रमाणें दीड लक्ष फौजेनिशीं उभे राहिले. खासा अबदल्ली पन्नास हजार फौजेनिशीं मागें गोटांत राहिला. दोघे पुत्र मात्र पुढें आले होते. त्यांचीं नांवें:—

---

३ मारा, टप्पा ४ पाहणी केला. ५ व्यूह ६ पाठबळ

एकाचें नांव तेजूरशहा व दुसऱ्याचें नांव नजीमखां. यांजवळ रोहिले यांची खासी खासी जमेत एक दिलाची होती. त्यांतून तेजूरशहा यांनीं पन्नास हजार फौजेनिशीं " दिन्! दिन्! " म्हणून नीट चालून घेतलें.

तेव्हां युद्धास तोंड लागलें; दारुण संग्राम झाला. हवद्यास हवदे, राऊतास राऊत एक मेळ जहाला. व सुतरनालीं व बाणांच्या कैच्यां व करोलाच्यीं गोळ्या व गरनाळा व तोफांचा मार एकदांच जहाला. एकच रणधुमाळी दोन्ही सैन्यांत माजली. धुरें करून दिनमणीचा अस्त जालासा भासला. 'घे घे' हीच गर्जना उठली. उमास घ्यावयास अवकाश पडेना. पुढचा पाय पुढें. कोणी कोणास हरेना. एकापरीस एक आगळे. इराणीची जात अरबुंज, आपपर म्हणावयाची नाहीं. महाबली, महापराक्रमी, मोगल, पठाण व रोहिले रांगडे व रजपूत व पंजाबी, काठेवाडी वगैरे नाना जातीचे त्यांनीं संग्रामाची सीमा केली. बहुत मराठे दळ खपलें. रक्तोदकाचे पाट रणभूमीस वाहूं लागले. बीभत्स शरीरें दिसों लागलीं देहाभिमान कोणांत उरला नाहीं. चौफेर लढाईची बेदद्द होऊन गेली. थोर थोर अमीरांचे हौदे खाली जहाले. इराणी हावभैरी होऊन फिरून नीट फौजेंत चालून घेतलें. तेव्हां मराठी फौज कच खाऊन माघारी सरली.

[ रघुनाथ यादव कृत पाणिपतची बखर पृ. ३७–४० ]

---

# होळकराची थैली



पठाण यांणीं दुसरे दिवशीं सावर धरून, कुंजपुरा घेऊन आमचे फौजे-

---

७ प्रारंभ झाला. ८ उंटावरील लहान तोफा. ९ बाणांच्या जुडग्या. १० बंदुकाच्या. ११ रानटी १२ रिकामे पडले. १३ आशेनें, उमेद येऊन

भोंवतीं घेरा दिल्हा; लढाईचा प्रसंग सोडिला. आमचे फौजेंत पहिलें दिवशीं साफी करून, पांच सात कोस जाऊन, तमाम कही वगैरे सामान पंधरा रोजाचें भरून आणिलें होतें, तेव्हां रुपयास अन्न तीन शेर जहालें. त्यांजकडील पठाण लोक सभोंवतें काम करीत. इकडील लष्करची कही पाहून करीत. हत्ती व घोडे व उंट व बैल यांचे मृत्यु शेंकडो; माणसांची गणती काय ? तोफखान्याचे गोळे भारी केले. परंतु त्यांनीं (शत्रूच्या लोकांनीं) गोळ्यांचा जिकडे हल्ला, (तो जागा) सोडून दिल्हा. आणि हजार दोन हजार पठाण दाव घाव पाहून, अचानक येऊन पडोन, गाडदी वगैरे यांस जखमी करून व कांहीं ठार मारोन, माघारे जाईत. यामुळें इभ्रामखान गाडदी याणें तमाम फौजेस ताकीस केली कीं " लष्करा भोंवता खंदक खणावा. " गाडदी याणीं आपले सरहद्दीपुढें एक भाला खोल खायी खंटली. तेव्हां पठाणाचा लाग कमी येण्याचा पाहिला. तेव्हां ते हि चोहोंकडून संकटांत पडले. पन्नास हजार खासे लोक त्याचे होते त्यापैकीं पंचवीस हजार राहिले. आणि पुढें लढाईनें गलीम जेरदस्त होतां दिसत नाहीं. लढाई टाकून जावें तर मुलकांत काय सांगावें ? मलकाजमानी व मुजायतदौला यांस पैका मागावा तर ते म्हणतात कीं " आमचें काम फत्ते करून द्यावें आणि जो पैसा आम्ही कबूल केला तो घ्यावा. " असा अघटित विचार जाहला. त्यास " काय करावें ? " म्हणोन सुजायतदौला व मलकाजमानी व अबदल अल्ली वगैरे सरदार एकत्र होऊन तह केला कीं " कोणेहि प्रकारें गलीमाशीं सलूख करावा. " म्हणून अवघियांचें चित्तांत येऊन विचार केला आणि सांडणीस्वार याजबरोबर पत्र पाठविलें कीं " परस्परें भांडोन मुलूख बुडवावा यांत विशेष काय आहे ? जें जाहलें तें उत्तम. सांप्रत तुमचा सलूख हाच कीं सुदामतप्रमाणें जे ठिकाणीं तुम्ही अंमल करतां ते ठिकाणीं करावा. दिल्लीपतीची मर्यादा तुम्ही व आम्हीं रक्षावी. " तीं पत्रें श्रीमंत रा भाऊसाहेबांजवळ दाखल जाहालीं. भाऊसाहेबीं तमाम सरदार लोक इभ्रामखान गाडदी यांस बोलावून आज्ञा केली कीं ' लढाई तहकूब ठेवावी. ' व पत्रें आलीं होतीं तीं अवघ्यास वाचून दाखविलीं. आणि विचारिलें कीं " याचें उत्तर काय लिहावें ? आपल्या

ठिकाणीं लढाईची स्थीत येत नाहीं. " असें बोलोन पत्राचें उत्तर त्यास लिहिलें कीं " तुम्हीं म्हणतां तें आम्हांस कबूल. परंतु सातशे कोस आम्ही चालोन आलों. फौज किती अपार जाहाली आहे ! सात कोट रुपये खर्च जाला तो तुम्ही आम्हांस द्यावा आणि आपले मुलखास जावें. नाहींतर जें होणारें तें होईल. " अशी बोलण्याची त्यांची व यांची रदबदली लागली. कांहीं रुपये द्यावयास त्यांनीं कबूल करावें असा प्रसंग जाहला. शंभर माणूस रदबदली करावयास लागलें.

[ इतक्यांत ] पठाण यांनीं ( गोविंदपंत बुंदेले यांचा ) शिरच्छेद केला हें अशुभ, खेदकारक वर्तमान श्रीमंत भाऊसाहेबीं ऐकिलें. सलूखाचा तह जाहला होता तो बिघाड होऊन दोनी फौजा प्रज्वलित जाहाल्या. श्रीमंत भाऊसाहेब आपण तोफखान्याजवळ येऊन तीन शे जरबा थोर थोर व इभ्रामखान गाडदी यास घेऊन लष्करा बाहेर निघाले. पठाण याची फौज तयार जाली नव्हती. अचानक साफी करोन जाऊन पोहोंचले. या जंगेंत पांच मोहरे त्याजकडील मृत्यु पावले. ऐसा भयाभंग जाहाला. सुजायतदौला व अबदलअल्ली परस्परें धुंदीस आले. उभयतां बोलूं लागले कीं " तुम्हीं आम्हांस बुडविलें. " अशा कजियांत चारशे माणूस उभयतांचे कामास आलें. ते समयीं मलकाजमानीनें दरम्यान येऊन उभयतांची स्थिरता केली. फौजेत कांहीं जीव राहिला नाहीं. सारांश मोठमोठे अमीर, अबदलअल्ली व सुजायतदौला यांणीं " रात्रीचें ठायीं विषप्रयोग करून अखंडदंडायमान व्हावें " अशी शरम गालीब जाली. ही खबर मलकाजमानी बादशाहाजादीस आली. तों स्त्रीधैर्य पूर्वीपासून महत्, असें शास्त्री पुराणीं प्रमाण, तें दृष्टोत्पत्तीस आलें. आपण पडदा लाऊन जातीनें सुजायतदौला याचे डेऱ्यास गेली. सुजायतदौला याणीं खुरनिशात बजावून, हात बांधून, उभे राहिले. " काय आज्ञा ? " म्हणोन अर्ज केला. पातशाहाजादीनें प्रत्योत्तर तेजःपुंज दिल्हें कीं " तुमचे पिते मनसूर अल्लीखान वगैरे अमीर होते त्यांचा पराक्रम या दक्षण, या हिंदुस्थान दोन मुलकांत जाणतात. त्याची अमर्यादा तुम्ही करून त्याचे यशचंद्रीं कालिमा कां लाविला ? आणि वैरियासि विन्मुख होऊन विषप्रयोग करितां हें अनुचित. मरण

कबूल केलेंच आहे, तेव्हां असें कां मरावें? शत्रुसन्मुख घेऊन मेल्यास काय चिंता आहे? जहर खाऊन मरावें यांत वैकुंठप्राप्ती व तरवारेचे धारेनें मरावें यांत नर्क असें कांहीं आज तहकीक तुम्हांस कळलें असेल कीं काय! तुमचे विचारास जसें येईल तसें करावें." म्हणोन तरवार वोढून त्याचे स्वाधीन केली कीं "तुम्हीं आपले हातें माझा गर्दनच्छेद करावा. नंतर तुम्हांस विहित कर्तव्य असेल तें असो." अशीं मलकाजमानींची उत्तेजन-वचनें ऐकोन जसें पंकार्त म्हणजे चिखलानें भरून आर्त जाले ते गंगा-प्रवाहीं निर्मल होतात तसे सुजायतदौला कुबुद्धिमलें व्यापिले होते ते मलकाजमानीचे वचनगंगोदकजलें प्रक्षाळून पूर्वीपेक्षां सुशोभित जाले. चित्तांत धैर्य धरून अबदलअल्ली यास बोलावूं पाठविले. सुजायतदौला याजकडील बोलावणारा गेला त्याणें सांगितलें कीं "आपली चिंता सर्व ईश्वरास पडली आहे. गलीमास नसती सलाबत जाली. गलीम तळ व तोफखाना व बुणगें सोडून पळतात. तमाम सरदार पळाले. याजवर नौबतखाने सुरु करून सुजायतदौला सिद्ध जाले. साहेबीं चाललें पाहिजे. सांप्रत मरत्यास मारणें कठीण नाहीं" ऐसें ऐकोन जयश्री वस्त्रें भूषणें, सुशोभितशीं, अनृत वार्तिकवचनें सत्य मानून नौबत करविली आणि आपण मलकाजमानी जवळ येऊन खुरनिशात केली. पुनरावृत्ति बुद्धीस धैर्यसंचार जाहाला. प्रातःकालसमयीं हुंकार देऊन तमाम गलित फौज त्या मुक्कामीं टाकून निवडक सत्तर हजार स्वार पठाण शाबुर्दीत निघाले. तों आम्हांस इकडे बातमी आली. श्रीमंत भाऊसाहेब व इभ्रामखान गाडदी याणीं बरा पराक्रम करून तळ उठवून माघारे लष्करांत आले. नौबती सुरु करून पांच लक्ष रुपये धर्म केला. दुसरे रोजीं चार घटका दिवसास बातमी आली कीं 'पठाण सावर धरून येतात.' असें ऐकतांच पूर्ववत् प्रमाणें मिसला तमाम शिबंदी पाठवून फौज सिद्ध करून उभे राहिले. इभ्राइमखान गाडदी याणीं अर्ज केला कीं "आज निकड फार होईल. पठाण फार पोळले आहेत, कसूर होणार नाहीं. साहेबीं एक ठिकाणीं चाल होतांच धैर्य धरून असावें." अशा विचारांत आहे तों तोफांचा मार चुकवून पठाण येऊन उभे राहिले. त्यास, फौज जैसी तैशीच तयार आहे हें पाहून

अबदलअली बेहिंमत जाला. आघाडीस होते ते पिछाडीस जाले. पठाण-फौजेची अधैर्यता पाहून पादशाहाजादी मलकाजमानी हातिणीवर अंबारींत स्वारी होती ती खालीं उतरली. डेरा उभा केला. औरंगजेब महाबली याचें स्मरण निश्चयपूर्वक करून मान्यता केली. त्याचें पातशाही निशाण जामदारखान्यांतून काढून बिनियावर चढवून सेवकास आज्ञा केली कीं ' दरोबस्त फौजेचे आघाडीस घेऊन जाणें. ' सुजायतदौला व अबदलअली वगैरे मुख्य सरदार यांस प्रासादिक अंगारा पाठविला. प्रसादस्पर्शांनीं अधैर्य, अधीरपणा होता तो सर्वांचा जाऊन, पुन्हा शत्रुमर्दनाविशीं निष्ठा दृढतर जाली. तमाम सरदार एकत्र होऊन स्वतां इमानें केलीं. सत्तर हजार फौज एक दिल करून, फरा बांधोन आम्हांकडील फौजेवर बांधूं लागले.

आम्हीं आपले मिसलींत तयार होऊन उभे होतांच ते दिवशींचा समय सर्वांस विचित्र भासला. उपप्लव नानाप्रकारचे होऊं लागले. दिशा, आकाश रक्तवर्ण पाहून आम्हीं श्रीमंताजवळ गेलों. तेथें हि सर्वांची क्षीण-चित्तें देखिलीं. भाऊसाहेब धैर्याचे मेरु. आम्हांस आज्ञा करिते जाले कीं " या प्रसंगीं सर्व प्रकारें तुम्ही वडील आहां. आजचा प्रसंग आमचे समाप्तीचा आहे. त्यास दोन प्रकारें संकट. हें आपणाविगळें मुक्त करून मनोरथ पूर्णकर्ता कोणी दिसत नाहीं. संकटें कोणतीं म्हणाल तर चिरंजीव विश्वासराव यांस मातापिताविरहित हा प्रसंग; व दुसरें आमचे कुटुंब समागमें. त्यास स्त्रीचा वध करावा तर आमचा क्षात्र धर्म नव्हे. ब्राह्मणास स्त्रीहत्या वर्ज. त्याणीं सहगमन करावें तर आम्हीं धारातीर्थी देह ठेवणार. पुढें प्रसंग दुष्टांशीं. याजकरितां उभयतास तुम्ही आपले जवळ घेऊन एका' बाजूवर जावें. " अशीं शास्त्रवत् उत्तरें केलीं. तो प्रसंग वैरियासहि पाहवणार नाहीं. आम्ही श्रीमंत भाऊसाहेब यांजवळ जाऊन समजाविलें कीं " हें कर्म किंनिमित्य करतां ? बाहेर आणीक लोकांस कळतां फौज चकित नाकर्ती होईल. " असें आम्हीं खंबीरता बोलतां आपण बोलले कीं " तूर्त तुम्हीं कांहीं न विचारतां उभयतांस घेऊन जाणें. जन्माचें सार्थक व्हावें म्हणून हा प्रसंग जगदीशें परमपुण्येंकरून योजिला. मृत्यु कोठेंहि

चुकत नाहीं. " अशा प्रत्ययपूर्वक गोष्टी ऐकोन, लाचार होऊन उगेच राहिलों. मातोश्रीस गजारूढ करून, श्रीमंत विश्वासराव यांजला घेऊन आम्हीं चाललों. इताकियांत इभ्रामखान गाडदी यांस वर्तमान कळलें. त्याजवरून बोलिला कीं " हें कर्म अनुचित करतां. रायाची नेमणूक पहिलीं दरोगीं तोफखान्याचे केली होती. आणि हा उपाय करतां ! परंतु उपयोगास येणार नाहीं. जसे पूर्वी आम्हांजवळ होते तसेच असावे. " असें उपाधियुक्त वाक्य करता जाहाला. श्रीमंत विश्वासराव यांणीं त्याचें बोलणें ऐकून चित्तांत विचार करून धैर्य धरिलें कीं " भाऊसाहेबीं आपला वियोग करून आम्हीं वाचावें असें निर्मिलें. हें आम्हांस विहित नाहीं. सारांश, जो मार्ग त्यांचा तोच आमचा. " असें मनांत धरून कोणास न पुसतां इभ्रामखान गाडदी याजकडे हत्ती डुलवून आणला. श्रीमंत भाऊसाहेब हत्तीवरून उतरोन जिमा घातला. एक तलवार फिरंग घेऊन घोड्यावर स्वार जाहाले. ' जयजय हरहर ' शब्द संपूर्ण फौजेंत जाहला. शिपाई, वीर यांणीं दरोबस्त तरवार मेणांतून बाहेर केली. आम्ही आपले मिसलेस मातोश्री पार्वतीबाईस घेऊन गेलों. तों अबदलअल्ली फत्ते निशाण पुढें देऊन आला. सर्वांनीं तरवार वोढली. तेव्हां भाऊसाहेबीं आम्हांकडे निरोप पाठविला कीं " तुम्हीं हत्यार न लावणें. आमची व त्यांची तरवार लागली म्हणजे तुम्ही सहस्रयोगें न विचारतां निघोन जावें. यांत अंतर कराल तर गोब्राह्मणवधाचें पातक कराल. " असें शपतपूर्वक सांगोन पाठविलें. [ खं. ६ ले. १७२ ]

---

# विश्वासरावाचा मृत्यु.



धान्याची अडचण पडोन तीन रुपये शेर धान्य भाव मात्र; जिन्नस दमडीभार नाहीं ! तेव्हां लाचारी पडली. मनसुब्यास सोहलत राहिली नाहीं. " आतां अन्नावांचून मरावें ते पेक्षा धारातीर्थी अनुसर व्हावें " हे

नेकसल्ला भावी भवितव्यानुसार मनांत ठसून शिंदे, होळकर आदिकरून कोणासही न पुसतां " जय आपजय परमेश्वर देईल त्यास; परंतु दाण्या चाऱ्याचे कोचणीने हबक खाऊन न पुसतां उठून जातील. मग समेटणें कठीण. " असा आपले मनांत विचाराचा आगम बांधून दुसरे दिवशीं श्रीमंत भाऊसाहेब यांणीं तमाम फौजेस ताकीद करून समरांगणास जागा उभेतीची पाहून लढाईस आरंभ केला. लढाई निकराची. भाऊसाहेबांचा हत्ती पुढें. तेथून गोळीच्या टप्यावर विश्वासरावांचा हत्ती. ईश्वरकृत्यानुसार विश्वासरावास अचानक गोळी लागली. भंवते स्वार होते ते कालवले. वृत्त भाऊसाहेबांस समजतांच भाऊसाहेबांनीं हत्ती बसविला आणि धांवत आले. विश्वासराव गोळीचे जखमेनें कार्य होऊन गंतुकाम. तथापि हिंमत धरून भाऊसाहेबांशीं बोलले कीं " येथें जें ईश्वरास कर्तव्य तें केलेंच. परंतु आपले आल्यानें लढाई बिघडेल. ही गोष्ट चांगली केली नाहीं. आपण तो प्रसंग संपादावा " इतकीं अक्षरें हिंमत बांधून बोलले. तथापि " [ आपण विश्वासरावास ] आग्रहानें [ पुण्याहून ] आणिलें आणि तेथें ईश्वरानें काय केलें ? आतां तोंड कसें दाखवावें ? " इतकें मनांत आणून घोड्यावर स्वार होऊन घोडे घातले. या उभयताचें वृत्त, वकीलांच्या चिठ्या शिंदे होळकर यांजकडे जातांच हवा पाहून उभयता सरदारांनीं घोडे घातले. जनकोजी शिंदे गारद जाले. मल्हारजी होळकर यानीं ऐंशी स्वारानिशीं दाक्षिणचा रस्ता धरिला.

[ होळकराची कैफियत पृ. २७ ]

---

१ योग्य मसलत. २ तसदीनें, कमीपणानें ३ धास्ती ४ उंचवट्याची? ५ गोंधळले. ६ मुमूर्षू, मरण्याच्या बेतांत ७ नष्ट, ठार

# अखेरचा प्रसंग



उजवे बाजूस शिंदे होळकर होते. यांजवरि सुजाउद्दौला वगैरे यांणीं येऊन झुंज दिलें. झुंज मातबर होऊं लागलें. मध्यें भाऊसाहेब व विश्वासरावसाहेब अंबारींत होते ते उतरून घोडियांवर स्वार जाले. भाऊसाहेब बोर[1] घोडीवर व रावसाहेब पीलबाला[2] घोडा याजवरि स्वार जाले. चहूकडून संभाळून होते. झुंजाचे तोंड भारी लागलें. मारामारी होतच होती. मातबरच खासे हुजरातीतील पडो लागले. ते समयीं विश्वासराव हुजरातीच्या लोकांत येऊन त्यानीं घोडे घातले आणि घाव केला. तों ईश्वरी क्षोभ जाला. एकाएकीच छातीमध्यें गोळी लागून विश्वासराव ठार जाले. नानासाहेबांचें निधान हरपलें. लोकांनीं कडनिकड करून मुर्दा अंबारींत घातला. आणि वरती शालजोडी घातली. हें वर्तमान भाऊसाहेबानीं पाहून आवसन सोडिलें. बहुतसा विलाप करूं लागले. मग त्या त्वेशानें भाऊसाहेबानीं निश्चय केला कीं, ‘ या उपरि गिलच्या खाशानिशीं मारीन. ’ म्हणोन लोकांस ताकीद केली. आणि झुंज केलें. ‘ हाणा ! हाणा ! ’ असें मुखें बोलोन बरोबर समशेर बहादर घेऊन पुढें जाले. आणि तीन वेळ हत्यार केले. त्या इरेनें लोकांनीं हिंमत धरून भाऊसाहेबाबरोबर पुढें सरसाऊन शिपायगिरी बहुत केली. दुराणी व रोहिला माघारा फिरविला. अबदुलअल्ली पळोन नदीतीरास गेला. शर्थ जाली.

विठ्ठलराव शिवदेव यांणीं पेशजी गिलचे चाकर ठेविले होते. ते दोन हजार होते. त्यासमयीं त्यांस इशारतीस भगवा पटका दिला होता. तो डोईस बांधून फिरत होते. ते समयीं ‘ विश्वासराव पडले ’ ही खबर बुणगियांत आली. त्याजमुळें बुणगे व लष्कर गडबडलेंच होतें. गिलचे चाकर यांणीं भगवा पटका टाकून दिला आणि बुणगियांत आवई घातली आणि लुटू लागले. बुणग्यानें पळ काढिला. बुणगें पळतें हें पाहून विठ्ठल शिवदेव

---

१ काळसर तांबड्या २ हत्तीच्या बांध्याचा.

यांणींहि पळ काढिला. आधींच विश्वासराव यांचें वर्तमान ऐकून दहशत खादली होती. कोणी दम धरून बुणग्यांत राहीनासें जालें. [ गिलचे चाकर यांणीं ] लुटीची आवई घातली आणि धुमाळी मांडिली.

इकडे भाऊसाहेबांकडे युद्ध होतच होतें. भाऊसाहेब यांची स्त्री पार्वतीबाई तेथें अंबारींत होती. अंबारीस अंबारी तटली होती. युद्धाचे धुंदींत घाबरी होऊन अवघें लक्ष पुढेंच होतें. तों एकाएकींच मुर्दा अंबारींत पाहिला. आणि बाईनें माहातास पुसलें कीं “ मुर्दा कोणाचा आहे ? ” त्याणें उत्तर केलें कीं “ विश्वासरावसाहेब ठार जाले ! ” खवासखान्यांत खिजमतगार होता त्यास सांगोन तोंड उघडून पाहिले, तों रावसाहेब मृत्यु पावले हें देखिलें. पार्वतीबाईनीं पाहून ऊरकपाळ बडविलें. शंखध्वनी केला; आणि बोलती जाली कीं, “ ईश्वरा ! आम्हांस एवढें निर्वाण कां दाखविलें ? रावसाहेबासारखें रत्न हरपोन गेलें ! ” म्हणोन बहुतच शोक करिती जाली. तों जवळ नाना फडणीस यांची मातुश्री होती तिणें शांत केली कीं “ बाई ! रडें ईश्वरें ओढूनच आणिलें आहे. एवढ्यावरच मुक्त जाला असा अर्थ नाहीं. अजूनहि सर्वत्र महा अनर्थपात आहे. यांत ईश्वर पार पाडील तर बरें. नाहींतर रडें लागलेंच आहे. तों पावेतों दम खावा” म्हणोन शांत केली.

उपरांतिक चार घटकापर्यंत भाऊसाहेबांनीं हुजरातीनिशीं मारामार केली. परंतु डावे बाजूनें हातच सोडिले. आभाळ फाटलें. तेथें ठिगळ कोठवर लावावें ? मग भाऊसाहेब घोडियावरून पाय उतारा जाले. भाऊसाहेब यांचे तोंडास ‘ हाणा, हाणा ! ’ हेंच करीत असतां खरस आली. जातीनिशी मोठा हिया करून बहुत झुंजले तें कोठवर लिहावें ? सरकारचे मुत्सद्दी मातबर तमाम एकीकडे कुल पळून गेले. ते समयीं सोनजी भापकर यांस भाऊसाहेब बोलले कीं, “ सोनजीबाबा, या समयीं निघावयाचें नव्हतें. तुमचा भरंवसा बहुत धरला होता. ” तेव्हां ( सोनजी ) बोलले कीं, “ लोक पळतात त्यांस माघारें फिरवितों. साहेबांस टाकून आम्हीं कोठ

---

१ फेस आला.

जावें ? " असें बोलून लोक फिरवावयास म्हणोन गेले ते तिकडेच गेले ! तेव्हां तुकोजी शिंदे म्हणो लागले कीं, "महाराज, क्षात्रधर्माची शर्थ जाली. चोहींकडून आभाळ फाटलें. या उपरि निघावें यांत उत्तम आहे. " तेव्हां भाऊसाहेबांनीं उत्तर दिलें कीं, " तुकोजीबाबा, आतां कोणीकडे जावें ? काय तोंड नानासाहेब यांस दाखवावें ? रावसाहेबांची गत काय जाली ती पहावी. आणि इब्राामखान गाडदी यास इनाम दिलें तें काय?" असें ऐकून मागती तुकोजी शिंदे यांनीं उत्तर दिलें कीं, "भाऊसाहेब, तुम्हीं वांचला तरी अबदली याचा सूड घ्याल. नाहींतर तुमच्या मागें अवघ्याच गोष्टी आटोपल्या. " असें ऐकून मागती भाऊसाहेब बोलिले कीं " पुणियांत नानासाहेबांस तोंड काय म्हणोन दाखवावें ? 'निघावें,' अशी गोष्ट घडणार नाहीं. रणाचे ठायीं ईश्वरसत्तेकरून जें घडणार असेल तें घडेल. परंतु कदापि नामोहरम व्हावयाचें नाहीं. " असें म्हणतांच तुकोजी शिंदे यांणीं घोडियावरून उडी टाकिली, आणि जातीनिशीं हत्यार केलें. तेथें मोठी मातबर मरदोमी करून मराठी धर्माची शर्थ करून खस्त केली. तेव्हां अकस्मात गोळी लागोन ठार जाले. जरीपटकियाचे निशाणावर आधींच दाटी जाली होती. तेव्हां हत्तीवरून उतरून घोडियावर घेतलें. निशाण गुंडाळून झाडून पळों लागले. तेव्हां भाऊसाहेबांनीं शहाजणें वाजविण्यास आज्ञा दिली. " फत्ते जाली, शहाजणें वाजतात याजमुळें तरी लोक माघारें फिरतील, " या अर्थें शहाजणें वाजतात असें करूं लागले. परंतु ज्यानीं पळ काढिला त्यांपैकीं कोणी माघारे फिरले नाहींत. भाऊसाहेब यांचे तोंडास खरस आली. ' हाणा ! मारा ! ' म्हणावयाचें राहिलें. तोंडापुढें कोणी ओळख्या आला तरी तोंडानें मात्र हुंकार देऊन मानेचे संज्ञेनें दाखवूं लागले. अंगावरि ब्रह्मांड येऊन कोसळलें. परंतु हिंमत हरली नाहीं. भाऊसाहेब यांजप्रमाणे पराक्रमी दुसरा होणें हे असाध्य गोष्ट. जाग्यावरि हजार बाराशे मात्र उभे राहिले. चोहोंकडे एकदांच अभाळ पांढरें जालें. जिकडील तिकडे पळोन गेले. भाऊसाहेब यांजपाशीं जनकोजी शिंदे व रावसाहेब

---

४ विश्वासराव.

यांचे मुर्द्याचे हत्तीपाशीं शे पन्नास लोक उभे होते तेवढे मात्र बाकी राहिलें. सभोंवतां वेढा पुरा पडला. युद्ध बहुत केलें. पूर्वी युद्धांत अतिरथी, महारथी झुंजले; त्याप्रमाणें भाऊसाहेबीं विरर्थापणें शर्थ केली. पुढें कांहीं इलाज चालेनासा जाला. दुराणी व नजीबखान रोहिला असें चाळीस हजार फौजेंतून दाहा बारा हजार फौजेनिशीं भाऊसाहेब यांजवर येऊन वर्पले. ते समयीं मारामार अशी जाली कीं, ' न भूतो न भविष्यति. ' एकदांच भोंवताले वेष्टून उभे राहिले. आंत रंवदळारंवदळ[५] क्षणभर बहुतच केली. त्यांत भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गत कैशी जाली हें न कळे. उभयतां त्यास कोणी दृष्टीनें पाहिले नाहींत. गर्यफ[६] जाले, किंवा अस्मानांत गेलें कीं, पृथ्वींत गेलें हें ईश्वरीकौतुक ब्रम्हादिकास न कळे. तेथें मानवीयांस काय कळेल ?

[ भाऊसाहेबांची बखर पृष्ठ १४७-१५३ ].

---

# युद्धाची विश्वसनीय हकीकत



१६८२ माघ शु. १ ] श्री

श्रियासह चिरंजीव राजश्री सुभानबा यासी:—सटवोजीराव जाधवराव आशीर्वाद उपरि येथील वर्तमान ता॥ माघ शु॥ १ मुक्काम कुंभेर यथास्थित असे. विशेष. पाणिपतावरी अडीच महिने मोर्चेबंदी करून राहिलों होतों. गिलजाचा आमचा दो कोसाचा तफावत होता. सड्या फौजा पुढें, मागें बुणगें, याप्रमाणें मोर्चे बांधून, तोफा पसरून राहिलों होतों. एक लढाई कार्तिक शु॥ १५ मेस जाली. व दुसरी लढाई आमावाशेस जाली. दोन्ही

---

५ तुडवातुडव, मारामार, चेंगराचेंगर. ६ गुप्त.

लढायांत दोहींकडील फौजा कायमच होत्या. गिलजा आमच्या लष्करा-भोंवता फिरोन रस्त बंद केली. वैरण जाळली. यामुळें लष्करांत काळ पडला. दोन अडीच शेर दाणे जाले. लोकांस अन्न न मिळे ऐसा प्रसंग जाला. घोडीं तों बहुत लोकांची मेलीं च होतीं. राहिलीं तीं हि पोटामुळें तुटलीं होतीं. निदान प्रसंग जाणोन पौष शुा अष्टमी बुधवारीं हल्ला केला. पुढें फौजा, त्यापुढें तोफखाना, बुनगे पाठीवर समागमें घेऊन, निघोन मोंगलावर चालोन जाऊन, जुंज उत्तम प्रकारें केलें. अडीच तीन प्रहर-पर्यंत जुंज चांगलें च जालें. राजश्री विश्वासराव यास गोळी लागोन ठार जाले. इभ्रामखान गारदी यास गोळ्या लागोन ठार जाले. वरकड हि कितेक मातबर लोक कामास आले. आपले फौजेने शिकस्त खादली. ज्यास जिकडे सोय पडली तिकडे निघाले. कोणी कोणास मिळालें नाहीं. राजश्री मल्हारजी बाबा हजार दोन हजार फौजेनिशी निघाले. रा नारो शंकर दिल्लींत होते. त्याजपाशीं फौज पांच सात हजार होती. तितक्यानिशीं निघोन, सौभाग्यवती पार्वतीबाई दोन च्यार शे स्वारानिशी निघाली होती त्याची राजश्री मलारजी बावाची गांठ वाटेस पडली, त्यांजला ते संभाळून घेऊन चमेलीपार भदावरच्या मुलकांत गेले. वरकड फौज बाळोच्याच्या मुलकांतून ज्यास जिकडे वाट फुटली तिकडून निघाली. वाटेनें गांव मातबर. गांवोगांव रावतांचा भरणा. जाबीगार फार. दोन रोज रात्रंदिवस गवारांचें जुंज पुरवलें. घोडीं थकोन राहिलीं. कोणाचें घोडें निभावलें नाहीं. तमाम फौज पायउतारा जाली. आमचीं हि घोडीं तमाम थकलीं. आम्ही मागा-हून डोल्यांत व गाड्यांत बसून हळूं हळूं कुंभेरीस आलों. तेथून भरतपुरास जात होतों तों ठाकूर सुरजमल्ल यांनीं सामोरे येऊन भेटले. फिरोन ते व आम्ही समागमें कुंभेरीस आलों. तेथून रा मलारजी बावाकडे पत्रें लिहून पाठविलीं आहेत. त्यांचे प्रतिउत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असों. दो चौ रोजांनीं त्यांचें उत्तर आलें म्हणजे येथून स्वार होऊन आपल्या परगण्यांत सिपरी व कुलारसास जाऊं. तेथून सविस्तर वर्तमान तुम्हांस लिहून पाठवूं. सिपरी येथून चौ रोजाची वाट आहे. लौकरीच जाऊं. सौ पार्वतीबाई व रा मल्हारजी होळकर जिवानिशी मात्र गेलीं. रा भाऊ-

साहेब कोणीकडे गेले त्याचे अद्यापि ठिकाण नाहीं. रा जनकोजी शिंदे यांचें हि ठिकाण नाहीं. वरकड सरदार कोणी पुढें गेले. कोणी अद्याप मागें च आहेत. सारांश आपले फौजेचा विध्वंस जाला तो लिहितां पुरवत नाहीं. ईश्वर सत्तेनें होणार तें जालें. सिपरीस गेलियावर सर्व सरंजाम नवा केला पाहिजे. ईश्वरी कृपेनें होऊन येईल. तुम्हीं कोणेविशीं जालकी न करणें. तुम्ही आपले ठाई सावध राहणें. आपलें वर्तमान लिहून पाठविणें. बहुत काय लिहिणें ? हें आशीर्वाद. [ खं. ६ पृ. ४७० ]

---

# नानाफडणिसाचें आत्मचरित्र.



मी दिल्लीस गेलों. तेथें पृथ्वपितीचें दर्शन श्रीमंतांचे आज्ञेवरून घेतलें. त्याणीं बहुत कृपायुक्त भाषण करून आशीर्वाद देऊन आपले जवळील वस्त्रें दिलीं तीं घेतलीं. किंचित् संतोष जाहला कीं, भगवंताचे कृपेचे अंतर्वर्ती ही कृपा आहे. तदनंतर श्रीमंतांचे लष्करांत श्रीमंतांजवळ आलों. बसलों असतां भूमीकंप जाहला. परंतु भगवंताचें ध्यान चित्तांत आणिता जालों. दिल्लींतील चित्रें वगैरे विषय ज्यांत पाप नाहीं असेही घेतले, पाहिले. पुढें उत्तरेकडील यवन शत्रुत्वें करून यमुना पैलतीरीं पाऊण लक्ष सेनेसह-वर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली तेणेंकरून उभयपक्षीं स्तब्धताच राहिली. पुढें कुंजपुरा श्रीमंतांनीं शौर्येंकरून घेतला. मीही युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तों इल्कियांत यवन आलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गांठ पडली. तेव्हां मी तर लहान. श्रीमं-तांचे बुद्धीस-महानबुद्धी [?] परंतु भावी अर्थ तेणेंकरून—विपर्यास पडला. आप्त होते व बळवंतराव मातुल व नाना पुरंधरे वगैरे ते अनाप्त जाले. जे अनाप्त शाहनवाजखान, भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले. त्यांचे वा-क्याचे ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची

रीत धरिली. परस्परें युद्ध होत असे. शत्रूचे गोळे प्रत्यहीं राहुटीवरून जात मातोश्री व स्त्री भयभीत होत कीं कसें होईल ? ते ते समयीं मातोश्रीस विनंति करीत गेलों कीं एक इश्वरीं लक्ष असावें. त्यांत मातुळ युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें. परंतु रात्र जाहली यामुळें राहिलें. त्या दोन महिन्यांत मनुष्यें पशु बहूत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं. असे श्रम पाहिले. पुढें मातुळाची स्त्री समागमें गेली, मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार अवश्यक होतें. यदर्थी संदेह धरूंच नये. हा माझा निश्चय. पुढें थोरलें युद्ध उदयीक होणार. तों पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंतांचे व आपलें कुटुंब लागू नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनीं याची ही योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धिवान, धैर्यवान, शूर, कृतकर्म; गर्व मात्र विशिष्ठ, परंतु तर्तुद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणाजवळील तर्तुद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंता संन्निध ईश्वरस्मरण किंचित करून असे. तों विश्वासराव यास गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार चौघड्याचे धनी देखील, पूर्वीच पळाले. उजवे बाजूचे ही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धि दिली माघारे फिरलों. पूर्वी युद्धांत बापूजी पंतीं बोध केला "माघारे फिरावें." त्यांस उत्तर केलें कीं, "अशा समयीं श्रीमंतांस सोडणें ठीक नाहीं." परंतु पुढें याप्रमाणें जहालें. लक्ष सैन्य त्यांत मोठे मोठे सरदार असतां एक ही त्या समयीं श्रीमंतास आप्त न जाहला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. तितके चांगला काळ होता तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा परंतु ईश्वरघटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरें करून करावें. वस्त्र, जवाहीर, जागिरा,

घ्याव्या. निदानीं इतकें असून त्यांचे देहाचें ठिकाण ठाऊक नाहीं. सर्व वाताहात जहाले. मी सायंकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलों. त्या देशाचा मार्ग अगदीं ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावया पुरते रामाजीपंत उभे होते. सांगू लागले " घोडें वस्त्रें टाकून द्यावीं." त्यावरून सर्व शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तों एका कोसांत तीन चार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेस समागमेचे दाहा वीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों. हे सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत, रामाजीपंत, राहातच गेले. असें जातां दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों. तों तेच शत्रू येऊन रामाजीपंत बापूजीपंत वगैरे यांस जखमी भारी केलें. पडले. मी एकटा राहिलों. तो गवतांत गेलों. ईश्वरें तृणें करून माझें रक्षण केलें. त्यांस मोहनी घातली. सर्वांस मारिलें असतां मी जवळ असतां न मारिलें. व गवत लांब असतां जाऊं दिलें. पुढें ते गेल्यावर जाऊ लागलों. तों पुढें दोन कोशावर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समयीं ईश्वर त्यांतीलच एका वृद्धाचे मनांत संचार करितां जाहला कीं 'कशास मारितां?' मग गेले. तदनंतर माझी शक्ति पाणिपतावर बहूत क्षीण, आमविकारादिक विकारयुक्त. अन्न चालना, असा मी त्याजवर दयासमुद्र सांबसदाशिव जो याणें कृपा करून शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं, व पादचारी अभ्यास नसतां सोळा सत्रा कोश अन्न उदका व्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला. तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृत–प्रमाण लागली. नंतर निद्रा केली. प्रातःकालीं गंगा–सहस्रनाम म्हणत ईश्वर स्मरण करीत चाललों. तों एका गांवामध्यें गेलों. तेथें एक साहुकार होता त्यानें घरीं नेलें. एक ब्राह्मण होता, व यशवंतराव चाबुकस्वाराकडील भेटला, त्याजकडून स्वयंपाक करवून भोजन केलें. तों शत्रूचे स्वार गांवांत आले हें वर्तमान कळलें. तेव्हां साहुकार म्हणाला कीं, "आम्ही गाडी करून जनयगराकडे पावते करितों." गाडींत बसून चाललों तों पाहिलें कीं हा

फसवितो. असें बुद्धीस येऊन गाडी टाकून पाय उतारा च होऊन चाललों. बरोबर दोन तीन ब्राह्मण, दोन मराठी माणसें, याप्रमाणें दाहा बारा कोश गेलों. असे सात दिवस पायीं चाललों. नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी. तेणे करून समागमाचे मंडळी सुद्धां भक्षुन रेवाडी पावेतों आलों. तों लष्करचे पळे त्या वाटेनें गेले. त्यांस गांवांत बालोराव म्हणून चौधे माऊ असत.तें माझें नांव ऐकून पुसत कसे आहेत? चेहरा कसा! खुणा खाणा सर्व त्यांणीं पुसून घेतलें. मागाहून हे येतात हें जाणून मार्गावर नेहेमीं पाहात बसत. आम्हीं आलों तों त्यांणीं रेवाडी बाहेर ओळखिलें. पुसूं लागले. नांव न सांगावें हा निश्चय, परंतु तो आंगींच नांव लावूं लागला. त्याचे बोलण्यांत वांकडी गोष्ट नाहीं. आम्हांस साहित्य करून द्यावें, उपकार करावा हें पाहिलें. तेव्हां नांव सांगितल्यावर आपले घरास मंडळी सुद्धां नेऊन उत्तम प्रकारें भोजनाचें साहित्य करून दिलें. भोजन केल्यावर वस्त्रें दिलीं. तदनंतर रामजी दास जोशी मातबर रेवडींत असे त्यास वर्तमान कळल्यावर त्याणें आपले घरीं नेऊन ठेविलें. सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रें दिलीं. पुढें आमचे मनास दीग भरतपुरास जावयाचें. परंतु तो म्हणे सोबत चांगली लावून गाडी करून पावतें करीन. त्यावर एक लग्न निघालें. त्याबराबर पेढे साहित्य करून दिलें. आम्हीं निघालों तों वाटेंत कृष्णंभट वैद्य आले. त्यांणीं सांगितलें कीं, स्त्री विरोजी बारावकर यांणीं संभाळुन आणिली. ती जि ग नी स नारोपंत गोखले यांचे घरीं आहे. तेथे त्या गृहस्थानें साहित्य वस्त्र पात्रांचें केलें. आम्ही तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचें घातलें. तेव्हां आनंद जाला. मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालों. तों दिगेस आलों. तेथें पुरुषोत्तम माहादेव पाणिपताहून आले होते. ते वानवळे यांचे गुमास्त्याचे बिऱ्हाडास राहिले होते. त्यांस कळतांच त्यांणीं आपले बिऱ्हाडास नेलें. तेथें कुटुंब सुद्धां कमकसर महिनाभर होतों. क्षुधा फार लागत असे. त्यांणीं वस्त्रें वगैरे साहित्य भोजनाचें चांगलें केलें. तेथून मातोश्रीचा शोध फार केला. परंतु घरचा खिजमतगार बराबर होता त्याणें सांगितलें, घोड्यावरून पडून जखम लागून मेली, हेंच ठिकाण लागलें. पुढें पालखी व घोडीं घेऊन ढवळपुरावरून ग्वालेरीस सारें लष्कर पळून पार्वतीबाई,

नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर सारे होते तेथें आलों. अंतःकरणापासून होते कीं, श्रीकाशीस जाऊन नेहमीं वास करावा. प्रपंचांतील विषय—मात्रीं दुःख हें पुरतें समजलें. परंतु देहप्रारब्ध बळबंत. तेथें आलियावर सर्वांनीं निषेध केला. "एकदां देशीं जावें. मातोश्रींचा विधी करावा, वगैरे कित्येक प्रकार काशींत गेल्यावर कसें होईल? पाणिपत जालें तेव्हां काशी ही कशी होते." असें चित्तांत येऊन लष्कराबरोबर येऊं लागलों. पाणिपताचें वर्तमान श्रीमंत नानासाहेबांनीं ऐकून माझें स्मरण फार गुरुजीजवळ केलें कीं, त्याचें शरीर अशक्त कसा निभाव होईल ? परंतु ईश्वर कृपेनें व त्यांचे आशीर्वादें महत्संकटांतून पार पडलों. पुढें श्रीमंत नानासाहेब यांचें दर्शन बराणपुरावर जालें. पाहतों तों शरीर फार क्षिण जाहलें आहे. मर्जी बेतऱ्हा जाली आहे बहुतांच्या अब्रू क्षणक्षणां जातात. परंतु मजवर सदयतेनें लोभें भाषण करून वर्तमान पुशिलें. सांगितले. [ काव्येतिहास संग्रह. पृ. ३६ ]

---

# युद्धाचा उपसंहार

त्यानंतर सौ पार्वतीबाईच्या बंदोबस्तास विसाजी कृष्ण जोगदंड या समागमें पांचशें धनगर देऊन ठेविले होते. त्यास आज्ञा केली होती कीं, " आम्ही झुंज करून पार होऊन निघालों तरी यांस घेऊन दिल्लीचे रोंखे निघोन यावें. आणि आम्ही पडलों असे वर्तमान ऐकिल्यावर यांस जिवें मारून तुम्ही निघोन जावें. " असा निश्चय खास सांगून त्यांजला रखवालीस ठेविलें होते. मोड जाला, लोक पळो लागले, तें समयीं विसाजी कृष्ण व लोक यांणीं आपले जीव वांचाविले. कोणीकडे गेले हें कळेना. जानू भिंताडा खिसमतगार एकटा राहिला. त्याणें हिंमत धरून आपले पाठीशीं बांधून तेथून बाहेर काढिलें.

त्यानंतर दुसरें वर्तमान झुंजांतून मातबर सरदार व लहान थोर कितेक पळोन आले. ते पश्चिमेकडे जुन्या तळावर खंदकांत येऊन दाखल

जाले कीं, भाऊसाहेबी माघारें पळोन येऊन पूर्ववत् प्रमाणें तळ काढून रहातील. या मागें नित्य जुंजांत जात असत तेव्हां संध्याकाळीं माघारां फिरोन येत, त्याप्रमाणें येतील. म्हणून माघारें बुणग्यांसुद्धां येऊन खंदकांत दाखल जाहाले. तों तेथील फौज व बुणगे पळतात. तेव्हां तेथेंहि धीर पुरेनासा जाला, मग तेथूनहि वाट सांपडेल तिकडून पळत गेले ज्याचे घोड्यांत जीव होता तो खंदक पार होऊन पाणिपत शहरांत गेला. तिकडून ज्यास मार्ग दृष्टीस पडला तसे निघाले. कितेक गाडे व छकडे व बायका खंदकांतून निघावयाचें जालें नाहीं ते तेथच्या तेथेंच राहिले. ते गिलच्या-कडील लोकांनीं पाणिपत शहरचा बंदोबस्त करून खंदकांतील मालत लुटूं लागले. कितेक बायकां धरून नेल्या. कितेकांनीं जिवें मारिल्या. तीच गत पुरुषांस. कत्तल करून जिवें मारिले व धरूनही बहुत दस्त केले.

प्रातःकाळचे प्रहर दिवसानंतर जुंज लागलें तों तीन प्रहर हाणा मारा हेंच जालें. पृथ्वीनें रक्त प्राशन केलें. हिंदुमध्यें या प्रों जुंज मागें जालें नाहीं व मोडही या प्रों होऊन कत्तल जाली नाहीं. पुढेंहि होणार नाहींसें दिसतें. तथापि ईश्वराची करणी कीं, पृथ्वीतील लोक नेऊन त्यांस मारा-वयाचें केलें. मराठे लोक निर्माण केले. फाजा हटानें कधीं केल्या होत्या? आपल्या लष्करांत भोंवतां खंदक खाणून कोण राहिलें होतें कीं काय? उत्तम प्रकारें गांठ पडली तरी जुंज द्यावें नाहीं तरी पळोन जावें. हा मराठधर्म पुरातन चालत आला आहे. तेणेंकरूनच पृथ्वी जिंकिली होती. ते सोडून अविधी धर्माचा स्वीकार केला. आणि लोक दरोबस्त व घोडीं मारविलीं. ईश्वरसत्ता! उपाय काय? नानासाहेब व भाऊसाहेब ईश्वरी अवतार धरून या युगीं चरित्र केलें.

त्या नंतर जुंज होतां होतां रात्र जाली, जुंज बंद जालें. हत्यारें राहिलीं. विश्वासराव यांचे मुडद्याचा हत्ती सुजातडवला याजकडे गेला होता तेथें दौला यांजकडील गोसावी शिपाई होता त्याणें लष्करचे पळापैकीं तैलंग ब्राह्मण आणून रायाचें दहन करविलें. उत्तम प्रकारें गत करून अस्थी वाराणशीस रवाना केल्या. पाणिपतांतील लोक शहरांतून दुसरे दिवशीं गांवचे दरवाजे बंद करून कुल् पळाचा बंद करून दहा पंधरा हजार पळ

धरिला. खंदकांतील धरिले. तेव्हां ताकीद जाली कीं, " माणसांस न मारावें. मालत घेऊन सोडून द्यावें. " त्याजवरून दुसरे दिवशीं यांणीं मारलें नाहीं. बंद धरिला होता तो कुल् वीस हजारपर्यंत लष्करांत आणिला. दोन दिवसपर्यंत लष्करांत होता. त्यास सुजायतदौला यांणीं गिलच्याशीं तीन लक्ष रुपये खंडणी देऊन धर्मार्थ बंद सोडून दिला. रणांतीलहि शोध सुजायतदौला याणें करून मातबर सरदारांची वगैरे ओळख निघाली त्यांस नेऊन गत उत्तम प्रकारें केली.

त्यानंतर इकडील पळाचें वर्तमान तरी कितेक घोडियाचे सामर्थ्यें करून दिल्लीचा रस्ता ज्यांस सांपडला ते पांच सात हजार निघोन गेले. त्यांस त्या मार्गें दांडगे गांवचे भेटले त्यांनीं मारामार करून कितेकांचीं घोडीं घेऊन सोडिलें, व कितेक जिवें मारिलें. त्यामध्यें ज्यांचे घोड्यास जीव बराच होता ते पांच सांत शें वांधून संध्याकाळीं चाळीस कोस दिल्लीसि जाऊन दाखल जाले. कितेकांस दुसरे मार्ग सांपडले, ते भकोन घोळांत पडले. भगवंतें वाट दिल्ही तिकडे गेले. आयुष्य होते ते जगले आणि आले.

यानंतर सौ पार्वतीबाई यांस जानू भिंताडा खिसमतगार याणें पाठीशीं बांधोन आणिलें. पिराजी राऊत पळत होता त्यांणीं पहातांच पाठीची सोडून आपल्या घोडियावर पाठीमागें बांधून साहा कोशपर्यंत आणिली. पुढें त्याचा घोडा थकला. त्यानें उतरून ठेविली. पुन्हा जानू भिंताडा खिसमतगार कोश अर्ध कोश चालवितो तों बळकट घोड्याचा मातबर सरदार कोणीं [ भेटला तर ] त्याचे घोड्यावर बसवी. ऐसें करीत करीत तश्या संकटानें दिल्ली आलीकडे तीन मजलावर मल्हारजी होळकर व कितेक सरदार व पागेचे बारगीर व स्वार शिलेदार पन्नास भेटले. त्यांमध्यें येऊन भेटली आणि मिळाली.

त्यानंतर दिल्ली कडील मजकूर तरी बुधवारीं अष्टमीचे दिवशीं तिसरा प्रहरपर्यंत जुंज होऊन मोड जाला तों गुरुवारीं प्रातःकाळीं कितेक पळत आले. तेथें कोशावर पीरखान ठोका, बाळोजी पगडे ऐसे सहा सातशें किल्यांत होते बाकी हुजरातीचे पतके लक्ष्मणराव गाडवे व हिरोजी शिरके व लखोजी बोधे व बापू बाजीराव यांची पतकें पर्वतराव कदम व गोविंदपंत

बुंदेले यांच्या सूत्रें [ ? ] पांचशें स्वारांनिशीं अशीं तीन सहस्र होती. हजार वाळवंटींत होते. त्यास सर्वत्रास पळाचे वर्तमान समजलें. परंतु तहकीक कीं ' कदाचित भाऊसाहेब पळोन दिल्लींत आले आणि अगोदर पळाले, असें जालें [तर] येथें तोंड दाखवावयास जागा नाहीं.' यास्तव धीर धरून रहाते झाले. पेशजी लष्करचे उदमी कितेक बाहेर जाऊन राहिले होते त्यांत त्या शहरांतील भिकारी यांणीं शोध करून लुटूं लागले व मारूं लागले. वाळवंटींत पतकें हातीं; गुरुवारीं तिसरा प्रहरपर्यंत धीर धरून होतीं. कांहीं खजीनाही सरकारचा होता तो अगोदर काढून बाहेरील पथकें व आपण एकत्र होऊन निघाले असते तरी निभाऊन येते. तें न जालें. संध्याकाळीं गंगोबा तात्या होळकराचे दिवाण पळतच दिल्लीस आले. नारो शंकराकडे भोजन केलें. सविस्तर मजकूर सांगितला. याजउपर " जसा मार्ग भगवंत देईल त्याप्रों निघोन पार व्हावें. नीट दिसत नाहीं. तुम्ही डोळे झांकून कां बसलां ? " असें नारो शंकर यांस सांगितलें. आणि ते स्वार होऊन गेले. तेव्हां अवसानें गेलीं. खजीना काढावयास अनकूल पडलें नाहीं. दिल्लीतील लोक व बायका देखील लष्करच्या लोकांस मारून लुटूं लागल्या. शहरांत धूम झाली. जिवानिशीं मारामार करीत नारो शंकर वगैरे कुल झाडून निघाले. अगोदर वाळवंटींतील पतकें तीन निघालीं तीं फराडीयांस जाऊन जीव न उतरतां दमसांड केला तों हीं रातोरात येऊन मिळालीं. त्यानंतर नाना पुरंदरे व बाळोबा तात्या व आणीक शें पन्नास तेही आले. तेही एकत्र होऊन तीन मजल आले. तों होळकर यांची व बायकांची गांठ पडली. तेथून मजल दरमजल अकरावें दिवशीं भिंडस दाखल जाले. इकडील वर्तमान. कितीकांस दिल्लीचा मार्ग सांपडून दिल्लीस येऊन यांचे मागोमाग भिंडेवर आले. वाटेनें कितेक जिवें मारिले, कितक गेले, कितेक लुटून सोडून दिल्हे. दिल्लीचा मार्ग सांपडला आणि तिकडे गेले. फिरत फिरत तीस चाळीस हजारांस पांच पन्नास दांडगे मिळोन लुटून घोडी हिराऊन घेत. मातबर माणूस अनाथ होऊन पायऊतारा जाले. बहुतांस अन्न कोठें मिळेनासें जालें. ऐसे जातां जातां जाटाच मुलकांत आलें. एक मातबर गांव होता. तेथें एका सावकारानें भिक्षेस खंडीभर उडीद वाटलें.

दर माणसास दहा दहा दाण आले. आणीक मण दोण मणाच्या भाकरी करून तुकड वाटल. एक एकास पैशा एवढा तुकडा आला. अशी भिक्षा घातली. आंगावर वस्त्रें नाहींत. चुन्याचे भट्टी जवळ बसलें राहावें. ब्राह्मणास तो अकरा दिवस अन्न नाहीं. पौष मास, थंडीचे दिवस, बहुत आपत्. मातबर सरदार मनुष्यें दीनाप्रमाणें होऊन पंधरावे दिवशीं भरतपुरावर येऊन दाखल जाले. तेथें जाटाची बायको होती. तिनें बहुत धर्म केला. जागां जागां स्वार पाठवून मुलकांत ताकीद केली कीं, "पळाचे लोक येतील त्यांस कोणी छळू नये." भरतपुरास पावलियावर तीस चाळीस हजार माणसास सर्वत्रांस आठा आठा रोजांचें अन्न दिल्हें. ब्राह्मणास निवडून दूध, पेढे, मिठाई, दिल्हीं. असे एक दिवस फराळास घालून दर ब्राह्मणास पांच रुपये नक्त व एक तिवट व एक रजई व एक एक धोतर व आठां दिवसांचें अन्न व शिधा बहुत उत्तम प्रकारें देऊन शहरांत आराम व्हावयास ( राहून ) घेतलें. शहरांत ताकीद केली कीं, "ज्यास जसें अनकूल पडेल तसें अन्न द्यावें. जेथें रहातील तेथें जागा द्यावी. कोणी छळूं नयें." अशी बहुतांस ताकीद करून मातवर कोणी भेटला त्यास घोडीं बसावयास दिल्हीं, कोणास पालखी दिली. याप्रमाणे सर्वत्रांचा सांभाळ केला. बहुत लोक जगले. तेथून पुढें येतां फिरोन दांडगे यांनीं वस्त्रेंप्रावर्णे घेतलीं. उघडे बोडके झडत पडत भिंडेस दाखल जाले. मातोश्री-बाई व होळकर, नाना पुरंदरे ऐसे होते ते सर्वत्र जमा जाले. तेथें पंधरा मुक्काम जाले. पळाचे लोक आले त्यांस सर्वत्रांस पांच रुपये खर्चास बाईनें दिले. नाना पुरंदरे यांणीं बातमी भाऊसाहेब यांचे शोधास पाठविले. आणि कूच करून ग्वालेरीस आले.

---

# ८ विविध विषयसंग्रह



राजकारण निरूपण [ दासबोध, दशक ११ समास पांचवा ]

अनन्य राहे समुदाव । इतर जनास उपजे भाव । ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३ ॥ मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें ते सावधपण । सर्व विषईं ॥ ४ ॥ चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप । अन्यायें थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५ ॥ जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर । नीतिन्यायास अंतर । पडोंच नेदावें ॥ ६ ॥ दोष देखोन झांकावे । अवगुण अखंड न बोलावे । दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥ १० ॥ फड नासोंचि नेदावा । पडिला प्रसंग सावरावा । अतिवाद न करावा । कोणियेकासी ॥ १२ ॥ करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये । परस्परेंचि प्रत्यय । प्रचितीस आणावा ॥ १७ ॥ जो बहुतांचे सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना । बहुत सोसिता उरेना । महत्व आपुलें ॥ १८ ॥ राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच नेदावें । परपीडेवरि नसावें । अंतःकर्ण ॥ १९ ॥

शाहाजहान व शहाजी यांची तुलना [ राधामाधवविलासचंपु. पृ २५० ]

जगदीश विरंचिकु पुछत है कहो शिष्टि रची रखे कोन कहां ।
कर जोरि कही जयराम विरंच्ये तिरिलोक जहां के तहां ।
ससि वो रबि पूरब पश्चिम लों तुम सोय रहो सिरसिंधु महा ।
अरु उत्तर दछ्छन रछ्छन को इत साहजु है उत साहिजहां ॥

जिजाई

जसी चंपकेशी खुले फुल्लजाई । भली शोभली ज्यास जाया जिजाई ।
जिचे कीर्तिचा चंबु जंबुद्विपाला । करी साउली माउलीसी मुलाला ॥

**औरंगजेबाची निराशा*** [ जयरामकृत पर्णालपर्वतग्रहणाख्यानं ]

पर्वताश्चाति विख्याता राजपुत्रैः सुरक्षिताः ।
क्षणेन तेन ते सर्वे राजपुत्रा महाबलाः ॥
बंधुभिः पुत्रदारैश्च सहितास्तत्र पातिताः ।
तेषां तत् कदनं श्रुत्वा मया किं जीव्यतेऽधुना ॥

**अंक लेखन पद्धति**

संख्या सांगतांना अंकांऐवजीं विशिष्ट अर्थाचे शब्द घालण्याचा प्रघात संस्कृत वाङ्मयांत रूढ आहे. त्यांत पुढें दिलेले संकेत योजलेले आढळनात.

| | |
|---|---|
| शून्य=पूर्ण, गगन | बारा=सूर्य |
| एक=रूप, चंद्र, पृथ्वी | तेरा=विश्व |
| दोन=दोः, पक्ष, यम, अश्विनी, कर, पाद, नेत्र | चौदा=इंद्र |
| तीन=राम, गुण, ग्राम, अग्नि | पंध्रा=तिथि |
| चार=युग, कृत, समुद्र, वेद | सोळा=भूप, अष्टि |
| पांच=प्राण, भूत, अक्ष, बाण, वायु | अठरा=धृति |
| साहा=रस, रंग, ऋतु | वीस=अंगुलि, नख |
| सात=ऋषि, अश्व, पर्वत | चोवीस=जिन, सिद्ध |
| आठ=वसु, गज, सर्प | पंचवीस=तत्व |
| नऊ=गो, नंद, अंक, ग्रह | सत्तावीस=नक्षत्र |
| दाहा=दिशा | बत्तीस=दांत |
| अकरा=शंकर | तेत्तीस=देव |

अंकांचा क्रम उजवीकडून डावीकडे समजावा.

---

* शिवाजीने मोठमोठे किल्ले घेऊन सर्व आसपासच्या राजांवर दरारा बसविलेला पाहून औरंगजेब ‘ आपल्या जगण्यांत अर्थ नाहीं ’ असें मनाशीं म्हणतो.

तालिकोटचें युद्ध व रामराजाचा मृत्यु [ १४८६ माघ शु. ५ ]

पराभवोऽब्दे माघे च शुक्लपक्षे च पंचमी ।
शुक्रवारे च माध्यान्हे रामराजो रणे हतः

शिवाजीमहाराजांचा मृत्यु [ शिवदिग्विजय १६०२ चैत्र शु. १५]

रविसुतशनि ऐसें नाम तें वासराला ।
गणित तिथि सुपूर्णा चैत्रमासीं दिनाला ।।
अवतरण शिवानें पूर्ण केलें नृपानें ।
शकमिति शतसोळा युग्म रौद्राभिधाने ।।

अवरंगजेबाचा मृत्युकाल [ १६२८ माघ व. ३० शुक्रवार ]

शाके रंध्रकरांगभूपरिमिते संवत्सरे च व्यये
दर्शे भार्गववासरे प्रथमगे यामे गुरौ सिंहगे ।
कुंभे सीतकरे अमंदनगरे भानुश्च कुंभास्थिते
माघे मास्यवरंगशाहनृपतिर्भूलोकतोऽगात् दिवं ।।

शाहू छत्रपतीचा मृत्युकाल [ १६७१ मार्गशीर्ष वद्य ३ ]

क्षितिनगनृपशाके मार्गकृष्ण तृतीया ।
भृगुगुरुभययुतेऽन्हि प्राग्दले शुक्लवर्षे ।।
अखिलनृपतिनाथो भार्यया शाहुवर्मा ।
दिनमणिरिव चास्तं देवलोकं जगाम ।।

भाऊसाहेब व नानासाहेब यांचा मृत्युकाल [ श्रीशिवकाव्यम् ]

*काले पाणिगजर्तुभूमितशके संवत्सरे विक्रमे ।
पौषे मासि सिताष्टमी तिथिदिने यानेन दैवेन सः ।।
विश्वासः सुरलोकमेव गतवान् भावुश्च पचात्ततो ।
मासैः पंचाभिरेकपक्षसहितैर्नानाऽपि यातो दिवम् ।।

---

*शके १६८२ च्या पौष शुद्ध अष्टमीस विश्वासराव व भाऊसाहेब दिवंगत झाले आणि पुढें साडेपांच महिन्यांनी नानासाहेब वारले.

अर्नाळा किल्ला बांधल्याचा शक [ १६५९ ज्येष्ठ शु. ५ ]

बाजीराव अमात्य मुख्य सुमती आज्ञापिलें शंकरा ।
पाश्चात्यांस वधूनि सिंधु उदरीं बांधा त्वरें जंजिरा ॥
अर्नाळा जळदुर्ग चिंतुनि मनीं बाजी तुळाजी सुता ।
शिल्पज्ञें दृढ शौर्य जाणुनि तया दुर्गासि संस्थापिला ॥
अंकबाण रसचंद्र शकातें ज्येष्ठ पिंगल सितेंदु दिनातें ।
पंचमी ध्रुव सुपुष्य हि जेव्हां येशवंत बुरुजाकृति तेव्हां ॥

भोसले वंशांतील पुरुष

खेलः कर्णश्च शंभुश्च एको बाबाजि मालजी ।
तथा शाहु शिवः शंभुः शाहुर्वंश्याश्च भोसले ॥

मराठी भाषेचा साजरेपणा [ स्टेफेन्सचें ख्रिस्तपुराण शके १५३७

जैशी पुस्पामाजि पुस्प मोगरी । कि परिमळामाजि कस्तुरि ।
तैशी भाशांमाजि साजिरी । मराठिया ॥

पेशवे वंशांतील पुरुष

विसाजीसुत बाळाजी तत्सुतौ बाजिचीमणौ ।
सदाशिवस्तु चिमणस्य त्रयो बाजीनृपस्यच ॥
बल्लाळो रघुनाथश्च जनार्दन इति श्रुताः ।
बल्लाळस्य त्रयः पुत्राः विश्वासो माधवः परः ॥
नारायणः कनीयांश्च माधवस्तत्सुतः स्मृतः ॥

जुन्या पत्रांतील मुद्रा

१ शिवछत्रपति

प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥

२ राजाराम छत्रपति

श्रीधर्म प्रद्योतिताशेषवर्णा दाशरथेरिव ।
राजारामस्य मुद्रेयं विश्ववंद्या विराजते ॥

३ बाजीराव बल्लाळ

राजा शाहुनरपति हर्ष निधान । बाजीराव बल्लाळ प्रधान*

किल्ल्यांची तुलना

जरूरकू धारूर, बखतकू परांडा, निदानकू गोवळकोंडा

छत्रसालाचा बाजीरावास निरोप

जो गत गजेंद्रकी सो गत भाई हे आज ।
बाजी जात बुंदेलकी राखो बाजी लाज ।।

अष्टप्रधान

प्रधान आमात्य सचीव मंत्री । सुमंत न्यायाधिश न्यायशास्त्री ।।
सेनापती त्यांतिल मुख्य जाणा । अष्टप्रधानीं मग मुख्य राणा ।।

योद्ध्याची विचारसरणी* [ राष्ट्रौढ महाकाव्य, सर्ग २० ]

दैवं चेदनुकूलमेवहि तदा पाणौ जयश्रीरियम् ।
नो चेत् केलिनिकेतनेऽपि सहसा भंगो भवेन्निश्चितं ।।
केऽमी नाम विपक्षवीरनिकराः सारं विचार्यादरात् ।
इत्थं योद्धुमगात् प्रतापधरणीपालः करालः स्वयम् ।।

शिवराजाची थोरवी [ भूषणकविकृत शिवाबावनी श्लोक ४९ ]

राखी हिन्दुवानी हिन्दुवान को तिलक राख्यो, अस्मृति पुरान राखे बेद बिधि सुनी मैं । राखी रजपुती रजधानी राखी राजन की,

* २ जुन्या सनदा व राजकारणी पत्रें यावर शिक्का, मोर्तब, संमति वगैरे अनेक चिन्हें त्यांच्या अस्सलपणाची कसोटी लावण्यास उपयोगी अशी असतात.त्यांची सविस्तर माहिती 'इतिहास व ऐतिहासिक' मासिकाच्या २८।३१ अंकांत रा. भा. वा. भट यांनीं दिलेली आहे. ती वाचकांनीं पहावी.

*अकबराचा मुलगा मुराद यानें अहमदनगरास वेढा दिला; तेव्हां बागुल वंशातील प्रतापशहा त्याच्या मदतीस आला होता. तो युद्ध ऐन रंगांत आल्यावेळीं रणांगणांत उडी घेतांना हे उद्गार काढतो.

धरा में धरम राख्यो राख्यो गुन गुनी में ।। भूषन सुकवि जीति हद्द मरहट्टनकी देस देस कीरति बखानी तब सुनी मैं। साहि के सपूत सिवराज समसेर तेरी दिल्लीदल दाबि कै दिवाल राखी दुनी मैं

सुभाषितें

१ जलकी शोभा कमल है, दलकी शोभा पील ।
धनकी शोभा धरम है, कुलकी शोभा शील ।।

२ जात्यातले रडती, सुपांतले हासती !

३ जेव्हां आपणांत दुही पडते तेव्हां शत्रूस फावते.–रघुनाथराव

४ रोजगारासाठीं महाराची खिचडी उतरावी, आपली चढवावी असें म्हणोन, ज्या समर्यी ज्यास जशी बुद्धी होईल तशीं मनस्वी वर्तणूक करतात हेंच नाशाचें कारण आहे. हा लोभ.

५ घरफूट चांगली गोष्ट दिसत नाहीं. आपलें राजकारण दुलग असावें.—चतुर साबाजी

६ नवें साधावें हें या कुलांत जन्मल्याचें सार्थक–बालशिवाजी

७ को भेदं न प्रशंसति—सोनाजी पंडित

८ एकानें सिद्ध संरक्षण करावें; एकानें साध्य करावें–शिवछत्रपति

९ तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों—श्रीसमर्थ

१०महां सह्यं कथमपि महाराष्ट्रयूथस्य चेष्टा–वेंकटाध्वरि

# शब्दसंग्रह.

अ

अकरम—कृपावन्त
अकस—द्वेष
अखत्यार—अधिकार
अखबार—बातमी
अग्रहार—धर्मार्थ देणगी
अंगारक—ताम्र, म्लेच्छ
अंगेजणी—पराक्रम, एकी
अज़्—पासून
अजबाब—चीजवस्त
अजम—श्रेष्ठ
अजरामरहामत— वंशपरंपरेनें
अजहत—स्वतंत्र
अजीज—दीन
अजुर्दा—खिन्न
अडशेरी—पोटगी
अंतराय—कसूर
अदब—नम्रता
अंदू—साखळदंड
अंदेशा—संशय
अनीन—लगाम, कंठरज्जु
अफरा—अव्यवस्थित
अफलाद—दुहितृसंततीं
अबादी—वस्ती
अंबरखाना—धान्यकोश
अमानत—जप्त, ठेव
अमीन—विश्वासू अधिकारी
अमील—अंमलदार
अंमा—परंतु
अराबा—तोफेची गाडी, तोफखाना, बातेरी
अरेतुरेची—हातघाईची
अर्कान्( अनेक व०)—खांब
अर्ज—विनंतिपत्र
अर्जानी—दिलेला
अलबता—अवश्यक
अलम—जग
अलाहिदा—निराळा
अवसफ—ख्याती
असामी—थोर व्यक्ती
असुदे—ताजे
अहद—पासून

आ

आजार—त्रास
आतश—अग्नी
आदब—पद्धत, सन्मान
आदा—उत्पन्न
आफत—संकट
आफताब—सूर्य
आबाद—समृद्ध
आमदरफती—ये,जा
आयंदा—पुढील साली
आवई—भूमका, बातमी
आवंदा—यंदा

इ

इकरम—कृपा, देणगी
इजत—प्रतिष्ठा
इजानेब—खावंद
इजाफा—वाढ
इजारा—मक्ता
इटे—बरचीचा प्रकार
इटेकरी—प्रासिक
इतबारी—विश्वासू
इतराजी—राग
इतलाख—निराळा,
इतला—सूचना
इतिफाक—ऐकमत्य
इनायत—बक्षीस
इब्बन—बिन
इभ्रत—अब्रु, भरंवसा
इरसाल—वसूल भरणा
इलतमास—जाहीर खबर
इलाही—ईश्वर
इशारत—सूचना
इसाफत—इनाम
इस्तकबाल—भावी
इस्तावा—चढलावणी
ईस्तिहार—जाहीर खबर
ईस्तंबोल—कान्स्टांटिनोपल
ईर—ईर्षा
ई—हे
उखर—उथळ जमीन
उगवणी—वसूल जमा
उजूरवाजू—प्रार्थना

उजूर—आक्षेप, सबब
उपराळा—मदत
उंबरपट्टी—घरपट्टी
उभा मार्ग—राजरस्ता
उमराव—सर्दार
उर्जा—संरक्षण
उलफा—शिधा
उष्टर—उंट
उस्तवारी—व्यवस्था
एकजरा—यत्किंचित्
एकदिल—एकचित्त
एकबाल—दैव
एकांगी—एकट्याची
एकांड्या—सडा शिपाई
एखलास—निष्ठा
ऐन—मुख्य
ऐवज—संपत्ति
औलाद—संतति

**क**

कजलबास—मोंगल सैनिक
कजाख—लढाऊ, साहसी
कट्टा—कत्तल
कतबा—करारी लेख
कथळा—भांडण
कदीम—जुने, प्राचीन
कबज—पावती, देयपत्र
काबिला—बायकामुलें
कमकसर—अंदाजें
कमची—वेताची छडी
कमान—शिंगाचें धनुष्य
कमाल—भरपूर
कमावीस—मामलत
कमावीसदार-ग्रामसंघकरग्राही
कयास—मत
कर्यात—प्रांतविभाग
करीना—जबानी
करोल—बंदुकस्वार
कलम—लेखणी
कलमबंदी—कराराची यादी
कलमी—लिहिलेले
कलहई—मान्यता
कवाइत—युक्ती
कहा—दाणावैरण आणणारी तुकडी
काईल—घाबरा
कापडी—गोसावी, यात्रेकरू
काबाड—ओझें
काबीज—हस्तगत
काबील—कर्ता
कामास येणें—लढाईंत मरणें
कारखाननीस—संभारलेखक
कारेगार—लागू
काहवा—कार्फी, विश्रांति कषाय
किताबत—पत्र, पदवी
कित्ता—सदरहूप्रमाणें
किफायत—फायदा
किलाफ—वैर, किंतु
किसान—कुणबट
किस्तबंदी—हप्तेबंदी
कीर्दमहामुरी—पुरी लागण
कुदणें—उडी मारणें
कुदरत—शक्ति
कुफर—लबाडी
कुफराळा—आंगळिक
कुबल—बळकट
कुमेत—पिवळया रंगाचा
कुर्निसात—लऊन सलाम
कुल—सर्व
कुलबाब—सर्व बाबी
कोरबंदी—सलामीसाठीची सैन्यरचना
कसुर—चूक
कोशीस—खटपट
कैफियत—हकीकत
कौल घेणें—स्वाधीन होणे
कौल, कौलनामा—अभयपत्र
क्षेपनिक्षेप—टाकोटाक

**ख**

खतरा—संशय, भीति
खता—खोट, नष्ट
खरस—कोरड, फेस
खलेल—तंटा
खस्त—खर्च, ठार, पराकाष्टा
खातर—मन
खातरजमा—खातरी
खानदान—कुलीन
खामखा—खात्रीनें
खामोश—स्तब्ध
खालाटी—उतरता प्रदेश
खाली—रिकामा
खावंद—धनी
खासदार—अश्वधर, पादरक्षाधर
खस्त—टप्पा
खिजमत—नोकरी
खिदमत—नोकरी

खिलात—मानाचीं वस्त्रें
खिस्त—हप्ता
खुजस्तेबुनीयाद —औरंगाबाद
खेतास येणें—मरणें

खुरनीस—मुजरा
खुषवख्त—संतुष्ट
खुषरजावंदी—संतोष
खैर—कल्याण
खैरसल्ला—कुशल
खैरात—दानधर्म
खोजा—कंचुकी
ख्याल—ढंग, फंद

ग

गदम—पाणथळ जमीन
गनीम—शत्रू
गरगशा—गोंधळ, तंटा
गरनाळ—रुंद तोंडाची ताफ
गर्दी—नाश
गहजब—राग, संकट
गंजीफ—दारूगोळा
गारदी—कवाईती पायदळ
गाबीद—मच्छीमार
गारद—नष्ट
गांव—योजन, अंतर
गाहा—तयारी
गिराशा—डोंगरी, लुटारू
गिल्ला—तक्रार
गीर्द—तटाची भिंत, घेरा
गीर्दनवाई—चौफेर
गुजारत—मार्फत
गुदरणें—घडणें
गुबर—अंतस्थ
गुरदा—पट्टा
गुराब—जहाज
गुसुलखाना—स्नानस्थान
गैफ—अदृश्य
गोषमाल—शिक्षा
गोही—साक्ष,

च

चकते—मोंगल
चकनामा—सीमापत्रक
चंडोल—पिछाडी
चंद—कांहीं
चाटी—शिंपी
चादर—वस्त्र
चारण—तांडेवाले
चांदणी—श्वेतमंडप , राहुटी
चिटणीस—संदेशलेखक
चिंधीचोळा—विध्वंस
चिरा—पागोटें, मंदील
चिराख—दिवा
चोटी—वेणी
चौगला—ग्रामणी
छबिना—पहारा, रात्रिरक्षण

ज

जकिरा— सामान
जघन्यता—दुर्लौकिक
जंजिरा—द्वीप, समुद्रांतलि किल्ला
जथ—टोळी
जदीद—नवीन
जमदाड—तरवार
जमेत—सैन्य
जरब—दरारा
जरीबादली—जरीचें वस्त्र
जरीदा—एकाकी
जलूस—उत्सव
जंगी—लढाऊ
जंबूर—लहान तोफ
जंबुरा—तोफ
जागल—पाहारा
जानकुरान—ओलीस
जाफरखानी—केशरी रंगाचे
जाब—उत्तर
जाबता—टिप्पण
जाबसाल—प्रश्नोत्तर
जाया—जखमी
जारी—चालू
जीन—खोगीर
जिंमा—जबाबदारी
जिरेटोप—लोखंडी शिरस्त्राण
जिलब—स्वारी, मिरवणूक
जिल्हा—ताब्यातला मुलूख
जुदाई—दुसरेपणा
जेब—ठार,
जेरदस्त—कमजोर
झडती—ताळेबंद, यादी
झाडा—हिशोब
झांबडाझांबड—लुटालूट
झील—दलदलीची जागा

ट

टोकरा—नाव
टोपीकर—युरोपियन
डंग—किर्र झाडी

डांग—डोंगराळ चढाव
डावाडोल—भयाभीत

ढ

ढाल—निशाण

त

तकिया—गादी, संस्थान
तकसीर—कमी, चूक
तजावजा—अंतर
तदबीर—उपाय
तबीब—वैद्य
तब्लख—कागदसूत्र
तमा—किंमत, महत्व
तमाम—सर्व
तर्केश—तूणीर
तरकी—अभिवृद्धि
तरांडे—तारु
तलब—आकर्षपत्र
तलब कर—बोलाव
तलासा—टेहळणी
तवष्ट—तगादा
तवकल—ईश्वरावर भरंवसा
तश्रीफ—पोषाख
तसनस—नाश
तसलीम—सलाम
तह—ठराव
तहद—अवधी
तहमूल—सहन
तळपट—जाळपोळ
तक्षीम—वाटणी
ग करणें—ताणणें
बी—शिक्षा
तागायत—पर्यंत

ताजीम—बहुमान
तापता—रेशमी कापड
ताबीन—आज्ञाधारक
ताम्र—मोंगल, पठाण
ताराज—उध्वस्त
तालामाला—सुमार
तालीक—नक्कल
तालुका—प्रांत
तालेवार—दैववान
ताहा—कडे, थांसी
तिलक—गंधाचा टिळा
तिवट—पागोटें
तुमार—जमाखर्च, समाहार
तुरुक—मुसलमान
तुरप—घोडदळ, ट्रुप
तेजी—घोडा
थट्टी—गाई, म्हशी, गोशाळा
थळ—ठिकाण
दंडक—प्रघात
दफन—पुरणें
दफे होणें—हाकलणें
दर—आंत
दरक—अधिकार
दरकार—जरुरी
दरसदे—दरशेंकडा
दराज—लांब
दराजकरणें—वाढविणें
दरोबस्त—सर्व
दस्त—हस्तगत
दस्तखत—हस्तपत्र
दस्तूर—चाल, रूढी
दस्तपंजा—अभयहस्त

दरुणी—अंतःपुर
दाइम—अखंडित
दाईज—भाऊबंद
दाखल—नमूद श्रत
दाना—शाहाणा
दारुलजफर—विजापूर
दाली—कमरपट्टा
दालीबांधणें—लढाईस तयार होणें
दिक्क—विमूढ
दिक्कत—हरकत, त्रास
दिगर—तथापी
दिमत—ताबा
दिल्—अंतःकरण
दिलगीर—दुःखी
दिलदिलासा—आश्वासन
दिलेरी—धारिष्ट
दिवाण—सरकार, प्रधान
दिवाळ—भिंत, मर्यादा
दुमाला—स्वाधीन
दुमदारी—पिछाडी
दुनिया—इहलोक
दूरदेशी—दूरदर्शी
दुलग—दुटप्पी
दुवा—आशीर्वाद
दुस्त—वस्त्रपंचक
देकार—धर्मादाय
देशक—अधिकारी
देहाय—गावगन्ना
धानती—शुद्ध वासना
धमधमा—मोर्चा, बातेरी
धांडोरा—डांगोरा

